

प्रो. गोविंद चिमणाजी भाटे

# अर्पण पत्रिका

प्रस्तुत महाराष्ट्र वाङ्मय-प्रवेशिका माझे परमपूज्य
गुरुवर्य व महाराष्ट्रसाहित्याचे एक विद्वान् व
विख्यात सेवक प्रो. गोविंद चिमणाजी
भाटे, एम्. ए., माजी प्रिन्सिपाल
वुइलिंग्डन् कॉलेज, सांगली
यांस सादर व सप्रेम
समर्पण केली आहे.

गुरुवर्यांचा एक जुना शिष्य,

**गं. गो. कानेटकर**

# महाराष्ट्र वाङ्मय-प्रवेशिका

## भाग १ ला

( मराठी सातव्या वर्गाकरितां वाचनपुस्तक )

गंगाधर गोविंद कानेटकर, एम्. ए.,
प्रोफेसर, स्पेन्स ट्रेनिंग कॉलेज, जबलपूर

मॅक्मिलन् आणि कंपनी, लिमिटेड
मुंबई

 [ किंमत १२ आणे

लिपेर्यथावद्ग्रहणेन वाङ्मयं
नदीमुखेनेव समुद्रमाविशत्।

कालिदास—रघुवंश

# प्रस्तावना

## ( दोन्ही भागांची )

पुढील वाङ्मयात्मक पाठ सातव्या व आठव्या ( अथवा इंग्रजी ३ ऱ्या व ४ थ्या ) वर्गांकरितां मराठी वाचनपुस्तकें म्हणून उपयोगीं पडावे या हेतूनें संग्रहित केले आहेत. ट्रेनिंग स्कूल्स् अथवा नार्मल स्कूल्स् यांच्या पहिल्या व दुसऱ्या वर्गांकरितां देखील हीं पुस्तकें उपयुक्त होतील असें वाटतें.

मध्यप्रांतांत ६ व्या वर्गापर्यंत व मुंबई इलाख्यांत ७ व्या वर्गापर्यंत विद्याखात्यामार्फत प्रसिद्ध झालेलीं क्रमिक वाचनपुस्तकें भाषाविषयाच्या अध्ययनास उपयोगीं पडतात. पुढें त्या त्या वर्गांकरितां मंजूर झालेल्या गद्यात्मक अथवा पद्यात्मक अशा पुस्तकांतून एखादें निवडून तें ७ व्या व ८ व्या वर्गाकडून वाचून घेण्याचा प्रघात हल्लीं चालू आहे. या पद्धतींत थोडी गैरसोय होते. एक तर ज्या वर्गांकरितां हीं पुस्तकें निवडावयाचीं त्याच वर्गास अनुलक्षून तीं लिहिलेलीं नसतात. अदमासानें त्यांची निवड करावी लागते; व अनुभवांतीं तीं कधीं अधिक कठीण, कधीं फाजील सोपीं अशीं ठरतात. दुसरें, गद्य व पद्य यांच्या संग्रहाचीं पुस्तकें भिन्न भिन्न असल्यानें दोहोंची मिळून किंमत अधिक पडते; व ती देऊनही चित्रें, आकृति, नकाशे वगैरेंनीं सजविलेलीं पुस्तकें प्रायः दुर्मिळच असतात.

ही अडचण दूर व्हावी, व माध्यमिक शाळांच्या वरच्या दोन वर्गांना उपयुक्त अशीं वाचनपुस्तकें मिळावीं या हेतूनें हीं पुस्तकें रचण्यांत आलीं आहेत.

या पुस्तकांत आणखीही कांहीं विशेष दिसून येतील.

( १ ) मुलांना वाचनाची खरी गोडी लागावी, चांगलीं पुस्तकें कोणतीं हें त्यांना समजावें व स्वतःच्या प्रयत्नानें चांगलें वाङ्मय वाचावें अशी त्यांमध्यें

हौस उत्पन्न व्हावी हा एक पाठ निवडणाराचा मुख्य उद्देश आहे. म्हणून पहिल्या पुस्तकांतील दोन तीन पाठ वगळले तर बाकीचे सर्व, मराठींत ज्यांनीं चिर-स्मरणीय नांव मिळविलें आहे अशाच कवींच्या व ग्रंथकारांच्या ग्रंथांतून या पुस्तकांत घेतले आहेत. पण वाङ्मयदृष्टया जें उत्कृष्ट असेल तें मुलांच्या आटोक्यांत येण्यासारखें असेलच असा नियम नाहीं. म्हणून पाठांतील विषयांची निवड करतांना मुलांच्या गरजा व त्यांची आकलनशक्ति यांकडे सारखी दृष्टि ठेविली आहे. इंग्रजी भाषेंतील High Roads of Literature, Black's Literary Readers, Macmillan's Progress to Literature वगैरे उंची दर्जाच्या वाङ्मयप्रवेशिकांचें अवलोकन करून त्यांच्या धर्तीवर ही प्रवेशिकांची जोडी रचण्याचा यत्न केला आहे.

( २ ) वाङ्मयामधील सर्व महत्वाचे प्रकार या पुस्तकद्वयांत प्रतिबिंबित व्हावे असें धोरण ठेवण्यांत आलें आहे. विनोदात्मक वाङ्मयाचा त्यांतल्या त्यांत नवीन परंतु उपयुक्त प्रकार यांत काळजीपूर्वक समाविष्ट करण्यांत आला आहे. उत्कृष्ट विनोद व कोटि यांचें मर्म समजणें हें उदार शिक्षणाचें एक लक्षण समजतात तें योग्य आहे, अशी प्रस्तुत संपादकाची समजूत आहे.

( ३ ) स्फूर्तिदायक, देशाभिमान जागृत करणारें, व स्वातंत्र्य, समता व बंधुता यांचा उच्च आदर्श समोर ठेवणारें असें–गद्य व पद्य या दोन्ही प्रकारचें–शक्य तितकें वाङ्मय यांत घालण्याचा प्रयत्न केला आहे.

( ४ ) आजपर्यंत उपयोगांत असलेल्या पुस्तकांत बहुधा नीतिपर उपदेश ज्यांत असेल असेच पाठ निवडावयाचे असें धोरण सामान्यतः दिसतें. या धोरणास प्रस्तुत संपादकानें अजीबात फांटा दिला आहे. नीत्युपदेश हवा खरा, पण तो नेहमीं विधिवाक्यद्वाराच आला तर कंटाळवाणा होतो. प्रत्यक्ष नीतिपर व्याख्यानापेक्षां नकळत नीतितत्त्वें पटविणाऱ्या व उच्च मनोवृत्ति जागृत करणाऱ्या गोष्टी, नाटकें, इतिहास, पुराणें वगैरेंचाच परिणाम वाचकांवर अधिक होतो. मुलांस तर ही गोष्ट विशेष लागू आहे. " कांतासंमिततयोप-देशयुजे " या सूत्रमय वाक्यांत मम्मटाचार्यांनीं जो मार्ग दाखविला आहे, त्याच मार्गाचें या पुस्तकांत अवलंबन केलें आहे.

( ५ ) प्रत्येक पाठाचे शेवटीं कांहीं निवडक प्रश्न दिले आहेत. त्यांचा उपयोग दोन तीन प्रकारें होईल.

( अ ) पाठाचा सारांश मुलांकडून काढून घेण्यास.

( आ ) त्यांच्या विचारशक्तीस चालना देण्यास.

( इ ) निबंधरचना शिकविण्यास.

यापैकीं शेवटचा उपयोग महत्त्वाचा आहे. पाठांतील मुख्य मुख्य मुद्दे स्वतःच्या भाषेंत मुलांनीं सांगण्याचा अगर लिहिण्याचा यत्न केल्यास त्यांच्या भाषारचनेस खात्रीनें चांगलें वळण लागेल.

वरील उद्देशांपैकीं कोणते किती सिद्धीस गेले आहेत हें तज्ज्ञांनींच ठरवायाचें आहे. अभिजात वाङ्मय—विशेषेंकरून काव्य—हें ललितकलेचें एक अंग आहे; व कला म्हटली कीं तेथें रुचिभेदास अवकाश मिळालाच. एकास जें रुचलें तें दुसऱ्याच्या पसंतीस उतरेलच अशी खात्री देववत नाहीं. तथापि प्रयत्न कसून केला आहे, व तज्ज्ञांच्या सूचनेप्रमाणें फिरूनही ( तसा प्रसंग आल्यास ) प्रयत्न करण्याची संपादकाची तयारी आहे. सहानुभूतिपूर्वक सूचना मात्र आल्या पाहिजेत.

ग. गो. कानेटकर

---

## पहिल्या भागाची प्रस्तावना

महाराष्ट्र वाङ्मय-प्रवेशिकेचा हा प्रथम भाग आज आम्ही वाचकांस सादर करीत आहों. यांतील वाङ्मयरत्नें निवडून घेण्यास ज्या ग्रंथकारांनीं, कवींनीं, अथवा त्यांच्या प्रतिनिधींनीं परवानगी दिली त्यांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानितों.

शिक्षक व शिक्षणशास्त्रज्ञ यांनीं या पुस्तकाचा उपयोग करून पाहून संपादकास त्यांतील दोष अवश्य कळवावे. त्यांच्या सूचनांचा योग्य परामर्श पुढील आवृत्तीचे वेळीं घेतला जाईल.

ग. गो. कानेटकर

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

एका वर्षाच्या आंत प्रस्तुत पुस्तकाची द्वितीयावृत्ति काढण्याचा सुयोग आला आहे. पृष्ठसंख्या थोडीशी कमी करण्यासाठीं एक पाठ अजीबात गाळून दुसऱ्या एका पाठांतील कांहीं भाग कमी करण्यापलीकडे दुसरा कोणताही फेरफार या आवृत्तींत करण्यांत आलेला नाहीं.

जबलपूर
ता. १७-११-२९

गं. गो. कानेटकर

# महाराष्ट्र वाङ्मय-प्रवेशिका

## भाग १ ला

### अनुक्रमणिका


| पाठ | लेखक | पृष्ठ |
|---|---|---|
| ( अ ) गद्यविभाग | | |
| १ मतलबाशिवाय मनुष्य नाहीं | धनुर्धारी ... ... | १ |
| २ शूर बालक ... | ... ... ... ... | १९ |
| ३ समुद्र | कृष्णशास्त्री चिपळूणकर ... | २५ |
| ४ सकाळ | ह. ना. आपटे ... ... | २८ |
| ५ स्वामिभक्त खंडो बल्लाळ | ... ... ... ... | ३५ |
| ६ झोंपेचा शत्रु ढेंकूण | श्री. कृ. कोल्हटकर ... ... | ४९ |
| ७ कॅप्टन् कुक् ... | ... ... ... ... | ५९ |
| ८ वसईचा मोहरा | सोहोर्नी ( बखर ) ... ... | ७१ |
| ९ इतिहास | वि. कृ. चिपळूणकर ... ... | ७६ |
| १० पांडवांची राजधानी—इंद्रप्रस्थ | न. चिं. केळकर ... ... | ९० |
| ११ सम्राट् हर्षवर्धन | चिं. वि. वैद्य ... ... | १०२ |
| १२ नाना फडणवीस व पार्वतीबाई | न. चिं. केळकर ... ... | ११५ |
| १३ हिंदुस्थानचें नंदनवन | गो. वि. भाटे ... ... | १३५ |

## अनुक्रमणिका


| पाठ | लेखक | पृष्ठ |
|---|---|---|
| **( ब ) पद्यविभाग** | | |
| १ ईशवंदना | कोल्हटकर–वामन पंडित | ... १६० |
| २ स्फुट अभंग | तुकाराम ... | ... १६१ |
| ३ यक्षमंदिर | कृष्णशास्त्री चिपळूणकर | ... १६५ |
| ४ अन्योक्तिकलाप | कृष्णशास्त्री चिपळूणकर | ... १६७ |
| ५ ना कळे | सौ. लक्ष्मीबाई बेहेरे ... | ... १७२ |
| ६ महाराष्ट्रलक्ष्मी | विनायक ... ... | ... १७४ |
| ७ स्फुट श्लोक | वामन पंडित ... | ... १७५ |
| ८ दोन बाजी | केशवसुत ... | ... १७८ |
| ९ कळ्यांचीं फुलें कशीं झालीं ? | गोविंदाग्रज ... | ... १७९ |
| १० स्मृतिचित्र | गोविंदाग्रज ... | ... १८२ |
| ११ रुक्मिणी-विवाहकथा | मोरोपंत ... | ... १८३ |
| १२ लेंकराची जिज्ञासा | ना. वा. टिळक ... | ... १८६ |
| १३ एक अमेरिकन मुलगी | ना. वा. टिळक ... | ... १८९ |
| १४ तें गृह | ना. वा. टिळक ... | ... १९० |
| १५ भगवद्गीतेचा प्रारंभ | ज्ञानेश्वर ... | ... १९३ |
| १६ कुंजकूजन | चंद्रशेखर ... | ... १९७ |

# १

# 'मतलबाशिवाय मनुष्य नाहीं'

*[ परलोकवासी रा. वि. टिकेकर ऊर्फ धनुर्धारी यांनीं लिहिलेल्या* 'वांईकर *भटजी ' या कादंबरींतून पुढील प्रकरण घेतलें आहे. ही कादंबरी इंग्रजींतील प्रसिद्ध ग्रंथकार गोल्ड्स्मिथ् याच्या " व्हिकार ऑफ् वेकफील्ड्" या कादंबरीच्या आधारें, पण जवळ जवळ स्वतंत्रच अशी लिहिलेली आहे. साधें पण ठसकेबाज व संप्रदायशुद्ध मराठी लिहिण्याचे कामीं धनुर्धारींचा हातखंडा होता. सुमारें चाळीस वर्षांपूर्वीच्या आपल्या सामाजिक स्थितीचें चित्रही या गोष्टींत चांगलें पहावयास मिळतें.*

*त्रिंबक भटजी हा एक विद्वान् पण दारिद्र्यानें गांजलेला वैदिक ब्राह्मण आहे. सुशील व दक्ष अशी पत्नी त्याला लाभली असूनही वाढत्या प्रपंचाचा बोजा वांईसारख्या छोट्या गांवीं चालविणें कठीण वाटूं लागलें, म्हणून तो तेथून पुण्यास गेला. पण तेथेंही " देशांतून कोंकणांत गेला तरी पळसाला पानें तीनच " या म्हणीची सार्थकता त्याच्या प्रत्ययास आली. त्याच्या वडील मुलीचें लग्न ( पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें लवकरच ) झालें होतें. दुसरी मुलगी बगडी ही दहा एक वर्षांची होती. म्हणजे त्या वेळच्या समजुतीप्रमाणें लग्नाला योग्य झाली होती. अशा संधीस मोरोबा या नांवाच्या एका भिक्षुक मित्रानें त्याला जाळ्यांत पकडण्याचा कसा प्रयत्न केला, हें पुढील प्रकरणांत दिसून येईल. ]*

अशा तऱ्हेनें चोहोंकडून गांजलों, तेव्हां उगीच मी वांई सोडून इकडे पुण्यास येण्याच्या नादीं पडलों असें मला वाटूं लागलें. आशा ओढून नेईल तिकडे फरफटत जाणें बरें नव्हे, हें आतां मला चांगलें

कळून आलें. पण त्याला आतां काय इलाज ? आहे तें बरेंच आहे, असा मनाचा धडा करून मी राहिलों. आज रविवार होता, म्हणून घरांत सर्व संथपणें चाललें होतें. जेवणखाण झाल्यावर चार दोन घटकांनीं मोरोबा घरीं आले. आमच्या इकडच्या तिकडच्या पुष्कळ गोष्टी झाल्या. मीं माझ्या सुखदु:खाच्या हकीकती चार घटका सांगितल्या. त्यावर मोरोबा म्हणाले, 'अप्पा, तुम्ही उगीच कां व्यर्थ दगदग करतां ? मी तुम्हांला सांगूं का एक युक्ति ? मला तर बुवा ती फार पसंत वाटते.' यावर मीं म्हटलें, 'काय, सांगा तर पाहूं तुमची युक्ति ? पडली पसंत, दिसली उक्त, तर कां न करावी ? माझे इष्ट स्नेही काय ते येथें तुम्हीच; आपला परका का भाव आहे ?'

**मोरोबा:**—तशांतलें नाहीं हो. ज्याचें त्याला कल्याण अकल्याण दुसऱ्यापेक्षां विशेष चांगलें कळतें; तेव्हां त्याच्या पसंतीनें सर्व कांहीं व्हावें हें ठीक, एवढेंच माझें म्हणणें. मला तर ती गोष्ट फार पसंत वाटते. मी आमच्या यजमानांच्या कानांवर ती गोष्ट कधींच घातली आहे. फक्त तुमच्याकडे विचारणें व्हावें, आणि मग तें काम मीं करावें म्हणूनच काय तो आजपर्यंत अवधि लागला. मी सांगतों ती युक्ति तुम्ही मुकाट्यानें बेलाशक करा—समजलांत ? वहिनी, काय चाललें आहे आंत ? ऐकलेंत का आम्ही काय बोललों तें ?

**मी:**—जाऊं द्या हो, बायकांना काय विचारावयाचें आहे त्यांत ? मला अगोदर सांगा तर खरें तुम्ही काय म्हणतां तें ? बायका काय, तोबऱ्याला तेवढ्या पुढें.

---

१ खावयाला.

**मोरोबा:**—तसें नव्हे अप्पा, बायका म्हणजे काय तुम्ही कस्पटाप्रमाणें समजतां होय ? सारा संसार काय तो त्यांच्यावर आहे; तेव्हां त्यांस सल्लामसलत आपली उगीच विचारीत असावें.

इतकें बोलणें झालें तों तीही आंतून येऊन कोपऱ्याशीं उभी राहिली. तेव्हां मोरोबा पुनः म्हणाले, ' मी म्हणतों, येथें तुमच्या प्रपंचाचे हाल होतात; शहरची वस्ती, उत्पन्न थोडें, तेव्हां कठीण जायचंच. त्यांतून घरांत चार कच्चींबच्चीं. आतां बाळ्या शिकतो आहे. उद्यां चार अक्षरें झालीं म्हणजे तो काय पैशाचा नुसता पाऊस पाडील पाऊस ! तोंवर काय असतील त्या अडचणी निमूटपणें सोसाव्या. प्रसंगानुसार चार पैसे कर्ज झालें तरी पत्करलें. कर्ज कर्ज काय फिटल्याशिवाय राहतें ?

**मी:**—मोरोबा, काय गोष्टी सांगतां ह्या ? उपासमार पत्करला एक वेळ, पण, बाबा, तेवढें ब्रह्मस्व[1] नको. अडचण अडचण ती काय ? आज आहे आणि उद्यां नाहीं. तसें तर कर्जाचें नाहींना ? नको, माझ्या आई, त्या कर्जाचें नांव देखील नको.

**मोरोबा:**—होय, तुमचें म्हणणें खरें, पण कर्ज चुकलें आहे कोणाला ? राजा असो, कीं रंक असो, त्याच्या पाठीमागें थोडेंबहुत ऋण हें आहेच. आतां, त्यांतल्या त्यांत युक्तायुक्त विचार पहावा लागतो, म्हणूनच तर तुम्हांस युक्ति कशी म्हणतां अगदीं नामी सांगतों ! तुम्ही म्हणतां कर्ज नको. होय, मीही म्हणतों, नको. पण सांगा—आतां गृहन्यून[2] काढतों म्हणून रागावूं मात्र नका—आतां

---

१ कर्ज. २ व्यंग, उणीव.

वहिनींचीं लुगडीं फाटलीं; मुलगा तर पाहतां शाळेंत कशा कपड्यानें जातो तो; मुलीचें लग्न आलें; उद्यां आवडी सासरीं जाईल; सुनेची मंगळागौर आहे; एक का दोन, अशा शेंकडों अडचणी आहेत. या कशा सरणार ? श्रावणमासाच्या दक्षिणेवर का पक्षमासच्या पितृतिथींवर[1] ?

**तीः**—कसं बोललांत बरं भावोजी ? उद्यां पंचमी आली. आवर्डाला एक साडी हवी. धाकटीला मग वगळायचं आहे ? माझं आपलं राहूं द्या एकीकडे. बाळ्या तर रोज अमुक हवं तमुक हवं म्हणून हट्ट घेतोच ! त्या पोरावर सगळा आमचा संसार. नको का त्याची एखादी दुसरी तरी हौस पुरवायला ? मी काय दागदागिने मागतें ? झुळमुळ्याचीं[2] दोन मोत्यें कमी आहेत तेवढीं अगोदर घ्या असं देखील माझं म्हणणं नाहीं.

**मीः**—बरें, तें असो; मोरोबा, तुमची युक्ति तरी कोणती ती सांगा, ऐकूं द्या. सगळयांच्या गोष्टी खऱ्या, माझ्याच तेवढ्या खोट्या असेंच कां होईना ?

**मोरोबाः**—हें पहा वहिनी, आमचे ते बाळासाहेब नेने आहेत कीं नाहीं, ते मोठे सावकार आहेत. अगदीं भला गृहस्थ आहे, पुण्यात्मा आहे.

१ श्रावण महिन्यांत व्रतें, पूजा वगैरे बऱ्याच असतात, व पितृपक्षांत ( भाद्रपदाच्या वद्य पक्षांत ) पितरांचीं श्राद्धें करावयाचीं असतात. त्यामुळें भिक्षुक ब्राह्मणास या दिवसांत दक्षिणेची प्राप्ति बरी असते.

२ नथेंत खालीं लटकणारें मोतीं.

**ती:**—हं! हं! बाळासाहेब तुमचे यजमानच कीं नाहीं! आमची बगी परवां आदितवारीं कुंवार गेली होती. एक चवली दक्षणा, आणि इतकाल्या कांठाचा खण दिला तिला. चांगला गृहस्थ आहे बिचारा. त्याची काकू कीं कोण आहे ती देखील फार भली बाई आहे म्हणतात. मला एकदां फुरसत मांपडेल तेव्हां येत जात चला म्हणून निरोप देखील पाठविलान्. पण मलाच मेलं कुठं फावतं आहे? बाळ्या आला कीं भूक भूक म्हणून नाचूं लागतो. केव्हां एकदां सकाळीं खाल्लं असतं; आणि त्यांतून मेलं तें शिकणें.

**मोरोबा:**—होय ना? पहा अप्पा! तो पुरुषच तसा आहे. गुणवान् काय, श्रीमंत काय, रीतीभातींत काय, कांहीं विचारूं नये.

**मी:**—बरं मग?

**मोरोबा:**—मी म्हणतों त्यांजकडून तुम्ही दरमहा पंधरा रुपये उसनवार घेत चला; तुमचा बाळ्या झाला उद्यां कर्ता सवरता तर फेडील. व्याजही कांहीं म्हणण्याजोगें नाहीं. एकोत्रा द्या, चला. काय वहिनी, मी म्हणतों तें खरें का खोटें?

**ती:**—होय, रीतीचीच गोष्ट. असं देणारं तरी कोण आहे आणि इतकं म्हणतो तरी कोण?

**मी:**—बरं आहे. चला तर घ्या रुपये आणि करा कशी काय फेड करतां ती. अग, कर्ज म्हणजे काय तोंडच्या गोष्टी समजलीस? घेतांना वाटतं गोड, पण देतांना कळेल कसें काय सुख आहे तें! तुम्हां बायकांना काय? आयत्या पिठावर रेघोट्या ओढावयाच्या.

एक छत्रपति[1] मिळवावयाचा तर किती आयास पडतात तुला माहीत आहे ? खर्चाच्या तेवढ्या गोष्टी तुम्हीं बायकांनीं सांगाव्या. तें कांहीं असो. मोरोबा, कर्जवाम करून, असेतोंपर्यंत माझी व पुढें पोराबाळांची फजीती करून घेण्याच्या युक्ती तुम्हीं मला सांगूं नयेत, आणि आम्हीं त्या ऐकूं नयेत. तुम्ही आमचे स्नेही म्हणून आमच्या कल्याणाच्या गोष्टी सांगतां, सल्लामसलत देतां, आणि त्या आम्हीं ऐकूं नये हें गैरशिस्त आहे. पण माझा बुवा नाइलाज आहे. कर्ज म्हटलें, कीं अंगावर कांटाच उभा राहतो. कर्ज आणि याचना—फार भयंकर मानहानि. त्यांतली, याचना आमच्या पाठीस लागलेली, आणखी त्यांत ही कशाला दुसरी पीडा हवी ? म्हणून मी झालों तरी तुमच्या म्हणण्यास नाकबूल होतों. तुम्ही आमच्या ऋणानुबंधांतले म्हणूनच तर एवढी तरी खटपट करतां कीं नाहीं ?

हें व अशा प्रकारचें अन्य पुष्कळ बोलणें झाल्यावर मोरोबा घरीं गेले.

## भाग २ रा

पुढें कांहीं दिवस असेच रडत कढत चालले. घरांतल्या अडचणी मोठ्या नेटानें ती मजपुढें लोटूं लागली. कारण तिला माहीत कीं, रुपये मला कसे तरी मिळत असून, मीच ते नको म्हणतों, हें कांहीं नीट नव्हे. तिचा हा भाव मी जाणून होतों. इतक्यांत आवडीचा सासरा कांहीं कामानिमित्त पुण्यास आला.

---

१ रुपया. पूर्वीच्या रुपयांवर अर्थातच त्या वेळच्या छत्रपति राजांचा शिक्का असे.

आम्ही वांईहून इकडे आलों हें त्यांस माहीत, तेव्हां ते उतरले आमच्याच घरीं. व्याही घरीं आलेले, तेव्हां बाहेरून श्रीमंती थाट नसेना कां, पण असलेली स्थिति तरी खुलवून दाखविली पाहिजे; म्हणून आम्ही उभयतां झटूं. त्यांचें राहणें आठ दिवस झालें. जातांना आवडीस नेतों म्हणत, तेव्हां तिची रवानगी करून देणें भाग. ते घरीं असत तोंपर्यंत आम्ही सर्व आमंत्रणें सोडून घरींच जेवत असूं. मग काय पडली खर्चाची टंचाई! आवडीला एक साडी तरी दिलीच पाहिजे, तिच्या सासूला एक खण हवाच, असे निघाले घरांतून तगादे, आणि तेही खरेच. पोरीनें म्हटलें, बाबा, मला एक पुणेरी घाटाचा गडवा हवा. इतक्यांत तिनें म्हटलें, खरेंच यंदां तिला बरोबर फणी करंडा दिला पाहिजे; मग, तेवढा तो आणावा. मीं म्हटलें, बरें आहे. पोरगी दुसऱ्याच्या घरीं जाणारी; तिनें एखादा पदार्थ मागितला तर नाहीं म्हणावें कसें? या विचारानें मीं या गोष्टीला आढेवेढे घेतले नाहींत. मोरोबा रोज घरीं येतच असत. तेव्हां त्यांजपाशीं पुनः या सर्व अडचणी सांगितल्या. त्यांवर त्यांचें उत्तर—'काय तरी ब्राह्मण आहे पहा, व्यर्थ आपल्या जिवाला कातावून घेत आहे! संसारांत उसनवार केल्याशिवाय एक तरी प्राणी या दुनियेवर असेल काय? वारा येईल तशी पाठ दिली पाहिजे!' इत्यादि त्याचें बोलणें ऐकून मलाही वाटलें कीं तेंही खरेंच. संसार आहे त्यांत कर्जवाम व्हावयाचेंच. आम्ही चैनीकरितां वगैरे थोडेच पैसे घेतों आहों? तेव्हां या कर्जाबद्दल कोणी नांवही पण ठेवणार नाहीं. तेव्हां आतां आपण होऊन रुपये घ्या असेंच मोरोबा म्हणतात; घरीं तर नड आहेच; वाण्याची उचापत किंवा उधार

कापड घेण्यापेक्षां हातउसणें[1] घेणें काय वाईट ? असा विचार करून मीं मोरोबास म्हटलें, 'तुमच्या सल्ल्याप्रमाणें वागावें हें मला बरें दिसतें. पण मला मागण्याचा प्रसंग आजवर नाहीं आला. तेव्हां आजचे रुपये तेवढे तुम्हीच मागून आणा; मग पुढें किंचित् परिचय झाला म्हणजे पाहतां येईल.' त्यावर मोरोबा बोलले, 'कांहीं हरकत नाहीं, तें माझें काम. एकदांचे संकटांतून मोकळे व्हा म्हणजे झालें; एवढेंच माझें म्हणणें.' त्यानंतर बोलल्याप्रमाणें मोरोबांनीं पंधरा रुपये आणून दिले. व्याह्याची आणि आवडीची रवानगी केली. पुढें चार पांच दिवस लोटतात न लोटतात तोंच वांईकडील व्याह्याचा निरोप आला कीं, परवांच्या दिवशीं सूनबाईस[2] बोलावण्याला मनुष्य धाडून देतों, त्याजबरोबर रवानगी करून द्यावी. बरोबर पाठराखणही आलेली, तिला एक खण द्यावा, मुलीला[3] एक साडी द्यावी, हें टुमणें पुन: मागें लागलें. त्याला पांच रुपये खर्च लागला. तेही मोरोबाकडून घेतले. तिला दोन लुगडीं घेऊन दिलीं. मुलाला कपडे, व मला धोतरें घेतलीं, त्याला पुन: रुपये दहा, अशी चालली रक्कम फुगत. इतक्यांत विहीण वारल्याचें नाशकाहून वर्तमान आलें. समाचाराला गेलें पाहिजे. खर्चाची अडचण, तेव्हां पुन: काढले पैसे कर्जाऊ. पहिले फिटले नाहींत, दुसरे काढल्याशिवाय गत्यंतर नाहीं. तेव्हां आतां व्हावयाचें कसें ? हां हां म्हणतां रक्कम फुगली, गेला आंकडा शंभरापर्यंत. मोरोबाच्या यजमानांनीं मला एकवार स्वत: येऊन भेटण्यास बोलाविलें. त्याप्रमाणें मोठ्या खिन्न मनानें मी त्यांच्या

---

१ कांहीं कर्जरोखा वगैरे करून न देतां पैसा उसना घेणें. २ थोरल्या मुलाची बायको. ३ सुनेला. थोरल्या सुनेचें नांव न घेण्याची चाल आहे.

घरीं गेलों. बरोबर मोरोबाही होतेच. तेथें गेल्यावर मानपान, आदरातिथ्य मात्र माझ्या कल्पनेपेक्षां फारच चांगलें झालें. तेव्हांच मला वाटलें कीं, हा प्रकार कांहीं चमत्कारिक खरा. कारण कूळ म्हणजे सावकारास जगांतील अति क्षुद्र प्राणी वाटतो. ऋणकोला मान नाहीं, अक्कल नाहीं, समजूत नाहीं, आणि अब्रूची चाड नाहीं असें धनकोला वाटत असतें आणि वाटतें तेंही रास्तच. मोरोबाबरोबर जातांना मी मुठींत जीव धरून गेलों, पण येतांना मनांत नानाप्रकारच्या शंकांचें जाळें पसरूं लागलें. "भटजी हें घर आपलें आहे; लागेल तसा पैसा नेत चला. अनमान नको. फेडण्याची काळजी नको. परस्परांत संबंध जडला म्हणजे मग नसते फारशी परवा." या वाक्याचा मतलब काय हें माझ्या ध्यानांत येईना. कर्ज काढण्याची मला जन्मादारभ्य संवय नसल्यामुळें हें माझ्या मनाला फार जाचूं लागलें. रात्रंदिवस तें कसें फिटेल, याची व्यवस्था काय करावी, ही काळजी माझ्या डोक्याशीं सदानकदा अगदीं ठेपलेली असे. माझें एवढेंसें कर्ज तर त्याच्याकरितां मला हृद्रोग[1] लागण्याची वेळ आली, मग हजारों आणि लाखों रुपये कर्ज ज्यांस असेल त्यांची दशा काय होत असेल परमेश्वर जाणे. 'अति ऊ त्याला खाज नाहीं, आणि अति ऋण त्याला लाज नाहीं,' हेंच खरें. नाहीं तर, कर्जासारखा भयंकर रोग असूनही त्याची परवा न बाळगणारे इतके हरीचे लाल सुखानें कसे जिवंत राहतात कोण जाणे? कर्जबाजारी मनुष्याची लोकांत पत नाहीं, घरांत बोजें[2] नाहीं. त्याच्या चित्तांत स्वास्थ्य नाहीं, मनांत आनंद नाहीं, डोळ्यांत झोंप नाहीं, अन्नांत रुचि नाहीं, आणि

१ चिंता. २ वजन, प्रतिष्ठा.

शरीरांत जीव नाहीं अशीच अवस्था असते; ही सर्वांच्या प्रत्यक्ष किंवा परंपरया[1] अनुभवास येणारी गोष्ट. तेव्हां वास्तविक पाहतां त्यापासून राहवेल तितकें दूर राहावें हा शहाणपणा खरा. पण कित्येक प्रसंग असे येतात कीं, तेथें अगदीं बिनतोड होते. फार कशाला, माझीच गोष्ट पहाना. एकंदरींत काय! कर्जास वर्मेन[2] मानून दूर राहावें हें शहाण्या माणसाचें काम. रात्र असो, दिवस असो, सण असो कीं वार असो, सावकाराचें बिचारें व्याज हें चाललेलें असावयाचेंच. एक प्रकारची दगदग कमी करावी म्हणून मीं ही खटपट केली, तों पहिलीच्या दुप्पट रुखरुख जिवास लागून राहिली, हा काय भोग म्हणावा? अशा नाना प्रकारच्या कल्पनांचें भटकणें चाललें होतें. तें सर्व डोक्यांत घेऊन मी घरीं आलों. संध्याकाळची वेळ, संध्या करून कांहीं थोडें घ्यावें, तर मन अगदीं उदास झालेलें. मी उदास असलेला पाहून तीही फार खिन्न व सचिंत होई. माझी काळजी तरी कोणती आहे हें कळून घेण्याचा ती पुष्कळ यत्न करी. माझ्या अनुभवावरून मी खास सांगतों, गृहिणी म्हणजे संसारक्लेश झाडून काढणारी केरसुणीच आहे! पतीला सचिंत पाहून देखील कावरेंबावरें होणारें तिचें नेत्रयुग्म, प्राणप्रियाला संकट काय आहे तें जाणून घेऊन आपण त्याचे विभागी व्हावें या इच्छेचीं पूर्ण दर्शक व सूचक अज्ञानजन्य तिचीं प्रश्नोत्तरें, आधींच संतापलेल्या प्रियाच्या जिवास एवढ्याशा गोष्टीपासून देखील जास्त त्रास होईल म्हणून पोटच्या पोरांवर कोणास न कळत डोळे फिरवून धाक दाखविणें, किंवा प्रसंगीं खसकन् अंगावर धांवून जाणें, खप्पा झालेली मर्जी तोलावर

---

१ दुसऱ्यांच्या अनुभवावरून, अप्रत्यक्षरीत्या. २ ओक, तिरस्करणीय गोष्ट.

धरण्याकरितां मनःपूर्वक झटणें, इत्यादि गोष्टींनीं ती तेव्हांच नवऱ्याचा राग किंवा त्याची काळजी दूर करून सोडते. मी सध्या करण्या-करितां म्हणून पाटावर बसलों खरा, पण आंत मनाशीं काय? सावकार, त्याचें देणें, घरांतलें कांहीं किडूकमिडूक, मुलाच्या नौकरीचें मनोराज्य, या घालमेलींशिवाय कांहीं सुचेना. समईपाशीं फराळाचे पोहे निवडण्याचें निमित्त काढून ती मजजवळ येऊन बसली, आणि मधून मधून हळूच एखाद दुसरा प्रश्न दबत दबत विचारूं लागली. त्याला होय, नाहीं, कांहीं तरी मी उत्तर देत असें. तेव्हां तिनें निराळाच एक प्रश्न काढला. "मोरूभावोजी आपल्या बगीला एक नामी स्थळ आहे म्हणत होते. 'जमविण्याचें काम माझें, तुम्ही दोघें अगोदर कबूल तर व्हा. स्थळ म्हणजे काय अगदीं उत्तम. दागदागिने, वस्त्रपात्र, अगदीं कश्शाची कांहीं पंचाईत नाहीं,' असें ते म्हणत होते." माझें मनही तिकडे एकदम गेलें. म्यां म्हटलें, 'काय मोरोबा? आपले मोरोबा! मग त्यांनीं नाहीं मजपुढें कधीं ही गोष्ट काढिली? ते कधीं तुला सांगत होते?'

**ती:**—वाः, एकच का दिवस! परवांपासून चार पांच वेळ झालें. ती शेजारची उमा आली होती नाहीं? त्याच दिवशीं वाटतं ते मला म्हणाले, 'वहिनी, बगीला स्थळ पण कसें सोन्यासारखें पाहिलें आहे!'

**मी:**—हं? अस्सं? बरें विचारूं उद्यां; पण कुठें इथेंच का दुसरी-कडे कोठें आहे?

**ती:**—तें बाई नाहीं मला तेवढं ठाऊक; पण म्हणत इथेंच आहे म्हणून. इतक्यांत बगी वेडें वांकडें तोंड करीत 'बघ ग ही

चिंगी मला बाळासाहेब नेन्यांची बायको म्हणून म्हणते' अशी कागाळी घेऊन आली. तेव्हां मला मोठा चमत्कार वाटला. मीं तिला पुसलें, 'बगडे, कोण ग बाळासाहेब ते?' त्याला तिनें, 'मला नाहीं माहीत,' असें झणकाऱ्याचें उत्तर दिलें, आणि तिला खडसून म्हणाली, 'आई, मी नाहीं बघ अं आतां मोरूकाकाच्या घरीं जेवायला जायची. तोही तिथं मला असंच जेव्हां तेव्हां विचारीत असतो. तुला सोन्याचा पट्टा देववितों बघ, म्हणतो.' असें म्हटल्यानंतर पुनः त्या मुलीबरोबर ती भांडावयास चालती झाली! तेव्हां ती ओरडून म्हणाली, 'कोणग—चिंगे, जा आतां घरीं. आई रागें भरेल बघ. रात्रीं का घर सोडून बाहेर धिंगाणा घालावा? बगडे! चल इकडे ये!'

अशीं हीं बोलणीं ऐकून तर्काच्या वावटळी उठण्यास आरंभ झाला. मला माहीत नव्हतें कीं, मोरोबाचे बाळासाहेब विधुरावस्थेंत[1] आहेत हें. एवढें कळल्यानंतर सर्व गोष्टींचा बरोबर संबंध जुळूं लागला, आणि मनास वाटलें कीं, या ठिकाणीं मतलबानें डबडबलेले सर्व व्यवहार आहेत. मला जाळ्यांत पकडण्यासाठीं या एकंदर खटपटी असाव्या. आणि एवढें कळल्यावर मग काय विचारावयाचें आहे? काळजीस एकीकडे सारून शंका पुढें येऊं लागल्या, आणि त्या शंकांच्या पाठोपाठ भीति व भीतीपुढेंच एक एक पाऊल वैताग मजवर चाल करून आला. संध्या स्तोत्रें राहिलींच बिचारीं मधल्यामध्यें! हें संसारतापाचें स्तोत्र काय कमी आहे? असो. माझी पुरी फजितीच

---

१ विधुर=ज्याची पत्नी मृत झाली आहे तो.

मांडावी अशी जर विधा[1]त्याची मर्जी, तर तेथें आम्हीं तरी काय करावयाचें आहे ? अशा विवंचनांनीं[2] थोडें समाधान मानून घेऊन मीं ती रात्र कशी तरी लोटली. मोरोबाची भेट झाली म्हणजे जास्त खुलासा होईल अशी समजूत काढून मी स्वस्थ बसलों. वास्तविक पाहतां मीं काळजी करावी असा प्रकार कांहीं तूर्तास नव्हता. मुलीचें लग्न करावयाचें, त्याला अजून थोडी अवधीही होतीच. शिवाय अमक्याला देणें किंवा तमक्याला न देणें याचे आम्ही मुखत्यार आहोंच. तर मग आपणांस काळजी ती कशाला, असें वाटे. परंतु बाळासाहेब नेन्यांचे उपकार व मोरोबाचा स्नेह हींच काय तीं लचांडें मध्यें येत. आम्ही पुण्यास परक्या ठिकाणीं आलों, ते कोणाचा तरी लोभ संपादावा म्हणून, एवढ्याच काय त्या शंका.

## भाग ३ रा

दुसरे दिवशीं मोरोबा आले. त्यांनीं येतांना हातांत एक कागदही आणला होता. मला पाहतांच, ' अप्पा, झाली बरें फत्ते. हा मोरोबा तुमचा गेल्या जन्मींचा ऋणकरी खरा. हें पहा दानपत्र ' असें म्हणून ते मजपुढें, ' कां कसं आहे आतां ? नशीबवान् खरे तुम्ही, ' एवढ्यावर बोलणें संपवून बसले. तें दानपत्र हातीं घेतलें आणि आरशी लावून वाचून पाहिलें तों तें खरेंच माझ्या नांवचें. ' वहिनी, अहो वहिनी, आपल्या यजमानांनीं एक घर आणि लहानसें एक शेत मिळविलें बरें–पुण्यास येऊन '–असें मोरोबा बोलले. त्यासरशीं ओलेत्यांनीं ती हकीकत खरी कीं खोटी हें पाहण्यासाठीं म्हणून ती

१ ईश्वर, सृष्टिकर्ता. २ काळजी.

आम्ही बसलों होतों तिकडे अंगावर पाणी गळत आहे तें तसेंच घेऊन, व एका हातांत ओले ओचे आवळून धरीत, आणि आमच्याकडे पाठ करीत आपली मान मुरडून विचारूं लागली. तेव्हां तिच्या अंगावर मी वसकन् गेलों आणि म्हटलें, 'अग हो पलीकडे! काय रीत कीं काय ही? जा लुगडें तरी नेसून ये!' तेव्हां तिचें उत्सुक मन मोठें खट्टू झालें आणि ती जी आंत गेली ती परत बाहेर आलीच नाहीं. मोरोबा म्हणाले, 'अप्पा! आमचे यजमान मोठे योग्य पुरुष बरं. ही सारी खटपट तरी त्यांचीच. तुमची तरी त्यांनीं केवढी स्तुति केली, आणि द्यावयाचें तर तुम्हांलाच द्यावें म्हणून त्यांनीं किती आग्रह केला म्हणतां, कांहीं बोलून सोय नाहीं.'

**मी:**—मोरोबा, भूमिदान[1] आणि गृहदान घेणें मला बुवा कसेंसेंच वाटतें! हा संस्कार विनाकारण घडतो आहे येथें आपल्याला—नाइलाजास्तव.

**मोरोबा:**—द्या सोडून. माझा कुठं आग्रह आहे? दहा पंधरा खण जागा आणि टिपणीभर शेत म्हणजे काय थट्टा आहे? मला नसतें का तें करून घेतां आलें आपल्या नांवानें? पण म्हटलें कीं मी काय लंगधंडक[2]. पोर ना बाळ. तुम्ही योग्य ब्राह्मण, दशग्रंथी[3], कुटुंबवत्सल, म्हणून तर मीं ही खटपट केली, नाहीं तर माझें हो काय अडलें होतें?

---

१ कांहीं प्रकारचीं दानें कमी प्रतीचीं, तीं चांगल्या ब्राह्मणांनीं घेऊं नयेत अशी समजूत आहे. २ फटिंग. ३ वेद व वेदांगें मिळून दहा ग्रंथ होतात. त्या सर्वांचें अध्ययन केलेला.

ह्याला काय उत्तर द्यावें कळेना; एकीकडे काल रात्रींच्या शंका, पापपुण्याची भीति, आणि दुसरीकडे आशा, संकटस्थिति, आणि घरीं चालून आलेलें गमावण्याची भीति. तेव्हां करावयाचें तरी कसें या विचारांत पडलों. अखेरीस होय नाहीं होतां होतां ठरलें तें दानपत्र कबूल करण्याचें, आणि काय ? त्या दिवशीं मोरोबा घरीं निघून गेल्यावर दुपारीं तिला मी ही हकीकत सांगूं लागलों तेव्हां ती नीट ऐकेचना. सकाळच्या बोलण्याचा तिला राग आलेला. ती आंतून ऐकत उभी होती हें मला माहीत होतें, पण आपला राग मला दाखवावा म्हणून चौकसपणें विचारपूस न करतां ती आपली रागावूनच बसली. तेव्हां मी चिरडीस आलों आणि म्हणालों, ‘ या बायकापोरांकरितां तर हीं दानें आणि द्रव्यें मिळवून पापपुण्याचे धनी आपण व्हावें, आणि त्यांना तर आपली गरज नसावी, काय चमत्कार आहे ? माझ्याबरोबर यांतील काय यावयाचें आहे ? सर्व जेथल्या तेथें ! ’ त्यासरशीं तिनें आपला रागाचा आव सोडला आणि मग लाडीगोडीच्या भाषणास सुरुवात केली. “ बरें झालें बाई, स्वतःचें घर तरी रहायला मिळालें. नको नको रे देवा, हीं भाड्याचीं घरें. त्यापेक्षां मेली धर्मशाळा बरी. ‘ इथं केरच टाकूं नका, तिथं खिळाच मारूं नका, इकडनं वहिवाट नको, अन् तिथून वर्दळ कशाला ? ’ अशी मेल्यांची जाचणूक सोसावी तरी कशी अन् किती ? ” असल्याही पुष्कळ वटवटी चालू झाल्या. त्या संपविण्याकरितां मीं तिला म्हटलें, ‘ काय ग, मोरोबाचा यजमान फार भला दिसतो. त्याचे उपकार तर आमच्यावर फार होत चालले. आम्ही भटभाई; आम्हांला कोणीं कांहीं दिलें, किंवा कोणीं किती उपकार केले तरी

त्यांत मुळीं आम्हांस नवलच वाटत नाहीं, आणि त्यांचे ते उपकार नव्हेत असें आम्ही समजतों; कारण तो धर्म बोलून चालून, व त्याचें फळ त्यास दुसरीकडून[1] मिळावयाचें असतें. पण यांत बाळासाहेबांचा कांहीं मतलब तर नसेल ना ?'

**तीः**—हं, आला आहे मतलब! काय तरी बाई चमत्कार! तो कसला भला माणूस आहे! श्रीमंती पुष्कळ, वागणूक चांगली, पदरीं माणसं किती, धर्म करावा ही बुद्धि; आणि अशा पुरुषाबद्दल कां उगीच आपलं कांहीं तरी म्हणावं ?

इतक्यांत मोरोबा पुनः आंत आले. त्यांनीं हें सर्व भाषण ऐकिलें असावें असें वाटतें. ते आंत येऊन बैठकीवर बसून म्हणाले, 'काय म्हटलेंत वहिनी ? आमच्या यजमानांची काय निंदा चालली होती ? मला ऐकूं द्या तर खरी.'

**तीः**—छेग बाई! तुमच्या यजमानांची कोणीं निंदा केली ? आणि बिचाऱ्यांची निंदा करणार तरी कोण ? हजारांत एक तरी तसा माणूस मिळेल काय ?

'वाः! एकून तुम्हांस पसंत आले तर आमचे बाळासाहेब ? मग द्याना तुम्ही आपली मुलगी त्यांना! बगडीला ते अगदीं जीव का प्राण करतील बघा!' असें किंचित् हंसत व थोडेंसें थट्टेवर नेल्यासारखें मोरोबा बोलले. त्यांची ती थट्टाच समजून तिनें उत्तर दिलें, 'हो! माझी कबुली. असला जावई आम्हां दरिद्र्यांना मिळणार तरी कसा ?' तें मोरोबास खरें वाटलें. एखाद्या वस्तूसाठीं मनुष्य

---

१ ईश्वराकडून.

अति लोलुप झाला म्हणजे त्याला खरें आणि खोटें सुद्धां कळेनासें होतें, तशांतली गत आमच्या मोरोबाची. पण हें ऐकून मी मात्र मनांत दचकलों. भीत होतों तीच गोष्ट बाहेर पडली. मोरोबाचा यजमान श्रीमंत खरा, आणि सद्गुणी व समंजस असेल, व त्याचें घराणेंही बालबोध असेल, पण वय चाळिशीच्या घराला आलेलें, असल्याला का ही आमची बगडी द्यावयाची ? असा मीं आपल्या मनाशीं विचार केला, आणि मोरोबाला म्हटलें, ' मोरोबा ! तुमचें मत बगडी बाळासाहेबांस द्यावी असें का आहे ? तुमच्या आमच्या सल्ल्यास पसंत पडेल तर ती गोष्ट करावयाची, म्हणून विचारतों, तुम्हांला कसें वाटतें ? ' या माझ्या वाक्याचा झोंक जाणून घेण्याइतकी मोरोबाच्या अंगीं चाणाक्षता नव्हती. म्हणून तो म्हणाला, ' हो ! हो ! खुश्शाल द्यावी. मला तर बुवा तें स्थळ फार नामी दिसतें; आणि तुम्हांला तरी नापसंत पडेल असें त्यांत काय आहे ? येऊन जाऊन वयच कीं नाहीं ? बगडीला दहावें वर्ष असेल, आणि त्यांचें फार झालें तर ३०।३२ च कीं नाहीं ? बगी पहा उद्यां हां हां म्हणतां वाढेल. ती मोठ्या उफाड्याची बायको आहे. '

मीं म्हटलें, ' मोरोबा, सारें खरें, पण वधूवरांत वयाच्या अंतराला कांहीं तरी सीमा असते ना ? वीस पंचवीस वर्षांचें अंतर ? '

**मोरोबा:**—ऊँ:, त्याचें नका तुम्ही मनांत आणूं. चाळीस, पंचेचाळीस आणि पन्नास वर्षांच्या थेरड्यांनीं देखील लग्नें लहान लहान पोरींशीं लाविलेलीं तुम्हांला किती दाखवूं ?

हें मोरोबाचें भाषण ऐकतांच मला संताप आला. आणि मीं

रागावून मोरोबास म्हटलें, ‘ मी खाटिक नाहीं, माझी पोर असल्या थेरड्यास द्यावयाला ! पोटची पोर थेरड्याच्या गळ्यांत बांधण्यापेक्षां बेधडक तिला विहिरींत ढकलून देणें बरें ! मुलगी म्हणजे काय ती परसांतली भाजी, कां जनावर, कां आहे तरी काय ? चांगलें सुस्थळ बघावें, योग्य वर पसंत करावा, तिला सुख होईल म्हणून झटावें, हीं आईबापांचीं कामें. आंतड्याचा[1] धर्म आंतड्याला माहीत. आपण हयगय करून किंवा डोळे झांकून चुकारतट्टाप्रमाणें तिला भलतेंसलतें स्थळ पाहून द्यावें आणि तिला दुःख होऊं लागलें म्हणजे मग आई-बापांच्या नांवानें तिनें अक्षय्य खडे फोडीत बसावें, हें कोणाला पसंत पडेल ? आईबापांवर सर्वस्वीं अवलंबून असणारी बिचारी गाय ती ! ’—अजून मी पुढें बोलणार तोंच मोरोबा म्हणाले, ‘ पण अप्पा ! मी का बगडीस विकत द्या म्हणतों, तुम्ही इतके रागावतां ते ? हुंडादेखील द्यावयास नको म्हणून मीं आपलें तुम्हांस स्थळ दाखवून दिलें. सर्व गोष्टी एके ठिकाणीं मिळणार कशा ? ’ ह्या त्याच्या बोलण्यामुळें माझ्या तोंडांतून शब्द देखील निघेना; तरी तशांतच म्हटलें, ‘ आपल्या पोटच्या पोरी थेरड्यांच्या गळ्यांत नेऊन बांधणाऱ्या मांगांचें नांव ऐकतांच सचैल स्नान करावें ! पोरी विकणाऱ्यांस आईबाप का म्हणावयाचें ? अहो ते मांग ! कसाब ! म्हार ! ’ हें माझें बोलणें चाललेंच होतें, इतक्यांत मोरोबास कोणी बाहेर हांक मारावयास आलें, म्हणून ते निघून गेले. नंतर कांहीं वेळानें माझा राग थोडासा शांत झाला, पण जिवाला मात्र अगदीं चैन पडेना.

---

१ प्रेमाशिवाय अशा गोष्टी कळत नसतात.

मनांत नाना तऱ्हेचे विचार घोळूं लागले. मोरोबाचा स्नेह, त्याच्या यजमानाची भलाई, इत्यादि एकूनएक गोष्टींचा संबंध आतां अगदीं बरोबर माझ्या ध्यानांत आला, आणि ‘ मतलबाशिवाय मनुष्य नाहीं ’ अशी माझी बालंबाल खात्री झाली.

---

प्रश्नः—( १ ) वरील प्रकरणाचा सारांश सुमारें वीस ओळींत सांगा.

( २ ) कर्ज नको असें त्रिंबक भटजीस कां वाटत होतें ?

( ३ ) “ बायका काय, तोबऱ्याला तेवढ्या पुढें ! ”

“ गृहिणी म्हणजे संसारक्लेश झाडून काढणारी केरसुणी आहे. ”

या दोन वाक्यांत बायकांविषयींचे कोणते भिन्न विचार दृष्टीस पडतात, व त्याविषयीं तुम्हांस काय वाटतें ?

( ४ ) ‘ म्हण ’ म्हणजे काय ? वरील प्रकरणांतील पांच म्हणी निवडून काढून त्यांचा अर्थ सांगा.

---

## २

# शूर बालक

यूरोपखंडांत स्विट्झर्लंड म्हणून एक छोटेखानी प्रदेश आहे. आल्प्स् पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांत वसलेला, व प्रायः निर्धन असा हा देश प्राचीन कालापासून स्वातंत्र्याचें माहेरघर म्हणून प्रसिद्ध आहे, व यूरोपखंडांत अनेक घडामोडी, राज्यक्रांत्या झाल्या तरी या चिमुकल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य कायम राहिलें आहे. मध्यंतरीं कांहीं काल या देशास

आस्ट्रियाच्या अमलाखालीं राहावें लागलें होतें, पण लवकरच त्यानें आपल्या मानेवरचें जूं फेकून दिलें. या दरम्यानच्या परवशतेच्या काळांत घडलेली एक गोष्ट येथें सांगतों. म्हणजे या लोकांचें स्वातंत्र्य कां टिकून राहिलें आहे हें स्पष्ट होईल.

सुमारें सहाशें वर्षांपूर्वींची गोष्ट. **वुइल्यम टेल्** या नांवाचा एक गवळी होता. तो अंगापिंडानें मजबूत असून त्याला शिकारीचा फार नाद होता. तीरकमठ्यानें निशाण मारण्यांत तर तो प्रति अर्जुनच होता. डोंगरावर सरड्यासारखें भराभर चढून जाणें, हरिणांच्या पाठीमागें मैलचे मैल दौडणें, व धावत्या सावजाला अचूक तीर मारणें ह्यांत त्या वेळीं त्याचा हात धरणारा माणूस साऱ्या स्विट्झर्लंडांत नव्हता. तो आपला पशुपालनाचा धंदाही मन लावून करी, व एकंदरीनें सुस्वभावी असल्यानें त्याला लोक फार मानीत असत.

त्याला सुमारें दहा वर्षांचा एकच मुलगा होता. मुलाच्या जन्मानंतर लौकरच त्याची आई निवर्तली, त्यामुळें या मुलाचा त्यास फारच लळा लागला होता. तो कोठेंही गेला तरी मुलगा बरोबर असेच. तो गुरें, शेळ्यामेंढ्या वळण्याचे कामीं बापास मदत करी; शिकारीचे प्रसंगीं बापाच्या मागोमाग जाई; त्याची निशाणबाजी लक्षपूर्वक पाही; त्यास केव्हां केव्हां आपल्या खेड्याहून आल्टॉर्फ् शहरीं कामानिमित्त जावें लागे, तेव्हांही मुलगा बरोबर असेच.

आल्टॉर्फ् हें त्या वेळच्या आस्ट्रियन सुभेदाराचें ( गव्हर्नर ) ठाण्याचें गांव होतें. सुभेदार फारच तऱ्हेवाईक माणूस होता. ‘ हम करे सो कायदा ’ हा त्याचा बाणा. दुष्टपणा, क्रूरता, हे गुण त्याच्या

पांचवीला पुजलेले. माझा हुकूम प्रत्येकानें बिनतक्रार पाळला पाहिजे, असें त्यास वाटे.

एकदा बाजारहाट करण्यासाठीं वुइल्यम् टेल् आल्टॉर्फ्ला गेला असतां त्याला पुढील चमत्कार दृष्टीस पडला. बाजारच्या चवाठ्यावर एक उंच काठी रोंविली होती, व तिच्या टोंकावर एक टोपी ठेविली होती. या काठीशेजारींच सुभेदारसाहेब ( याचें नांव ' जेसलर ' होतें ) घोड्यावर बसलेले होते. व त्यांच्या भोंवतीं त्यांच्या परिचारकांची गर्दी होती. जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक माणसानें त्या टोपीच्या निशाणासमोर साष्टांग प्रणिपात करून तिजबद्दल आपली पूज्यबुद्धि व्यक्त केली पाहिजे, असा हुकूम सुभेदारानें आज सोडला होता. " खबरदार, ए बदमाश भिकारड्यांनो, जर कां माझ्या टोपीपुढें गुडघे टेंकून तुम्हीं तिला सलाम केला नाहीं, तर तुमचीं शंभर वर्षे भरलींच असें समजा ! "—असें तो मोठमोठ्यानें ओरडून सांगत होता.

वुइल्यम् टेल् जेव्हां त्या बाजूला आला तेव्हां सुभेदारास सलाम करून नेहमींप्रमाणें तो पुढें जाऊं लागला. तेव्हां सुभेदारांच्या अंगाचा भडका झाला. " खेचा त्या कुतरड्याला इकडे "—तो खेंकसला; " त्याला म्हणावें, माझ्या टोपीला सलाम कर, नाहीं तर मरणाला तयार हो. " सैनिकांनीं अर्थातच वुइल्यम्ला खेंचून आणलें. पण वुइल्यम्नें तो अपमानकारक हुकूम बजावण्याचें साफ नाकारलें. तो म्हणाला, " मी सुभेदार साहेबांस सलाम करीन; पण कोणत्याही माणसापुढें गुडघे टेंकणार नाहीं, मग टोपीपुढें गुडघे टेंकणें तर लांबच राहिलें. मी फक्त ईश्वराचीच प्रार्थना गुडघे टेंकून करतों, इतर कोणाचीही करीत

नाहीं ! तुम्ही वाटेल तर माझा प्राण घ्या, पण माझी सदसद्विवेकबुद्धि कांहीं तुम्ही हिरावून घेऊं शकत नाहीं!"

"करा ठार या गुलामाला ! "—सुभेदार ओरडला; "माझा हुकूम मानीत नाहीं म्हणजे काय ? भोगूं दे त्याला या उर्मटपणाचें प्रायश्चित्त ! "

शिपाई काय हुकमाचे ताबेदार ! ते आपल्या धन्याची आज्ञा पाळण्यास सज्ज झाले. त्यांची कट्यार आतां वुइल्यम्च्या पोटांत घुसणार इतक्यांत सुभेदारसाहेब जरा स्मितपूर्वक ओरडले, "थांबा जरा; मीं ऐकलें आहे कीं, हे पहाडी स्विस् लोक मोठे बांके तिरंदाज असतात. मला पहावयाचें आहे हें कितपत खरें आहे. या पोराला त्या समोरच्या झाडाखालीं उभा करा; व त्याच्या डोक्यावर एक सफरचंदा ( सेव ) चें फळ ठेवा. मुलापासून पन्नास कदम दूर उभें राहून जर या माणसानें तिरानें त्याच्या डोक्यावरील फळ वरचे वर उडविलें, तर त्या दोघांनाही मी सोडून देईन. पण जर का फळा-ऐवजीं मुलास तीर लागला, तर मात्र दोघांसही प्राणास मुकावें लागेल!"

त्या दुष्टाच्या मनांतला भाव असा होता कीं, वुइल्यम्नें मुलाच्या डोकीवरील फळ उडविण्याचा यत्न केला तर बहुधा त्याचा मुलगाच मारला जाईल. किंवा त्यानें हें धाडस करण्याचें नाकारलें, अगर तें करूनही मुलगा किंवा फळ यांपैकीं कोणालाच तीर लागला नाहीं, तर त्याला मरणाची शिक्षा द्यावयाचीच आहे.

ही कल्पना इतकी चमत्कारिक होती कीं प्रथम वुइल्यम्चा

तिच्यावर विश्वासच बसेना. स्वतःच्या मुलाचा खून करण्यास भाग पाडणारा राक्षस या पृथ्वीतलावर असेल असें त्याला कधींही वाटलें नव्हतें.

तो म्हणाला, " हें पहा, तुमचा अपराध जर कोणीं केला असेल तर तो मीं ! माझें तुम्ही काय वाटेल तें करा; पण त्या बिचाऱ्या अर्भकाचा कां बळी घेतां ? "

" माझा तसा हुकूम आहे ! त्याप्रमाणें तीरकमठा चालव, नाहीं तर मरणाला तयार हो ! नेम चुकला, तरी तुम्हा दोघांना मेलेंच पाहिजे ! "—सुभेदार निष्ठुरपणें उद्गारला !

झाडाखालीं उभें केलेल्या मुलाकडे एक वार वुइल्यमनें नजर फेंकली. मुलगा भीतीनें अर्धमेला झाला असेल, किंवा रडूनभाकून करुणेची याचना करीत असेल अशी त्याची अपेक्षा होती. पण ती सपशेल चुकली. तो ताठ व निर्भयपणें उभा राहून बापाच्या तीराची वाट पहात होता. मुलाची निधडी छाती पाहून बापास अभिमान-युक्त आनंदाचें भरतें आलें. पण जास्त वेळ घालविण्याची सोय नव्हती. मन दगडासारखें घट्ट करून त्याच्या शिराकडे बाण रोखणें भाग होतें.

क्षणभर तो कां कूं करीत होता; पण इतक्यांत तो शूर बालक म्हणाला, " बाबा ! उशीर कां लावतां ? हा पहा, मी अगदीं शांत व निश्चळ उभा आहें. सरळ तीर मारून फळ उडवून द्या, व आपणा दोघांचाही प्राण वांचवा ! "

"जीते रहो, बेटा, ईश्वर तुझें रक्षण करो"—वुइल्यम् म्हणाला; "तुझ्या धिटाईनें माझें गळालेलें धैर्य फिरून परत आलें आहे!"



**चित्र १—वुइल्यम् टेल् आपले धनुष्यानें सफरचंद उडवीत आहे**

त्यानें आपलें धनुष्य वांकविलें, व त्यास तीर लावून काळजीपूर्वक नेम धरला, व सूं सूं करीत तीर सोडला! एका क्षणांत त्या फळाचे दोन तुकडे होऊन पडले, व तो तीर पलीकडील झाडाच्या खोडांत जाऊन घुसला! मुलगा एक रेसभर सुद्धां हालला नव्हता.

"शाबास, याचें नांव तिरंदाजी!" सुभेदारसाहेब उद्गारले. "मी आपलें वचन खरें करतों. माझे आभार माना आणि तुम्ही वाटेल तिकडे जा!"

वुइल्यम्चें उत्तर फार लक्षांत ठेवण्यासारखें होतें. तो म्हणाला; "मी तुमचे आभार नाहीं मानीत; पण माझा नेम अचूक साधल्या-

बद्दल **ईश्वराचे** मात्र मानतों. पण तुम्ही मात्र हें ध्यानांत ठेवा कीं, जर का माझा पहिला तीर माझ्या बाळाच्या डोक्यांत घुसता, तर दुसरा तीर खास तुमच्या डोक्यांत घुसला असता ! ”

असे बाणेदार पितापुत्र जेथें जन्माला येतात तो देश स्वातंत्र्याला खास पात्र नाहीं काय ?

---

**प्रश्नः**—( १ ) गोष्टीचा सारांश थोडक्यांत सांगा.

( २ ) टोपीला सलाम करण्याचा आग्रह सुभेदारानें कां धरला होता ?

---

# ३

# समुद्र

[ खालील लेख गद्यकाव्याचा एक नमुना आहे. कै. वा. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं माजी शालापत्रक मासिकांत तो लिहिला होता, व सुंदर भाषांतराचा एक नमुना म्हणून कै. विष्णुशास्त्र्यांनीं आपल्या निबंधमालेंतही तो दिलेला आहे. हें भाषांतर मूळच्या कोणत्या इंग्रजी लेखाचें आहे तें मात्र कोठें दिल्याचें पाहण्यांत नाहीं. ]

हे सागरा ! तुझ्या अफाट विस्ताराकडे पाहून जों जों विचार करूं लागावें, तों तों नव्या नव्याच कल्पना मनांत येऊं लागून बुद्धीस अधिकाधिक चमत्कार भासतात, आणि आश्चर्यभरांत चित्त अगदीं थक्क होऊन जातें ! ज्याप्रमाणें मनुष्यांच्या पिढ्यानपिढ्या एकामागून एक जन्मास येऊन कांहीं काळानें लागल्याच विलयास जातात,

त्याप्रमाणें तुजवर हजारों लाटा एकावर एक येऊन भराभर बुजून नाहींतशा होतात, आणि त्यांच्याप्रमाणें यांच्या वास्तव्याची खूण देखील मागें रहात नाहीं ! तुझ्या लाटा साऱ्या पृथ्वीच्या किनाऱ्यावर आदळत आहेत, आणि ज्यांचें निकट सान्निध्य त्यांच्या वैरास मात्र कारणीभूत होतें, अशा देशांची तोडातोड करून तूं त्यांचें कलाकौशल्य व संपत्ति हीं परस्परांस देववितोस, व येणेंकरून सर्व जगास तुझ्यामुळें सुखाचा व समृद्धीचा लाभ होत आहे.



चित्र २—समुद्र

तुझे देखावे तरी निरनिराळ्या समयीं किती विचित्र असतात ! त्यांची शोभा व भव्यपणा हीं कोठवर वर्णावीं ! कधीं वाऱ्याची हालचाल अगदीं बंद होऊन तुझा सर्व विस्तार अगदीं निश्चल दिसतो; कधीं नुकताच सूर्योदय झाला असल्यामुळें क्षितिजाची कड रुप्यानें

जणूं काय मढविलीच आहे अशी भासते; कधीं तोच सूर्य अस्तास जाऊं लागून संध्याकाळचें आकाश त्याच्या सोनेरी किरणांनीं देदीप्यमान झालेलें असतें, व अशा वेळेस आरशाप्रमाणें स्थिर अशा तुझ्या पाण्यावर जेव्हां आकाशाची कमानच्या कमान शाबूत उठलेली असते, तेव्हां तर ती शोभा काय सांगावी! पण हीं सर्व सौम्य रूपें टाकून जेव्हां तूं आपलें उग्र स्वरूप धारण करतोस, जेव्हां काळ्या दाट ढगांनीं आकाशांत गाढ अंधार होऊन तुफानी वाऱ्यांच्या सोसाट्यांनीं तूं अगदीं खवळून जातोस, व तुझ्या प्रचंड लाटा उसळून मेघमंडळाशीं एकवट होऊं पाहतात, जेव्हां मृत्यु आपलें भयंकर आधिपत्य तुजवर चोहोंकडे गाजवीत असतो, जेव्हां अशा तडाख्यांत सांपडलेला बिचारा खलाशी भयानें गर्भगळित होऊन त्याचे सर्व प्रयत्न निष्फळ होतात व त्याचे इष्टमित्र त्याजकरतां जागच्या जागीं हळहळत असतात, अशा भयंकर प्रसंगीं तुजकडे पाहण्याची कोणाची छाती आहे!

हे रत्नाकरा! इतकें झालें तरी हे सर्व खेळ केवळ तुझ्या पृष्ठभागावरचे! तुझें आंत जें विस्तीर्ण राज्य आहे त्यांत तर काय काय चमत्कार असतील याची कल्पना तरी कोणीं करावी? तेथें जे मोठमोठाले खडपे व विशाल दऱ्या असतील, त्यांत जे नानाप्रकारचे हजारों प्राणी व वनस्पति असतील, त्या पाहिलेला कोण मनुष्य आहे! तसेंच रत्नें वगैरे ज्या कोट्यावधि सुंदर वस्तु तुझ्या तळीं लोळत असतील, त्यांचा तरी कोणास पत्ता लागेल काय?

याप्रमाणें विचार पुढें चालले असतां बुद्धि अगदीं कुंठित होऊन जाते, पण जेव्हां तुझ्या भरती-ओहोटीविषयीं विचार करावा—कीं,

जगाच्या आरंभापासून आजपर्यंत ज्या कधींही टळल्या नाहींत–तेव्हां, ज्यानें आपल्या अपार सामर्थ्यानें तुला निर्माण केलें व तुझ्या मर्यादा अशा रेखून टाकल्या कीं, तूं एवढा उच्छृंखल खरा, परंतु त्यांचें उल्लंघन तुझ्यानें होऊंच नये, त्याच्या अगाध महिम्याकडे लक्ष लागून विचारशक्ति गुंग होऊन जाते, व तिची गतिच पुढें होत नाहीं !

---

**प्रश्नः**—( १ ) हें एक "गद्यकाव्य" आहे. 'काव्य' असें यास कां म्हणतां येईल हें दाखवा.

( २ ) समुद्राच्या कोणत्या गुणांचें वर्णन यांत आलें आहे !

( ३ ) एका कवीची नौका समुद्रावरील तुफानांत सांपडून फुटली. तो कसाबसा वांचला. अशा वेळीं संतापानें तो समुद्राचे कोणते दोष दाखवील तें सांगा.

---

## ४

# सकाळ

[ परलोकवासी हरि नारायण आपटे या विख्यात कादंबरीकाराचें नांव कोणास माहीत नाहीं ? "पण लक्ष्यांत कोण घेतो ?" "मी" वगैरे सामाजिक, व "उषःकाल", "सूर्योदय", "गड आला पण सिंह गेला" यांसारख्या ऐतिहासिक उत्कृष्ट कादंबऱ्यांप्रमाणेंच माजी 'करमणूक' पत्रामध्यें त्यांनीं कित्येक छोटे-खानी गोष्टी व लेख लिहिले आहेत. त्यांपैकींच खालील गोष्ट आहे. ]

मी आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें मोठ्या पहांटे उठून हिंडायला गेलों होतों. प्रातःकाळीं आणि त्यांतून गांवाबाहेर–मैदानांतून, टेकड्यां-

वरून, शेतांतून वगैरे—हिंडणें म्हणजे प्रत्यक्ष आरोग्य व आनंद यांच्याशीं मैत्री करणेंच होय. पहांटे घराच्या बाहेर पडून दूर मैदानांत किंवा उंच अशा टेंकडीवर जाऊन त्या वेळची ती सृष्टि-शोभा पहात क्षणभर जरी उभें राहिलें, तरी मनाला इतकें कांहीं मार्दव येतें कीं, मनुष्याच्या कठोर वृत्ति अगदीं स्तब्ध राहून सौम्य वृत्ति उचंबळूं लागतात. तो त्या वेळचा शांत व थंड वारा लागला म्हणजे मस्तक शांत होऊन त्यांतून क्रोध, संताप, चिंता, इत्यादि सर्व तमोविकार अगदीं नष्ट होऊन, प्रेम, सहृदयता[1], सौम्यता इत्यादि सत्त्वविकार जागृत होतात. साधारणतः बहुतेकांचीच अशी स्थिति होते, परंतु माझें अंतःकरण जात्या अत्यंत कोमल असल्यामुळें या प्रातःकाळच्या अत्यंत मनोहर देखाव्यानें तें अगदींच मृदु होत असे. त्यांत आणखी तो वाऱ्यानें फार लांबून वाहून आणलेला सनईचा मधुर शब्द जर कानावर आला तर कांहीं विचारूच नका. माझ्या डोळ्यांत प्रेमानंदाचे अश्रुच उभे राहतात. माझ्याकडे त्या वेळीं कोणीं पाहिलें, तर मला लाजल्यासारखें होतें. असे एकाएकीं माझ्या डोळ्यांत अश्रु आलेले पाहून एक दोन वेळां माझ्या एक दोघा स्नेह्यांनीं मला चमत्कारिक प्रश्न केले होते, आणि त्या वेळीं मला उत्तर देतां आलें नाहींच, परंतु ते अश्रु बाहेर पडले आणि माझ्या थट्टेस कारण झाले ! तेव्हांपासून मी आपला सकाळीं हिंडायला निघालों कीं, कोणाला सुद्धां बरोबर नेत नाहीं. कोणी असलाच तर होतां होईल तों त्याला टाळतों.

---

१ दुसऱ्याचें अंतःकरण समजण्याची शक्ति.

इतकी सगळी प्रस्तावना करण्याचें कारण इतकेंच कीं अशाच एका सुंदर प्रात:काळीं मी थोडासा लांब हिंडायला गेलों होतों. व मी आज ज्या भागाला गेलों होतों तेथें सृष्टीचें प्रात:स्वरूप फारच रमणीय दिसून, त्यांत आणखी वाऱ्यानें मधुर सुवास व मधुर शब्दही वाहून आणून मला अर्पण केल्यामुळें माझें मन विशेष मृदु बनलें होतें. अशा वेळीं कोणचीही आनंदाची गोष्ट पाहिली म्हणजे आपलें मन तल्लीन होणारच. अशा मनाच्या स्थितींत मी बराच वेळ हिंडून, सूर्य विशेष वर आला असें नजरेला येऊन तेथून आपल्या या चिंतामय जगांत परत येऊं लागलों. तथापि मनाची वृत्ति उल्हसित झालेली असल्यामुळें मला जिकडे तिकडे सर्व लोक उल्हसितच दिसत होते—किंवा उल्हसित वृत्तीचे तेवढे माझ्या नजरेला येत होते, असें म्हटलें तर विशेष शोभेल. अशा मनाच्या स्थितींत परत येत, जागृत होऊन व्यवहारास लागणाऱ्या लोकांच्या मौजा पहात पहात चाललों असतां आकाशांतून यावे त्याप्रमाणें खालीं लिहिलेले प्रेमपूर्ण व अत्यंत मधुर असे शब्द माझ्या कानीं पडले. "हें काय बरं हें असं? आतां मला कामाला नको का लागायला? मग तुला लवकर जवळ पाट लोटी घेऊन जेवायला बसायचं ना? उतर तर खालीं, मला जाऊं दे घरांत." "ऊं ऊं ऊं, मी नाहीं जा! तूं बस इथें. मला तूं हवी."

"हवी तर काय झालं? मग जेवायला कोण करील? कशाला रे एवढ्या सकाळींच उठतोस असा त्रास द्यायला? मुलाच्या जातीनं चांगलं पुष्कळ वेळ निजावं तें!" असें म्हणून अत्यंत प्रेमानें चुंबन घेतलें.

या संभाषणांतील पहिल्या वाक्याचा कांहीं भाग माझ्या कानीं पडतांच मीं मागें वळून वर पाहिलें, तों एक तरुण आई आपल्या मुलाला कडेवर घेऊन त्याला खेळवीत आहे असें माझ्या दृष्टीस पडलें. तें मायलेंकरांचें प्रेम पाहून मी इतका वेडा झालों कीं, चट्कन् तेथें थांबलों आणि एकसारखा त्यांच्याकडे पहात व त्यांचें बोलणें ऐकत उभा राहिलों. तरुण स्त्रीकडे अशा रीतीनें पहात राहणें चांगलें नव्हे, रस्त्यानें जाणारे येणारे आपल्याला काय म्हणतील याचें भान सुद्धां राहिलें नाहीं. मी तो त्या मायलेंकरांचा प्रेमालाप[1] ऐकण्यांत व तो प्रेमव्यापार पहाण्यांत इतका गढून गेलों होतों.

त्या तरुण स्त्रीचें तें पहिलेंच अपत्य असावें असें दिसलें. एका-पेक्षां अधिक मुलें होण्याइतकें तिचें वयच झालें नव्हतें. शिवाय त्या वेळीं तो जो प्रेमपूर पाहिला तो मातृस्थितीच्या पहिल्या अनुभवाचाच होय यांत शंका नाहीं. ती तरुणी मोठ्या पहांटेसच उठून आपली वेणीफणी करून, मुलाच्या उठण्याच्या वेळीं त्याचे प्रातर्विधि उरकण्यास तयार झाली असावी. तिचें कुंस किती नीटनेटके बसविलेले होते! अपत्यप्रेमानें तिचें मुख किती उल्हसित झालेलें दिसलें! आजपर्यंत तिच्या मनास दुःखाची छटाही स्पर्शिली नसावी असें दिसत होतें. प्रत्येक दुःख मनुष्याच्या मुखावर कांहीं ना कांहीं तरी आपली खूण ठेवून जात असतें; त्याप्रमाणें त्या तरुण मातेच्या मुखावर एकाही दुःखाची छाया दिसली नाहीं. अशीं मुलें बघण्यास सांपडण्याचें सुंदर भाग्य आपणास

---

१ प्रेम + आलाप = प्रेमाचें भाषण.

क्वचितच लाभतें. यामुळें मी तसाच तिचें व त्या सुंदर गुटगुटित बालकाचें कौतुक पहाण्यास उभा राहिलों. माझी टक एकसारखी लागली होती. परंतु त्या स्त्रीस तें मुळीं सुद्धां समजलें नाहीं. ज्याप्रमाणें मी तिचें व तिच्या मुलाचें कौतुक पहाण्यांत गर्क होऊन गेलों होतों, त्याप्रमाणेंच ती आपल्या मुलाचें कौतुक करून तें पहाण्यांत अत्यंत गढून गेली होती. वरील संभाषण झाल्यानंतर ती त्याला आपल्या दोन्ही हातांनीं धरून उंच करीत होती व 'पडला रे पडला' म्हणून पुनः खालीं आणीत होती. तें मूल गदगदां हंसत होतें,—अहाहा! काय तें मधुर हांसणें! मनुष्य कसाही क्रुद्ध, चिंताग्रस्त, कसाही त्रासलेला, निष्ठुर, कुरठा, नीच, चांडाळ असो, त्या हंसण्यानें त्याचें मन खात्रीनेंच स्थिर होणार; त्याला सुद्धां हंसूं येणार. बालकाचें हास्य आजूबाजूच्यांस हंसविणारच. चित्रांत हंसतें मूल पाहिल्यास हंसूं येतें, मग प्रत्यक्ष पाहिल्यावर काय? मी खाली रस्त्यांत उभा, परंतु माझें हंसूं आवरेना—मी हंसलों; पण येवढें बरें झालें कीं, तें त्या माउलीस ऐकूं गेलें नाहीं. नाहीं तर ती मला पाहून लाजून तेथून निघून गेली असती, आणि तो प्रेमानंद मला पुढें पहाण्यास सांपडला नसता. त्या मुलाला खालीं वर करून हंसविण्यांत गर्क झालेल्या त्या तरुणीचा पदर अस्ताव्यस्त झाला. शेवटीं पार दूर झाला. तरी तिला भान नाहीं. मुलगा फार हंसे त्या वेळीं त्याच्या तोंडांतून लाळ गळे. ती तिच्या तोंडावर पडली, तरी ती चटकन् हातानें पुसून "हा लाळ्या!" एवढेंच म्हणून त्याला पुनः उंच करी. मुलगा उंच झाला म्हणजे टाळ्या वाजवूं लागे त्या खालीं येईपर्यंत तशाच वाजवीत राही. त्यामुळें केव्हां केव्हां

तिच्या दोनही गालावर त्याचे दोन हात बसत. परंतु " अरे गुलामा ! माझ्या तोंडांत मारतोस का ? " असें म्हणून त्याचें मध्येंच चुंबन घेई. तो मध्येंच एकाद वेळ तिची नथ ओढी, तिचे सगळे केंस त्यानें विसकटून टाकले; कुंकवाचा फराटा ओढला. इतके सगळे प्रकार झाले, परंतु त्यांतल्या एकही प्रकाराचें तिला भान नाहीं. ती त्याला नाना प्रकारांनीं खेळवीत होती. शेवटीं वर खालीं करतां करतां दमली. तेव्हां ती भानावर येऊन तिनें त्याला खालीं ठेविलें. पदर ओंचे सांवरले. केंस नीट केले. तोंपर्यंत आपल्याला खालीं ठेवल्याबद्दल तो मुलगा रडत होताच. व ती त्याला " अंमळ झालं काय खालीं ठेवलं म्हणून ?....सारा दिवस अगदीं...." असें कांहीं म्हणतच होती. त्यानें फारच कल्होळ केला, तेव्हां " ये माझी बाई तूं. मी नाहीं कधीं खालीं टाकायची ! " असें म्हणून कडेवर घेऊन घट्ट आवळलें व अत्यंत प्रेमानें त्याचें चुंबन घेतलें. तो वर कडीपाटाकडे हात करून ' आंखि वल हं. आंखि वल ' असें म्हणतच होता. परंतु तितक्यांत ती अगदीं खिडकींत आली व मजकडे दृष्टि जाण्याबरोबर लाजून तेव्हांच मागें सरली. मीही आतां येथें उभें राहण्यांत अर्थ नाहीं असें म्हणून तेथून चालूं लागलों. तथापि त्या पाहिलेल्या देखाव्यानें माझ्या मनावर इतका कांहीं विलक्षण परिणाम केला कीं, वारंवार माझी मान मागें वळून त्या खिडकीकडे डोळे जात. परंतु पुनः ती तरुणी व तें बालक मला प्रत्यक्ष दिसलें नाहीं.

प्रत्यक्ष दिसलें नाहीं असें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, ते दिवशीं सगळा दिवसभर माझ्या डोळ्यांपुढें ती जोडी एकसारखी

दिसत होती. मी आपल्या अनेक उद्योगांत निमग्न असतांनाही तो देखावा माझ्या दृष्टीसमोरून ढळला नाहीं. मला स्वत:ला मातृप्रेमाचा कधीं अनुभव नव्हता; व पुढें दुर्दैवानें एकाकी आयुष्य घालविण्याचा प्रसंग आल्यामुळें स्वत:च्या अपत्याचें सुख काय असतें तेंही कधीं अनुभवण्यास सांपडलें नव्हतें. तथापि त्या प्रेमसुखाचें स्वारस्य काय हें मी चांगल्या प्रकारानें जाणत असें. यामुळें तें प्रात:काळींच पाहिलेलें प्रेमचित्र एकसारखें सारा दिवस माझ्या डोळ्यांपुढें नाचत असून—

" उँगिच कधीं तें रडणें हंसणें ज्यातें शोभा देत ।
कोमल कलिकांसम जेंधिं[2] तुरळक सुरुचिर दिसती दंत ॥
मधुर बोबडे असमंजस ते शब्द जयांतुनि निघती " ।

ही कविता मी एकसारखा म्हणत त्याच्या नादांतच होतों. कांहीं केल्या सकाळचा तो देखावा डोळ्यांसमोरून दूर होईना, आणि ही कविता कांहीं मनांतून दूर जाईना. माझ्या कित्येक मित्रांनीं मला आज तुमची वृत्ति अशी कां म्हणून विचारलें, व ती कविता मला आज इतक्या वारंवार कां म्हणावीशी वाटते, याबद्दल प्रश्न केले. परंतु मीं त्यांस सांगितलें नाहीं. कारण त्यांनीं ती माझी हकीकत ऐकून मला केवळ नादिष्ट मात्र म्हटलें असतें. आपल्या प्रेमळपणा-बद्दल नादिष्ट ही पदवी घेऊन थट्टा उडवून घेण्याच्या मन:स्थितींत मी

---

१ ही कविता भवभूतीच्या उत्तररामचरित नाटकांतील एका श्लोकाचें भाषांतर आहे. जनकराजा सीतेच्या बालपणींच्या लीलांचें स्मरण करीत आहे. हें वर्णन फार यथार्थ असून मनास चटका लावणारें आहे. २ जेव्हां.

नव्हतों, यामुळें मी 'उगीच उगीच' असें कांहीं तरी उत्तर देऊन वेळ मारून नेली. परंतु माझ्या मनांत तो सर्व सकाळचा प्रकार कायम असून ती कविताही जिभेवर कायमच होती.

---

**प्रश्नः**—( १ ) एकटेंच फिरावयास जाणें लेखकास कां आवडे ?
( २ ) सकाळच्या दृश्याचें थोडक्यांत वर्णन द्या.
( ३ ) लेखकाच्या मनावर या दृश्याचा एवढा विलक्षण परिणाम होण्याचें कारण काय ?

---

## ५

# स्वामिभक्त खंडो बल्लाळ चिटनवीस

[ प्रस्तुत चरित्र प्रसिद्ध इतिहासकार श्रीयुत गो. स. सरदेसाई यांच्या मराठी रियासत भाग १ ला, व इतिहाससंग्रह वर्ष २ अंक ३ यांतील बखरवजा चरित्र, यांचे आधारें लिहिलें आहे. ]

छत्रपति **श्रीशिवाजीमहाराज** यांना **स्वराज्यस्थापनेच्या** कामीं व त्यांच्या वंशजांना तें राखण्याच्या कामीं ज्यांचें अत्यंत साहाय्य झालें त्या मंडळींत **चिटनवीस** या प्रभु घराण्याची कामगिरी फार श्रेष्ठ आहे. राजनीति व स्वामिनिष्ठा या दोन्ही बाबतींत या घराण्यांतील प्रमुख पुरुष **बाळाजी आवजी** व त्याचा मुलगा **खंडो बल्लाळ** यांनीं अद्वितीय कर्तबगारी दाखविली. छत्रपति संभाजी यांच्या वधानंतर मराठेशाहीवर जो अनर्थ गुदरला त्या प्रसंगांतून निभावून जाण्यास खंडो बल्लाळ कसा उपयोगीं पडला, हें पुढील हकीकतीवरून कळेल.

बाळाजी आवजीचें पूर्वचरित्र मुद्दां मोठें मनोरंजक आहे, व शिवाजीनें राज्यस्थापना करण्याच्या पूर्वी महाराष्ट्रीयांस कसे दैन्यांत दिवस काढावे लागत होते, याची त्यावरून कल्पना येते. आबाजी हरि चित्रे हे जंजिऱ्याच्या शिद्दी (हबशी) राजाचे दिवाण होते. त्याजवर हबशीसरकारची इतराजी होऊन त्याला व त्याचे भावाला तर हबशानें ठार मारलेंच, पण त्याच्या बायकामुलांस मस्कत[1] येथें नेऊन गुलाम म्हणून विकण्याचा हुकूम झाला! आबाजीची पत्नी गुलबाई ही धूर्त होती. तिनें खलाशांचें मन वळविलें, व त्यांनीं तिला मस्कतकडे न नेतां राजापूर येथें आणून सोडलें. राजापूर येथें गुलबाईचा भाऊ विसाजी शंकर हा एक मोठा व्यापारी होता. त्यानें गुलबाई ही आपली वहीण आहे अशी ओळख न देतां खलाशांपासून त्या मंडळींस विकत घेतलें. बाळाजी हा गुलबाईचा वडील मुलगा. चिमणाजी व श्यामजी असे त्यास आणखी दोन भाऊ होते. विसाजीनें या सर्व मुलांचा विद्याभ्यास चांगला करविला. मोठा झाल्यावर सुद्धां बाळाजीला स्वतःच्या नांवावर प्रकट होण्याची सोय नव्हती. शिवाजी नांवाचा कोणी पुरुष यवनांच्या हातून हिंदूंची सुटका करण्याकरितां अवतरला आहे ही खबर लागतांच बाळाजीस फार आनंद झाला. ह्या वेळेस तो राजापूर येथील कसबेदाराच्या हाताखालीं कारकुनीचें काम करीत असे. संधि साधून आपल्या दैन्यावस्थेचें एक पत्र त्यानें शिवाजीस लिहिलें. पुढें शिवाजी राजापुरास आला, त्या वेळीं पकडलेल्या इतर मंडळींमध्यें बाळाजी सांपडला. बाळाजीची चौकशी चालली असतां त्याच्या आईनें धांवत येऊन शिवाजीच्या पायांवर

---

१ हें ठिकाण अरबस्तानांत आहे. मस्कती डाळिंबें प्रसिद्धच आहेत.

लोटांगण घातलें, आणि आपली सर्व हकीकत निवेदन केली. शिवाजीनें तिला अभय दिलें व त्या कुटुंबास आपले पदरीं ठेवून घेतलें.

थोड्याच दिवसांत बाळाजीची हुशारी शिवाजीच्या लक्षांत आली. व त्यानें त्यास चिटणीशीचें काम सांगितलें ( १६४८ ). महाराज सांगतील त्या मजकुराची योग्य जुळणी करून पत्रे लिहिणें हें चिटणीसाचें ( चिटनवीस हा फारसी शब्द आहे ) मुख्य काम असे. बत्तीस वर्षेपर्यंत हें काम त्यानें फार कुशलतेनें केलें, इतकेंच नव्हे तर राजकारणांतील एक कुशल मसलागार या नात्यानें तो शिवाजीचा उजवा हात बनला. एका फार महत्त्वाच्या कामीं शिवाजी महाराजांस तो उपयोगीं पडला.

भोंसले हे जातिवंत मराठे—अस्सल क्षत्रिय—असून मध्यंतरींच्या धामधुमीच्या काळांत मौजीबंधनादि क्षत्रियोचित संस्कारांचा त्यांच्या घराण्यांतून लोप झाला होता. यामुळें तत्कालीन लोक—विशेषतः ब्राह्मण—हें घराणें क्षत्रिय नसून शूद्रच आहे असें म्हणत. शिवाजी महाराजांनीं ज्या वेळीं स्वतःस राज्याभिषेक करण्याचें मनांत आणलें त्या वेळीं या गोष्टीला जुन्या कर्मठ लोकांचा थोडाबहुत विरोध आहे असें त्यांस आढळून आलें. तेव्हां काशीहून एखादा विद्वान् पंडित बोलावून आणून व आपल्या वंशावळीचा पत्ता लावून ह्या गोष्टीचा एकदां पक्का निर्णय करून घ्यावा असें त्यांनीं ठरविलें. या बाबतींत बाळाजीचें त्यांना फार साहाय्य झालें. या कामीं मदत करण्यांत याचा एक खाजगी हेतुही होता. ज्याप्रमाणें अस्सल मराठ्यांच्या क्षत्रियत्वासंबंधानें शंका घेणारा वर्ग त्या वेळीं होता, त्याचप्रमाणें प्रभु

जातीच्या क्षत्रियत्वासंबंधानेंही वाद उपस्थित होऊन एक ग्रामण्य[1] माजलें होतें. बाळाजीनें जेव्हां आपल्या मुलांचा व्रतबंध करण्याचें योजलें तेव्हां "तुम्हांस व्रतबंधाचा अधिकार नाहीं, कारण तुम्ही क्षत्रिय नाहीं," असें ब्राह्मणांनीं सांगितलें; बाळाजीनें अर्थात् मुंजी तहकूब ठेवल्या. पुढें शिवाजी महाराजांनीं काशीहून सुप्रसिद्ध गागाभट्टजी यांस आणवून त्यांचेकडून स्वतःस राज्याभिषेक कसा करवून घेतला हें प्रसिद्धच आहे. पण येथें सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, त्याच संधीस प्रभु हे क्षत्रिय आहेत व त्यांस वेदाध्ययनाचा हक्क आहे असाही निर्णय झाला, व त्यानंतर बाळाजीच्या मुलांच्या तहकूब झालेल्या मुंजी उरकण्यांत आल्या. असो.

राज्याभिषेकानंतर शिवाजी महाराज बाळाजीस अष्टप्रधानांपैकीं एक जागा देणार होते. पण ती त्यानें न स्वीकारतां चिटणीशीचा दरखं[2] कायमचा वंशपरंपरेनें मागून घेतला.

दुर्दैवानें शिवाजीमहाराजांचा वडील मुलगा संभाजी हा व्रात्य व दुर्वर्तनी निघाला, यामुळें शेवटीं महाराजांनीं त्याला पन्हाळगडावर थोड्याबहुत बंदोबस्तानें ठेवलें होतें. महाराजांच्या आकस्मिक मृत्यूनंतर आतां गादीवर कोणास बसवावें हा प्रश्न पडला. संभाजीच्या ऐवजीं धाकटा (सोयराबाईचा) मुलगा राजाराम यास गादीवर बसवावें असा कट कांहीं मंडळींनीं केला. या कटांत बाळाजी आवजी मात्र स्वतः मुळींच सामील नव्हता. कट सिद्धीला जाण्यापूर्वीच संभाजीला ही बातमी कशी कळली, त्यानें ताबडतोब हा सर्व बेत हाणून पाडून प्रमुख मुत्सद्यांस आपल्या बाजूस कसें वळवून घेतलें, व रायगड

---

१ जातीबाहेर टाकण्याची खटपट, बहिष्कार. २ अधिकार, हुद्दा.

कसा काबीज केला, ही सर्व हकीकत येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं. राज्य हातीं येतांच संभाजीमहाराजांनीं आपल्या विरुद्ध कट करणाऱ्या प्रमुख लोकांस फार भयंकर शिक्षा दिल्या. स्वतःची सापत्न माता सोयराबाई इजला तर भिंतींत चिणून ठार मारलें; सोयराबाईचे नातलग शिरके यांच्या सर्व घराण्याचा असा सत्यानाश केला कीं अशा सरसहा कत्तलीस 'शिरकाण' असें तेव्हांपासून नांव पडलें आहे. या कत्तलींत कांहीं निरपराधी स्वामिभक्तही विनाकारण बळी पडले. त्यांत **बाळाजी आवजी** हा प्रमुख होय. त्याच्या वाइटावर असलेल्या दादजी नांवाच्या एका माणसानें हा कटांत सामील होता अशी संभाजीकडे चाहाडी केली, व रागानें बेफाम झालेल्या संभाजीनें कांहींएक चौकशी न करितां एकदम बाळाजीस हत्तीच्या पायीं देण्याचा हुकूम सोडला ! बाळाजीचा वडील मुलगा आवजी, व भाऊ श्यामजी यांसही तीच शिक्षा भोगावी लागली !

## भाग २ रा

चिटनवीस घराण्याच्या स्वामिभक्तीची ही वेळ खऱ्या परीक्षेची होती. बाप, भाऊ व चुलता या तिघांचा ज्यानें नाहक बळी घेतला त्या क्रूर राजाच्या पदरीं राहणें हें किती कठीण आहे बरें ? सामान्य माणसाच्या हातून हें काम होण्यासारखें नव्हतें. पण खंडो बल्लाळ—अद्याप केवळ लेंकरूं असूनही—अशा सामान्य माणसांपैकीं नव्हता. राजाची सेवा म्हणजे राष्ट्राची सेवा होय, हें तत्त्व खंडोजीनें ओळखलें होतें. व्यक्तिशः आपल्यावर जरी संभाजीनें अन्याय केला असला,

तरी त्यास सोडून जाणें, व शत्रूस जाऊन मिळणें हा आपला धर्म नव्हे, असें त्यानें ठरविलें. त्याचा दुसरा भाऊ अण्णाजी यास येवढा पोंच नव्हता. " महाराजांची मर्जी क्रूर,....वडिलांस मारलें; या राजाजवळ आपला परिणाम नाहीं; आर्जव होणार नाहींत, याचें दर्शन नको"—असा विचार करून तंजावर येथें त्याच्या नात्याचे महाडीक म्हणून एक सरदार होते त्यांच्या आश्रयास अण्णाजी गेला.

खंडोबा मात्र धैर्यानें संभाजीस चिकटून राहिला. या वेळीं संभाजी कबजी कलुशाच्या तावडींत सांपडत चालला होता. तरी तो आपली स्त्री येसुबाई इला मात्र अमळ वचकत असे. तिनें बाळाजी आवजीच्या बाबतींत संभाजीची चांगली कान उघाडणी केली. "बहुत दिवसांचे कर्ते पुरुष, तुम्ही काय म्हणून जीवें मारिले? त्याणीं काय अपराध केला होता? हलक्या लोकांच्या मसलती घेऊन राज्य कसें चालेल?" असें तिनें निक्षून विचारिलें. संभाजीच्या लक्षांत आतां आपली चूक आली होती. "याचा बाप, भाऊ आपण मारिले; एक भाऊ यासी सोडून गेला. हा आपणास धरून राहिला. एकनिष्ठ, हेंही राजश्रींच्या ध्यानीं येऊन अन्नवस्त्राचा समाचार घेऊं लागले." कांहीं दिवस गेल्यावर "शिक्क्याचीं पत्रें अण्णाच्या (खंडोबाच्या) स्वाधीन करावीं, व जा, शिक्के करून आण, असें सांगावें, असें घडूं लागलें."

पुढें संभाजीनें पोर्तुगीज लोकांवर जी मोहिम केली, त्या वेळींही खंडोजी त्याजबरोबर हाजर होता. दौत, लेखणी, कागद वगैरे लिहिण्याचें साहित्य घेऊन तो नेहमीं स्वारीबरोबर असे. एके प्रसंगीं स्वारीबरोबर तो पायीं चालत असतां संभाजीस लिहिण्याचें कांहीं काम पडलें.

खंडोबास पत्रें लिहिण्यास सांगून स्वारी पुढें चालली. पत्रें लिहून होई-पर्यंत स्वारी कोस दोन कोस गेली. तेव्हां पत्रें घेऊन धांवत धांवत जाऊन स्वारीस गांठलें, व पत्रें वाचून दाखवून त्यावर मुद्रा (सरकारी शिक्का) करून घेतली. परंतु धांवण्याच्या श्रमानें खंडोबा एकदम घेरी येऊन पडला व त्याच्या तोंडांतून रक्ताची गुळणी आली. तेव्हां मात्र संभाजी चरकला. त्यानें ताबडतोब पालखींतून खालीं उतरून स्वतःच्या सुरईंतलें पाणी त्याच्या डोळ्यांस लावून त्यास सावध केलें, व बसा-वयास घोडा देऊन एक तरवार बक्षीस दिली.

याच स्वारींत खंडोबाच्या स्वामिनिष्ठेची परीक्षा होण्याचा आणखी एक प्रसंग आला. संभाजी गोंव्याजवळ खाडी उतरत असतां पाणी जास्त होऊन त्याचा घोडा बुडूं लागला. तंग[1] खेंचलेला असल्यामुळें घोड्यास पोहतां येईना. त्या प्रसंगीं खंडोबा आपल्या घोड्याचे तंग कापून टाकून पाण्यांत शिरला, व ताबडतोब संभाजीच्या घोड्याचे तंग कापून त्यानें त्यास संकटमुक्त केलें! "या लढाईंत अप्पांनीं शिपाईगिरी राजश्रीसमक्ष मोठ्या धारकरी[2] यांच्याबरोबर–किंबहुना सरस केली. हें पाहून परतोन आल्यावर कृपाळूपणें जवळ बोलावून गळां मिठी घालून, 'शाबास, तूं एकनिष्ठ आहेस. तुझा बाप, भाऊ आपण मारले हें दुःख चित्तांत न आणितां, आपले प्राणाकडे न पाहतां माझी सेवा केलीस; शाबास,' म्हणोन खाशा पोशाकांपैकीं पोशाक देऊन, माझ्या राज्यांतील चिटणीशीचा रोजगार तुझा वंशपरंपरेनी तुजला दिला म्हणोन बोलोन खातरजमा[3] केली. मुक्कामास आल्यानंतर

---

१ खोगीर आवळण्याची वादी. २ तरवारबहाद्दर. ३ खातरी, समाधान.

लिहिणार स्वाधीन करून देऊन धंदा चालता केला." या प्रसंगावरून संभाजीचा दिलदार मोकळा स्वभाव व्यक्त होतो.

पण हा शूर दिलदार राजा व्यसनापायीं धुळीस मिळाला. दक्षिणेंत सर्व राज्यें बुडविण्याचा संकल्प करून आलेल्या औरंगजेबाच्या प्रचंड सामर्थ्यापुढें व कपटी कारस्थानापुढें त्याचा टिकाव लागणें शक्य नव्हतें. शेवटीं तो मोंगलांच्या हातीं कसा लागला, व त्याचा किती शोककारक अंत झाला हें येथें सांगण्याची गरज नाहीं. संभाजी पकडला गेला त्या वेळीं खंडो बल्लाळ जवळच होता. त्यानें आपल्या धन्यास बचावण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. पण ते व्यर्थ गेले.

याच वेळीं आणखी एक गोष्ट सांगण्यांत येते. संभाजी संगमेश्वरीं राहात होता (व येथेंच तो पकडला गेला). त्यास भेटण्यास त्याची पत्नी येसूबाई लवाजम्यानिशीं जात असतां मोंगलांच्या एका टोळीनें तीस पकडून औरंगाबादेकडे चालविलें. हें वर्तमान खंडोबास कळतांच त्यानें आपल्या मावस बहिणीस मरण्यास तयार केलें, व तिला मोंगलांचे पहाऱ्यांत दासीवेषानें पाठवून येसूबाईच्या पालखींत बसविलें, व तिची सुटका करविली, अशी हकीकत एका बखरींत आहे. पण ती फारशी विश्वसनीय दिसत नाहीं. येसूबाई पुढें रायगड किल्ल्यावरच पकडली गेली.

रायगड पडल्यानंतर मोंगल एकामागून एक किल्ले सर करीत चालले. मराठ्यांच्या राज्यरक्षणाची जबाबदारी राजाराम महाराजांवर पडलेली होती; कारण संभाजीचा बालपुत्र शाहू हा मोंगलांच्या अटकेंत होता. त्याला सोडवून दक्षिणेंतील मोडलेली राज्याची घडी पुनः बसविणें फार बिकट झालें होतें. विशेषेंकरून राज्याचे आधार-

स्तंभ जे राजाराम महाराज व त्यांचें कुटुंब हे शत्रूच्या हातीं लागूं न देणें हेंच महाराष्ट्रीय मुत्सद्यांचें महत्त्वाचें कर्तव्य होतें. लवकरच त्यांस एक उपाय सुचला. शिवाजी महाराजांनीं आटोकाट धोरणानें दक्षिण हिंदुस्थानांत जिंजीचा ( चंदीचा ) किल्ला व त्याच्या आसपासचा मुलूख जो मिळवून ठेवला होता तो या वेळीं उपयोगीं पडला. राजारामानें कांहीं निवडक मंडळीसह जिंजीस जावें, व बाकीच्या मंडळींनीं महाराष्ट्रांत राहून गनिमी काव्यानें शत्रूस जेरीस आणावें असा बेत ठरला. त्याप्रमाणें रामचंद्रपंत बावडेकर अमात्य यांस इकडील मुलखाच्या बंदोबस्ताचें काम सांगून राजारामानें प्रल्हाद निराजी, धनाजी जाधव, संताजी घोरपडे, खंडेराव दाभाडे, खंडो बल्लाळ या मंडळीसह जिंजीस कूच केलें.

मोंगलांची नजर चुकवून येवढ्या लांबचा प्रवास करणें सोपें नव्हतें. सर्वांनीं लिंगायत यात्रेकरूंचा वेष घेतला. ते रांगण्याहून निघाले ते गोकर्णास जाऊन तेथून बंगळूराकडे चालले. इतक्यांत औरंगजेबास ही खबर कळली. त्यानें कर्नाटक प्रांताच्या सुभेदारास या टोळीस पकडून आणण्याबद्दल हूकूम सोडला. यामुळें राजाराम बंगळुरास पोंचण्याच्या अगोदरच त्याच्याबद्दल कर्नाटकांत चोहोंकडे शोध सुरू झाला होता. एका प्रसंगीं तर तो शत्रूच्या हातीं लागण्याच्या बेतांत आला होता. पण खंडो बल्लाळानें त्यास या प्रसंगीं बचावलें; ती हकीकत अशी:—

ही मंडळी एका धर्मशाळेंत उतरली होती. यात्रेकरूंचा वेष घेतला तरी श्रीमंतीच्या संवई कशा लवकर सुटतात ? राजारामाला एके दिवशीं संध्याकाळीं पाय धुवावयाचे होते. त्या वेळीं एकानें त्याच्या

पायावर पाणी घातलें. तें एका कानड्या माणसानें पाहिलें. त्याला अशी शंका आली कीं हे जंगम[१] म्हणवतात, मग यांच्यांत हा श्रीमंती प्रकार कसा ? हे कोणी वेषांतर केलेले लोक तर नाहींत ना ? त्यानें एकाजवळ ही शंका बोलून दाखविली. हां हां म्हणतां ही बातमी गांवभर पसरली. राजारामाबरोबरच्या कानडी जाणणाऱ्या मंडळींनीं हा प्रकार पाहतांच राजारामास सावध केलें. खंडो बल्लाळ म्हणाला, " हें चिन्ह ठीक नाहीं. आतां महाराजांनीं कांहीं मंडळीसह येथून ताबडतोब निघून जावें, व कांहींनीं येथेंच राहावें; म्हणजे आम्ही सर्व एक आहों, व यात्रेकरू नव्हे अशी कोणास शंका येणार नाहीं." याप्रमाणें राजाराम व थोडी मंडळी पुढें चालती झाली. व खंडो बल्लाळ व आणखी दोघे तिघे स्वयंपाक करीत तेथें राहिले. इतक्यांत अंदाजाप्रमाणें ठाणेदाराकडील माणसें आलीं व यांस पकडून त्यांनीं ठाणेदारापुढें उभें केलें. ठाणेदारानें विचारलें " कोण तुम्ही ? व कोठें चाललांत ?" खंडोबानें उत्तर केलें " आम्ही कापडी[२] यात्रेकरू; श्रीरामेश्वरीं जातों; दहापांच आणखी होते, ते जिकडे जाणार तिकडे गेले. आम्हांस दुसरीकडे जाणें, म्हणोन राहिलों." हें बोलणें मोंगलांस खरें न वाटून त्यांनीं मारहाण केली; डोईवर दगड दिले, चाबूक मारिले, परंतु कापडीच म्हणून सांगितलें. शेवटीं राखेचा तोबरा दिला, तरी तेंच. काय हा दृढनिश्चय ! काय ही स्वामिभक्ति ! तीन दिवस कडकडीत उपोषण पडलें. तेव्हां सर्वांनीं सांगितलें कीं यात्रेकरू हें खरेंच, यांस पीडा करणें ठीक नाहीं. तेव्हां यांची सुटका

१ लिंगायत पंथाच्या साधूंस ' जंगम ' असें म्हणतात.

२ खांद्यावर कावड घेऊन तीर्थयात्रा करणारे यात्रेकरू.

झाली. पुढें संकेताप्रमाणें ते प्रल्हाद निराजीच्या टोळीस जाऊन मिळाले, व कांहीं दिवसांनीं सर्व मंडळी जिंजीस सुखरूप जाऊन पोंचली.

## भाग ३ रा

जिंजीस मराठ्यांचा जम बसल्यावर राजारामानें खंडो बल्लाळास दाभोळ प्रांतींची सरदेशमुखी वंशपरंपरा वतन करून दिली.

यापुढें मराठ्यांनीं महाराष्ट्र व कर्नाटक या सर्व भागांत कसा धुमाकूळ उडवून दिला, अवजड सामग्री व सुखास लालचावलेलें सैन्य यामुळें आधींच निर्बळ झालेल्या मोंगलांस कसे त्राहि भगवन् करून सोडलें, ही हकीकत स्थलसंकोचास्तव सांगतां येत नाहीं. ज्यांत खंडो बल्लाळ याचा संबंध येतो अशा एक दोन गोष्टी सांगून हें प्रकरण आवरतें घेणें भाग आहे.

जिंजीचा किल्ला सर करून राजारामास कैद करण्याचें काम औरंगजेबानें झुलफिकारखां या सरदारावर सोंपविलें होतें. पण त्याला पुरेशी मदतही नव्हती, व औरंगजेबाच्या फाजील संशयी स्वभावामुळें खानावर नजर ठेवण्यासाठीं त्यानें त्याच्या हाताखालींच दुसरे सरदार दिले होते, त्यामुळें उद्विग्न झालेला खानही वेढ्याचें काम फारसें मन लावून करीत नव्हता. अशा स्थितींत वेढ्याचें काम रेंगाळत चाललें. पण शेवटीं जेव्हां त्याला वाटलें कीं आपण किल्ला लवकर सर केला नाहीं तर बादशहा आपणास परत बोलावणार, तेव्हां त्यानें वेढ्याचें काम जोरांत चालविलें. तेव्हां राजाराम व त्याचे कारभारी यांस पंचाईत पडली. त्यांना आतां किल्ला लढवून फारसा फायदा नव्हता. महाराष्ट्रांत

रामचंद्रपंताच्या मुत्सद्देगिरीनें व धनाजी जाधव, संताजी घोरपडे वगैरे वीरांच्या पराक्रमांनीं मोंगलांस अगदीं जेर करून सोडलें होतें, व आतां परत महाराष्ट्रांत जाऊन तेथील संग्रामास अधिक व्यवस्थित स्वरूप देणेंच इष्ट आहे असें त्यांस वाटलें. पण किल्ल्यांतून निसटून कसें जावयाचें ? हाच बिकट प्रश्न होता. मोंगल सैन्यांत कांहीं मराठे सरदार आहेत, त्यांच्याकडून कांहीं मदत झाली तर पहावी, असा बेत ठरला. ही कामगिरी खंडो बल्लाळ याच्या गळ्यांत पडली. राणोजी व गणोजी शिर्के हे मोंगलांच्या एका मोर्च्यावर अधिकारी होते. त्यांजकडे खंडोजी गेला, व त्यानें राजारामाची येथून सुटका करावी अशी त्यांस विनंति केली. संभाजीनें 'शिरकाण' केल्यापासून शिर्के मंडळीचा भोंसल्यांचा घराण्यावर दांत होताच. अर्थात् राजारामास मदत करण्याचें शिर्क्यांनीं साफ नाकारलें. तेव्हां खंडो बल्लाळ त्यांस म्हणाला, "या समयास तुम्ही बोलतां हें योग्य नव्हे. तुमचें शिरकाण केलें तसेच आमचे तीन पुरुष हत्तीचे पायांखालीं मेले, तेही गेले. परंतु हिंदूंच्या दौलतीसाठीं आम्ही झटत आहों, आणि तुम्ही तों आप्त शरीख ( भागीदार ) आहां; या समयास आपले भाचे महाराज व कबीले[1] काढून द्यावे. तुमची कीर्ति होईल !" या चिटणीसांच्या भाषणानें शिर्क्यांचें हृदय द्रवलें. आणि आपण मराठे आहों याचें स्मरण होऊन मराठेशाहीचा मुख्य पुरुष, आपला आप्त यास यथाशक्ति मदत करण्यास ते उद्युक्त झाले. पण शिर्क्यांचें दाभोळचें वंशपरंपरागत वतन—जें नुकतेंच खंडो बल्लाळ याच्या नांवानें करून

---

१ कुटुंब, जनाना.

देण्यांत आलें होतें—तें आपणास परत मिळावें असा उद्गार शिर्क्यांनीं काढला. ते समयीं खंडो बल्लाळ म्हणाला, "कांहीं हरकत नाहीं; स्वामिकार्याहून आम्हांस वतन अधिक नाहीं. सर्व अर्थ आमचे स्वामीचे पाय आहेत. शिर्क्यांचा उपकार ठेवूं नये." असें म्हणून त्यानें दाभोळच्या वतनाचीं पत्रें राजाराम महाराजांच्या स्वाधीन केलीं. धन्य आहे, खंडोजी, धन्य तुझ्या स्वार्थत्यागाची ! याचें नांव राष्ट्राभिमान, याचें नांव निरपेक्ष राष्ट्रसेवा ! मराठ्यांच्या इतिहासांत स्वार्थीपणा व लुटालूट या शिवाय कांहीं नाहीं, असें म्हणणाऱ्यांनीं एकदां हीं उदाहरणें नजरेखालीं घालावीं !

ठरल्याप्रमाणें एके रात्रीं शिर्क्यांच्या गोटांतून राजाराम व त्याचे कारभारी निघून गेले, व जिंजीचा किल्ला मोंगलांच्या स्वाधीन झाला.

दुर्दैवानें मराठ्यांचा फिरून चांगला जम बसण्यापूर्वींच राजाराम मरण पावला. पुढें औरंगजेबही मरण पावल्यावर त्याचा मुलगा मुअज्जम ऊर्फ बाहादूरशहा यानें—मराठ्यांत फूट पाडण्याच्या इरादानें—शाहूस कैदेंतून सोडून दिलें. राजारामाची बायको ताराबाईनें शाहूस विरोध करण्याचा प्रयत्न केला. पण प्रमुख मुत्सद्दी मंडळींचें साहाय्य शाहूस मिळाल्यामुळें त्यासच साताराची गादी मिळाली. या मंडळींत खंडो बल्लाळही शाहूस मिळाला. शाहू महाराजांनीं त्यास तत्काळ चिटनविशीचीं वस्त्रें दिलीं.

या पुढें मात्र हा स्वार्थत्यागी स्वामिभक्त अमळ मागें पडालासा दिसतो. स्वतःला महत्त्वास चढविणें हें त्याचें धोरण कधींच नव्हतें, व बाळाजी विश्वनाथ कापल्या कर्तबगारीच्या जोरावर पुढें येऊन पेशवेपदास चढल्यावर त्याला मनःपूर्वक साहाय्य करण्यांतच छत्र-

पतींच्या गादीचें कल्याण आहे असें खंडो बल्लाळानें ठरविलें, व त्याप्रमाणें तो अखेर पर्यंत वागला. पुढेंही पेशवे व चिटणीस या दोन घराण्यांचा एकमेकांवर लोभ व विश्वासच असलेला दिसून येतो. तरी एकंदरीनें पाहतां त्याच्या स्वामिनिष्टेनुरूप त्याला बढती किंवा मान मिळाला नाहीं, व अशा राष्ट्रभक्त पुरुषाची अखेरीस दैन्यावस्था कायम राहिली याबद्दल खेद वाटल्यावांचून राहात नाहीं. " संसार वाढला, प्राप्ति नाहीं; तसेंच दिवस कंठीत होते. आपला वृद्धापकाळ. वतनपत्रें ( चौलचीं, राजारामानें मरणापूर्वीं करून दिलेलीं ) आंगऱ्या-जवळून सोडविण्यास कुलाब्यास गेले. वर्षभर राहून मोठ्या खुशा-मतीनें आंगऱ्यांचीं वतनपत्रें घेऊन साताऱ्यास आले. पण कबूल केल्याप्रमाणें वतनांचा अंमल आंगऱ्यांनीं चालविला नाहीं. दहा हजार रुपये देणें झालें. त्याच दिवसांत आयुष्य सरलें. अप्पांचा काळ झाला," असें वर्णन बखरींत आहे. सारांश, सारा जन्म निरपेक्ष राष्ट्रसेवेंत घालवून हा वंद्य पुरुष इ. स. १७४८ या वर्षी दारिद्र्यांत व चिंतेंतच कालाधीन झाला!

---

**प्रश्नः**—( १ ) बाळाजी आवजीची मुख्य कामगिरी कोणती?

( २ ) खंडो बल्लाळाच्या स्वभावाचें संक्षिप्त वर्णन द्या.

( ३ ) खंडो बल्लाळाची स्वामिनिष्ठा कसाला लागण्याचे मुख्य प्रसंग कोणते होते?

# ६

# झोंपेचा शत्रु ढेंकूण

[ पुढील विनोदी लेख श्रीयुत श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या " सुदाम्याचे पोहे अथवा साहित्यबत्तीशी " या पुस्तकांतून घेतला आहे. श्रीयुत कोल्हटकर हे उत्कृष्ट कवि, नाटककार, विनोदी लेखक, टीकाकार व ज्योतिःशास्त्रज्ञ म्हणून फार प्रसिद्ध आहेत. स्वतंत्र विनोदी लेख लिहून तद्द्वारा सामाजिक व्यंगांवर खरमरीत टीका करण्याची कल्पना प्रथम यांनींच काढली. ]

झोंप ही मनुष्यमात्रास आवश्यक व प्रिय असतां तिची व त्याची भेट न होऊं देण्यांतच कांहीं विघ्नसंतोषी प्राण्यांस आनंद वाटत असतो. ढेंकूण हे या प्राण्यांत अग्रगण्य असून चिलटें, डांस, केंबरें हे त्याचे साथीदार असतात. ढेंकूण हे माणसाशीं जमिनीवर लढतात तर त्याचे साथीदार त्याच्यावर वैमानिकांप्रमाणें आकाशांतून हल्ला करितात. रणवाद्यें वाजविण्याचें कामही या साथीदारांकडेच असतें. तुम्ही आपल्या कानांचीं रंध्रें कोणत्याही बाजूस फिरवा, त्यांनीं तिकडे आपला मोर्चा फिरविलाच म्हणून समजावें. त्यांच्या वाजविण्याकडे तुमचा कान नव्हता अशी सबब पुढें करण्याला ते तुम्हांला जागाच ठेवीत नाहींत. कधीं कधीं तर नाकालाच कान समजून ते त्यांत आपल्या तुताऱ्यांसह प्रवेश करितात, व मनुष्याला शिंक येऊन त्यांची झालेल्या चुकीबद्दल खात्री होईपर्यंत ते त्यांतून बाहेर पडत नाहींत.

ढेंकणाचे साथीदार माणसापासून थोडेसे तरी दूर दूर असतात; पण ढेंकणास इतका परकेपणा बाळगण्याचें कारण नसतें. कारण मनुष्य व तो एकाच हाडामांसाचे नसले तरी एकाच रक्ताचे. तो त्याच्या परवानगीची वाट न पाहतां त्याच्या बिछान्यावर खुशाल ठाणें देऊन बसतो. निजणारानें ज्या मऊ मऊ उश्या व गिर्द्या स्वतःच्या डोक्यास व कुशीस टेंकावयाकरितां घेतल्या असतात त्यांचा उपयोग तो किल्ल्यासारखा करून त्यांच्या मागें छपून बसतो. निजणाराचा डोळा लागतो न लागतो तोंच त्याची स्वारी आपल्या अनुयायांसह सज्ज होऊन उश्यां गिर्द्यांखालून मैदानावर येते व आपल्या बेसावध शत्रूवर अचानक हल्ला करिते. गनिमी[1] काव्याची लढाई करण्यांत ढेंकणाचा हात कोणाच्यानेंही धरवणार नाहीं. एका क्षणीं डोक्याच्या घांटमाथ्यावर, तर दुसऱ्या क्षणास बगलेच्या खिंडींत आणि तिसऱ्या क्षणीं पोटाच्या मैदानांत, अशा जलदीच्या त्याच्या हालचाली असतात. त्या पाहून ढेंकणांच्या सबंध सैन्यानेंच येथें छावणी दिली आहे काय असा एखाद्यास भास व्हावयाचा! ब्रह्मदेवानें त्यास शरीरही जवसाच्या दाण्याप्रमाणें इतकें चापट दिलें आहे कीं, त्याचें वास्तव्य हातास सहसा उमगून येऊं नये, व इतकें लहान दिलें आहे कीं, पलंगपोसाची कितीही बारीक सुरकुती

---

१ शत्रूशीं समोरासमोर न लढतां चोरटे हल्ले करून त्यास जेरीस आणणें यास गनिमी काव्याची लढाई असें म्हणतात. लहान सैन्यास मोठ्या सैन्याशीं टक्कर देण्याचे कामीं याच पद्धतीचा अवलंब करावा लागतो. मराठी राज्याचे संस्थापक श्रीशिवाजी महाराज यांनीं मोंगलांशीं झगडतांना गनिमी काव्याचाच उपयोग केला होता.



चित्र ३—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

असो, तिच्यांत त्यास बेमालूम लपतां यावें. प्रतिपक्ष्याशीं पेंच लढविण्यांतही त्याचा हातखंडा असतो. ज्या हिंदी भाषेंत त्यास **खटमल** असें सार्थ नांव दिलें आहे, ती भाषा केवळ याच कारणामुळें राष्ट्रीय भाषा होण्यास सर्वांशीं योग्य आहे. खाटेवर याची कृति खरोखर एखाद्या मल्लासारखीच असते. तो आपल्या शिताफीच्या हालचालींनीं निजणारास सळो कीं पळो करून सोडून लवकरच चीत करितो. निजणारा हातीं दिवा घेऊन बारकाईनें पांघरुणाची एक एक घडी उलगडून व पलंगपोसाची एक एक मुरकुती साफ करून जरी पाहूं लागला तरी ढेंकणाच्या सफाई-पुढें त्यास हात टेकावे लागतात. ढेंकणाचा शोध हा सुखाच्या शोधाप्रमाणें अनंत[1] असतो. जादूगाराच्या हातांतील रुपयाप्रमाणें हा एका क्षणीं दिसून लागलीच दुसऱ्या क्षणीं अंतर्धान पावतो. एक क्षण बोटांच्या चिमटींत गवसल्यासारखा वाटतो; पण नखाग्रानें चिरडण्याकरितां त्याची चिमटींतून भुईवर स्थापना होते न होते तोंच तो तेथून निसटून तळहाताच्या मार्गानें बाहीच्या लांबच लांब बोगद्यांत प्रवेश करितो, व निजणारा पुन्हां घोरूं लागे-पर्यंत बाहेर पडत नाहीं. पळावयाच्या साऱ्या वाटा बंद झाल्यास ढेंकूण मेल्यासारखा निपचित पडून रहातो; पण आपला मार्ग काढणाराचें थोडेंसें दुर्लक्ष्य झाल्याबरोबर धूम ठोकून पाहातां पाहातां नापत्ता होतो.

खाटा, पलंग हीं ढेंकणाचीं अत्यंत प्रिय निवासस्थानें होत.

---

१ अनंत = ज्याला अंत नाहीं असा.

तेथून त्याला फारसा वेळ खर्च न करितां रणक्षेत्रांत दाखल होऊन रक्तशोषणरूप पवित्र कार्यास सुरुवात करतां येते. ही सोय खुर्च्यांतही असल्यामुळें त्याही त्याच्या आवडत्या असतात. बसणारें मनुष्य खुर्चीला टेंकलें न टेंकलें तोंच ढेंकणानें आपलें अस्तित्व जाहीर केलें म्हणून समजावें. आरामखुर्चीमुळें बसणाराला जितका आराम मिळतो त्यापेक्षांही ढेंकणास अधिक मिळतो. कारण तिजवर बसलेला मनुष्य बहुधा लवकरच झोंपेच्या आधीन होत असल्यामुळें ढेंकणाच्या जिवाची तारांबळ होण्याचें कारण नसतें. टेबलाशीं माणसाच्या एखाद्या दुसऱ्या अवयवाचाच संबंध येत असल्यामुळें त्याजवर त्याची फारशी बहाल मर्जी नसते. खांबांतून वाटेल तेव्हां बैठकीवर किंवा खुर्च्यांवर येतां येत असल्यामुळें प्रत्येक खांबांत अनेक ढेंकणांची वसाहत दिसून येते. हिरण्यकशिपूनें खांबास लाथ मारिली तेव्हां नारसिंहाबरोबर पांच पन्नास ढेंकणांची तरी तुकडी बाहेर पडली असली पाहिजे. जेवणाराचें पाटावरील आसन बरेंच स्थिर असल्यामुळें व त्याचें लक्ष पक्वान्नाकडे लागलेलें असल्यामुळें त्याच्याप्रमाणें ढेंकणासही अव्यग्र चित्तानें चमचमीत मेजवानीवर हात मारावयास मिळतो, म्हणून पाटांतही त्या प्राण्याचा सुळसुळाट असतो. पलंगावरील सारे ढेंकूण काढून टाकून त्याचे सारे खूर पाण्याच्या भांड्यांत ठेवून नाकेबंदी केली तरी ढेंकूण हताश होत नाहीं. त्यास पोहतां येत नसलें तरी त्याजपाशीं युक्त्यांना तोटा नसल्यामुळें तो भिंती किंवा खांब चढून वरील तुळया गांठतो, व तेथून नेमकी पलंगावर उडी मारून तेथें बिनघोरपणें घाराढूर निजलेल्याचा छळ करण्यास सुरवात करितो. या खेपेस पलंगाच्या खुरांवाटे खालीं येण्याचा मार्ग

बंद झाल्यामुळें ढेंकूण केशरी[1] केलेल्या रजपुतांप्रमाणें ( निजणाराच्या ) जिवावर उदार होऊन रक्तशोषण चालवितो. त्याच्या अंगांत हळू हळू खून चढूं लागतो. दु:शासनाचें रक्त घटा घटा पिणाऱ्या भीमकर्म्या वृकोदराच्या[2]प्रमाणें त्याचें रक्तबंबाळ तोंड जर सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें दृष्टीस पडलेंच तर क्षणभर तरी भीति वाटल्यावांचून रहाणार नाहीं हें खास.

एकदां आमच्या घरांत ढेंकणांची इतकी गर्दी झाली कीं, मी त्यांच्या त्रासानें पिसाळण्याच्या बेताला आलों. मी पाटावर, बैठकीवर, खुर्चीवर, टेबलावर, खाटेवर, पलंगावर कोठेंही बसलों तरी खालून असंख्य सुया बोंचल्याप्रमाणें वेदना होत. त्यांच्या भीतीनें मी बसण्याऐवजीं प्रहरन् प्रहर उभाच राहूं लागलों, व मऊ बिछान्यावर शरपंजरीं[3] पडल्यासारखें वाटूं नये म्हणून घटका घटका पाठीची कमान करून पडूं लागलों. ढेंकूण अंगाचे लचके तोडतोडून फरारी झाले कीं, त्यांचा सूड मी घरांतील मुलांबाळांवर उगवीत असें. एकदां जवळपास कोणी नाहींसें पाहून मी स्वत:च्याच तोंडांत फडाफड मारून घेतलें. अखेरीस कांहीं दिवस घर सोडण्याचा विचार करून मी सहकुटुंब काशीयात्रेस निघून गेलों. त्या यात्रेनें माझी संसारापासून झाली नाहीं तरी

---

१ शत्रूकडून पराभव होणार हें निश्चित झाल्यावर, त्यांच्या हातीं लागण्यापेक्षां मरण बरें असें समजून रजपूत वीर " जौहर " करीत. सर्व बायकामुलें आगीच्या प्रचंड खाईंत उडी टाकून जीव देत, व लढवय्ये पुरुष केशरी रंगाचा पोशाक करून शत्रूवर निकराचा हल्ला करीत व मारतां मारतां मरून जात, या चालीचा येथें उल्लेख केलेला आहे.

२ भीमाच्या. ३ बाणांचा पिंजरा.

ढेंकणांपासून सुटका होईल, अशी फार आशा होती. घरीं रक्त-शोषणाचा मनमुराद अनुभव आलेला असल्यामुळें पंड्यांचें व गयावळांचें रक्तशोषण[1] विशेष त्रासदायक वाटलें नाहीं, व चिलटां-पिसवांच्या वादनाच्या मानानें त्यांची पिरपिरही कर्णकटु वाटली नाहीं. एक महिन्यानें आम्ही सुखरूप परत आलों. घरांत जागोजाग ढेंकणांचे निर्जीव अस्थिपंजर पहावयास सांपडतील अशी माझी कल्पना होती; आणि ते सांपडले असते तर त्यांजकरितां दोन आंसवांची तिलांजली[2] देण्याची माझी उदारपणाची तयारीही होती. रोजचे रोज रडकुंडीला येऊन टिपें गाळीत बसण्यापेक्षां एकदांच टिपें गाळून मोकळें होणें कोणीही पतकरील. पण माझी उदार इच्छा तृप्त होण्याचें एकही चिन्ह दिसेना. ते बिचारे अशक्त होऊन जागचेजागीं पटापट मेले असावेत, बाहेर येण्यापुरता तरी तकवा त्यांनीं कोठून आणावा, असा समाधानपूर्वक विचार करीत मी खुर्चीला टेंकतों, तों तिच्यांत दडून बसलेल्या माझ्या कांहीं जुन्या स्नेह्यांनीं माझ्या पाठीच्या खालच्या भागाचा कडकडून चावा घेऊन मला पहिली सलामी दिली. वर्षांतील सारीं उपोषणें एका महिन्याच्याच अवधींत घडल्यामुळें त्यांच्या दाढा रोडावून त्यांस अशी कांहीं तीक्ष्ण धार लागलेली होती, कीं ती एकतर त्यांस माहीत, कीं माझ्या अंगास माहीत! मी कळवळून गेलों आणि उडी मारून दुसऱ्या खुर्चीवर जाऊन बसलों. तेथेंही तोच प्रकार दिसून आला. तेथेंही बुभुक्षित ढेंकणांची भली मोठी पंगत माझ्या

---

१ यात्रेकरूंकडून पैसे उकळणें. २ श्राद्ध करण्याचे वेळीं तीळ हातांत घेऊन पितरांच्या नांवानें पाणी सोडावयाचें असतें, त्यास तिलांजली म्हणतात.

अंगाचीच वाट पहात बसली होती. माझ्या महायात्रेचें मांवदें होण्यापूर्वींच त्यांनीं आपल्या उपोषणाचें पारणें फेडण्यास सुरवात केली आणि एका घटकेच्या आंत मला त्राहि भगवन् करून सोडिलें.

यानंतर मीं दुसरीच एक युक्ति योजण्याचें ठरविलें. ढेंकूण नखाग्रानें चिरडून मारावेत तर सांपडत नाहींत, उपासमारीनें मारावेत तर मरत नाहींत; त्यापेक्षां त्यांची गांवांत खैरात केली तर किती तरी चांगलें होईल ! गांवांत असे किती तरी झोंपाळू इसम असतील, कीं ज्यांची अतिनिद्रेमुळें प्रकृति नीट रहात नाहीं. कित्येक विद्यार्थ्यांस व मजूरांस पहांटे चार वाजतां उठणें जरूर असून झोंपाळूपणामुळें त्यांची ती वेळ टळत असेल. माझीं जागरणें जर या सार्‍यांमध्यें वांटून दिलीं तर माझा भार हलका होऊन अनायासें परोपकार केल्यासारखें होणार आहे ! विचार मनांत येण्याचा अवकाश, त्याची अंमलबजावणीही लागलीच सुरू झाली. मीं ढेंकणांनीं बुजबुजलेले आपले कपडे अंगावर चढविले, आणि गांवकर्‍यांच्या भेटी घेण्याकरितां बाहेर पडलों. ज्यांच्या घरांचे उंबरठे मीं ओलांडले नव्हते अशांना मीं त्या दिवशीं मोकळ्या मनानें धूळभेट दिली. ज्यांच्याशीं नुसता हस्तिदंती[२] पुरताच संबंध, त्यांच्याशीं घटका घटका गप्पा मारून मीं त्यांच्या चंच्या रिकाम्या केल्या. ज्यांची ओळख याहूनही अंधुक होती त्यांच्याही घरीं घटका घटका बसून ( मला विडीचें व्यसन नसतांही ) विड्यांचे जुडगे पार केले. हा क्रम मीं दुसर्‍या व तिसर्‍या दिवशींही चालू ठेविला. माझ्या अंगीं एकाएकीं उत्पन्न झालेला हा

---

१ काशीयात्रा करून आल्यावर त्या व्रताची सांगता करण्याकरितां केलेला विधि. २ नुसतें पाहून हंसणें.

मनमिळाऊपणा पाहून, लोकांना प्रथम आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें. पण माझ्या भेटीबद्दल बिचाऱ्यांनीं कधींही कंटाळा दाखविला नाहीं. उलट माझ्या आगमनाची ते उत्कंठेनें वाट पहात बसूं लागले, व माझ्याकरितां पानसुपारीचा, तंबाखूचा व प्रसंगीं चहाचाही खर्च करण्याला एका पायावर तयार राहूं लागले. माझें वर्तन त्यांना जितकें गूढ वाटलें होतें त्यापेक्षांही त्यांचें मला वाटूं लागलें. इतके लोकप्रिय होण्यासारखे गुण तरी आपणांत कोणते आहेत, याचा मी बारकाईनें विचार करूं लागलों; पण कांहीं तर्क चालेना. अखेरीस कित्येकांस स्पष्ट विचारतां त्यांच्या सांगण्यांत असें आलें कीं, मीं घरोघर भेटी देण्यास सुरवात करण्यापूर्वी लोकांस चांगल्याशा झोंपा येत नव्हत्या; पण आतां घरोघर स्वस्थ झोंपा येत असून तो केवळ माझा पायगुण असा सर्वांचा समज झाला आहे. आणखी तपास करतां असें कळलें कीं, पूर्वी घरोघर ढेंकणांचा बुजबुजाट झाला होता; पण आतां औषधालाही ढेंकूण मिळण्याची मारामार पडते. हें ऐकतांच माझें धाबें दणाणून गेलें. स्वतःच्या कपड्यांच्या द्वारें लोकांच्या घरीं ढेंकूण विसर्जन करण्याची जी माझी युक्ति होती ती माझी मलाच फळली कीं काय? घरीं धांवत जाऊन पहातों तों माझी बंडी, अंगरखा, पागोटें, जोडा इत्यादि साऱ्या वस्त्रप्रावरणांचे ढेंकणांनीं मोठमोठे तंबू व डेरे बनविलेले दिसले. बैठकीचें त्यांनीं चांगलें प्रशस्त[1] 'आटपाट' नगर केलें होतें, आणि खुर्च्या, टेबलें वगैरे लांकडी सामानांतून त्यांनीं जपांनी[2] शहरें वसविलीं होतीं. त्या ढेंकणांत आमच्या गांवांतील

---

१ विस्तृत. हा शब्द जुन्या काहाण्यांत फार येतो. २ छोटेखानी.

यच्चयावत् ढेंकूण गोळा झाले होते. त्यामध्यें बंडूनानांकडील रोड व पांडूतात्यांकडील लठ्ठ ढेंकूण होते. त्यामध्यें गोरे, काळे, चपळ, मंद, गोड रक्ताचे, खारट रक्ताचे वगैरे साऱ्या वर्गांचे प्रतिनिधि होते. तें पाहून मला संसाराचा वीट आला. त्याचक्षणीं मी बायकांमुलांसह एकएका वस्त्रानिशीं घरांतून बाहेर पडलों, आणि मीं आपल्या हातानें घरावर निखारा ठेविला. घराची राख होईपर्यंत मी तेथून हललों नाहीं. तेव्हांपासून मी जरी भाड्याच्या घरांत रहात आहें, तरी मला नित्य सुखाची झोंप येत असते.

---

**प्रश्नः**—( १ ) ढेंकणास आपला शत्रु असें लेखकानें कां म्हटलें आहे? त्याच्या गनिमी काव्याचें थोडक्यांत वर्णन द्या.

( २ ) ढेंकूण व डांस यांची तुलना करून कोणाशीं लढणें अधिक बिकट हें दाखवा.

( ३ ) ढेंकणाच्या तडाक्यांतून सुटण्यास सुदामजी ( लेखक )नें काय काय खटपटी केल्या व त्या कितपत साधल्या?

( ४ ) नारसिंह, भीम, यांच्या उपमा ढेंकणास कां दिल्या आहेत तें सांगा.

( ५ ) उपरोधिक भाषण म्हणजे काय? वरील लेखांतून या प्रकारचे एक दोन नमुने दाखवा.

---

*

# ७

# कॅप्टन् कुक्

ज्यावर सूर्य कधींही मावळत नाहीं असें म्हणतात त्या जगड्व्याळ इंग्रजी साम्राज्याची वाढ ज्या अनेक कारणांनीं झाली आहे, त्यांत इंग्रजांचें धाडस व नौकानयनांतील प्रावीण्य या गुणांस बरेंच प्राधान्य द्यावें लागेल. इंग्लंड हें एक लहानसें बेट असून, बाह्य देशांतील दळणवळण ठेवण्याचे कामीं समुद्राचा आश्रय केल्यावांचून त्याचें भागतच नाहीं. यामुळें नाविकविद्येकडे प्रथमपासूनच इंग्रज लोकांचें लक्ष साहजिक आहे. पण पंधराव्या शतकापूर्वी नौकानयनाच्या विद्येंत ते फारसे तरबेज असल्याचें दिसत नाहीं. यापूर्वी यूरोपांत स्पेन व पोर्चुगाल या दोन देशांचा लौकिक या कामीं विशेष होता. स्पेन देशाच्या राजाच्या आश्रयामुळेंच **कोलंबसास** अमेरिका देशाचा शोध लावतां आला, व पोर्तुगीझ राजाच्या उत्तेजनामुळेंच **वास्को-डिगामा** यास हिंदुस्थानचा जलमार्ग शोधून काढतां आला. अमेरिकेंतील प्रदेश स्पेनच्या हातीं लागल्यापासून स्पेनमध्यें जो सोन्याचा धूर निघूं लागला, त्यामुळें इंग्रजांनाही नवीन देश शोधून काढण्याची व आपला व्यापार वाढविण्याची इच्छा झाली. पण स्पेन व पोर्चुगाल-सारख्या संपन्न व प्रबळ राष्ट्रांशीं या बाबतींत चढाओढ करणें सोपें नव्हतें. नौकानयन विद्येंत कांहीं काल धडे घेतल्यावांचून आपली सरशी होणार नाहीं असें इंग्रज मुत्सद्यांनीं ओळखलें, व आठवा

हेन्रि राजा, एलिझाबेथ राणी, व क्रॉम्वेल यांनीं इंग्लंडचें आरमार व व्यापारी नौकानयन हीं सुधारण्याकडे फार लक्ष दिलें. यामुळें—विशेषेंकरून एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत—अनेक धाडसी दर्यावर्दी पुढें आले व त्यांनीं सांप्रतच्या इंग्रजी साम्राज्याचा पाया घातला. नवे नवे देश शोधून काढावे, तेथें आपल्या देशाचें निशाण उभारून आपला व्यापार वाढवावा अशी महत्त्वाकांक्षा तरुण पिढीच्या मनांत पक्की रुजली, व ती दर पिढीस वाढतच गेली. अशा धाडसी पुरुषांच्या मालिकेंत **कॅप्टन् कुक्** यास बरेंच श्रेष्ठ स्थान द्यावें लागेल. ज्या वेळीं महासागराचा बहुतेक प्रदेश अज्ञात होता, व प्रवासाचीं साधनें अगदीं तुटपुंजीं होतीं त्या वेळीं कुक्नें तीन वेळां पृथ्वीप्रदक्षिणा केली. दक्षिण पॅसिफिक महासागरांतील ऑस्ट्रेलिया या नांवाचें जें खंडप्राय महाद्वीप आहे त्याचा व त्या शेजारील टॅस्मॅनिया, न्यूझीलंड वगैरे द्वीपांचा निश्चित शोध लावण्याचें श्रेयही त्यानेंच संपादन केलें. आज सुमारें दोनशें वर्षांनंतरही त्यानें त्या वेळीं लिहून ठेवलेलीं प्रवासवर्णनें अत्यंत मनोरंजक वाटतात. त्याच्या कामगिरीची थोडीशी कल्पना आमच्या बालवाचकांस यावी म्हणून पुढील अल्प-चरित्र लिहिलें आहे.

यॉर्कशायर परगण्यांतील मॉर्टन नांवाच्या एका खेड्यांत इ. स. १७२८ सालीं जेम्स् कुक्चा जन्म झाला. त्याचा बाप शेतावर मोलमजूरीचें काम करीत असे. जेम्स् आठ वर्षांचा होता त्या वेळीं त्याचा बाप तेथून पांच मैलांवर असलेल्या ग्रेट एटन् नांवाच्या गांवीं राहण्यास गेला. मॉर्टन येथील एका गांवठी शाळेंत जेम्स्ला थोडीशी अक्षर-ओळख झाली होती, व ग्रेट एटन् येथील शाळेंत तो

थोडेंबहुत लेखन व गणित शिकला. त्याला शिक्षण असें काय तें येवढेंच मिळालें. घरच्या गरीबीमुळें मुलगा बारा एक वर्षांचा होतांच बापानें त्याला व्हिट्बी जवळच्या एका खेड्यांतील शिंप्याच्या दुकानीं उमेदवारी करण्यासाठीं ठेवून दिला.

पण जेम्स्‌ला हा असला बैठा धंदा मुळींच पसंत नव्हता. त्याला अगदीं लहानपणासून दर्यावर्दी बनण्याची मोठी हौस होती. मच्छीमारीचा धंदा करणाऱ्या कोळी लोकांकडून समुद्रावरील सफरी, तेथें दिसणारे अद्भुत देखावे, धाडसाचे व धोक्याचे प्रसंग यांच्या गोष्टी ऐकण्याचा त्याला कधींच कंटाळा येत नसे. तुफान दर्यावरील संकटें व जिवावरील प्रसंग यांच्या कथा ऐकून घाबरून जाण्याऐवजीं या अद्भुतरम्य जीवनाचें त्याला कौतुकच वाटे. शेवटीं ही प्रवृत्ति इतकी बळावली कीं स्वारी एके दिवशीं सकाळीं उठली, व आपल्या कपड्यांचें एक लहानसें बोचकें बांधून जी तडक निघाली, ती व्हिट्बी येथील एका जहाजाच्या कप्तानापुढें जाऊन उभी राहिली.

त्याच्या दैवयोगानें तेथें गेल्याबरोबर दगडी कोळसे वाहणाऱ्या एका जहाजावर त्याला खलाशाची नौकरी मिळाली, व याच नौकरींत पुढें त्यानें तेरा वर्षें काढलीं. त्या वेळच्या नावाड्यांचें काम फारच कष्टाचें व कठीण असे. जहाजें बहुधा अत्यंत ओबडधोबड, व त्यांपैकीं बरींच फुटकीं असत. अर्थात् आंत शिरलेलें पाणी बाहेर काढून त्यांना तरतीं ठेवणें हें एक महत्वाचें कामच होऊन बसे. असलीं फुटकीं जहाजें वापरणारे खलाशी अर्थातच धीट, पोहण्यांत कुशल व वेळेवर वाटेल तें काम करण्यास राजी असे असावे लागत. अन्नपाणी तरी बरें मिळेल म्हणावें, तर तेंही नाहीं. जाडींभरडीं

व किड्यांनीं भुगा केलेलीं बिस्कुटें, कित्येक दिवसांचें शिळें व घाणेरडें ( गोडें ) पाणी, अशा सामग्रीवर त्यांना कित्येक दिवस काढावे लागत. पण तक्रार करण्याची सोय नाहीं. कारण तक्रारी नौकरांस चाबकांचा खरपूस मार बसे. या कडक तालमींत जेम्स् कुक्ला मात्र त्याच्या भावी आयुष्यक्रमाला उपयोगी असें अमूल्य शिक्षण मिळालें, व कसल्याही संकटानें न डगमगणारा, कसल्याही श्रमानें न थकणारा, व कसल्याही अडचणींत न गोंधळणारा असा नाविक तो बनला.

या गुणांची पारख होण्याची वेळही लौकरच आली. इ. स. १७५६ सालीं इंग्लंड व फ्रान्स या देशांत युद्ध सुरू झालें, व या वेळीं इंग्रजी आरमारांत पुरेशीं लढाऊ जहाजें नसल्यामुळें सरकारास खाजगी व्यापारी जहाजांचा उपयोग लढाईचे कामीं करावा लागला. जेम्स् कुक् ज्या जहाजावर काम करीत असे, तेथें त्याचा दर्जा हल्लीं थोडासा वाढला असून हुशार खलाशी म्हणून त्याचा लौकिक झाला होता. यामुळें इंग्रजी आरमार खात्यांत त्याला चटकन् नौकरी मिळाली, व उत्तर अमेरिकेंतील इंग्रजी वसाहतींच्या बचावासाठीं जो जहाजांचा काफिला रवाना होणार होता, त्यांपैकीं एका ईगल ( गरुड ) नांवाच्या जहाजावर त्याची नेमणूक झाली. त्या जहाजावरचा मुख्य आफिसर कॅप्टन् पॅलिसर् याची थोड्याच अवधींत कुक्च्या अंगीं कांहीं लोकोत्तर गुण आहेत अशी खातरी पटली, व त्याच्याच कृपेनें कुक्ला भराभर बढती मिळत जाऊन वयाच्या तिसाव्या वर्षी मर्क्युरी ( मंगळ ) या नांवाच्या जहाजावरील मुख्याधिकारी तो बनला, व कॅनडा प्रदेशांतील महत्त्वाचा किल्ला जो

क्वेबेक् त्यास वेढा घालून तो सर करण्याचे कामीं सेनापति वूल्फ यास मदत करण्याचा त्याला हुकूम झाला.

क्वेबेक्च्या वेढ्याचे प्रसंगीं कुक्नें फारच हुषारी व बहादुरी दाखविली. शत्रूच्या तोफखान्यावर आपल्या तोफांची मारगिरी करण्यासाठीं आपलीं जहाजें माऱ्याची पण सुरक्षित जागा पाहून तेथें उभीं करणें फार आवश्यक होतें. व यासाठीं समुद्रांत ठिकठिकाणीं पाण्याची खोली किती आहे हें दर्शविणारे नकाशे तयार करण्याची जरूरी होती. शत्रूंची नजर चुकवून हे नकाशे काढण्याचें काम किती कठीण होतें हें सांगण्याची गरज नाहीं. या कामावर कुक्ची नेमणूक झाली, व तें त्यानें उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें. दररोज रात्रींच्या वेळीं हें समुद्राचा ठाव घेण्याचें काम चाले, व तें शत्रूंच्या छावणीसमोरच करावें लागे. अखेरीस एके रात्रीं हा प्रकार शत्रूंच्या ध्यानांत आला, व त्यांनीं ताबडतोब तांबड्या इंडियन् लोकांची एक टोळी खूब जलद चालणाऱ्या होडग्यांतून कुक्चा पाठलाग करण्यासाठीं पाठविली. कुक्ला शक्य तितकें जलद पळून जाण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. पुढें याची होडी, व मागून इंडियन् लोकांच्या होड्या, अशी धांवपळ कांहीं वेळ चालली. अखेरीस इंग्रज छावणीशेजारीं कुक्ची होडी किनाऱ्यास येऊन लागली. एका क्षणांत कुक्नें उडी ठोकली, व तो तीरासारखा आपल्या सैन्यांत जाऊन मिसळला. एवढ्या गर्दींतही आपण मोठ्या खटपटीनें तयार केलेलें नकाशांचें पुडकें काखेंत मारून सुरक्षितपणें आणण्यास तो विसरला नाहीं.

## भाग २ रा

क्वेबेक्‌च्या विजयानंतर कॅनडा इंग्रज लोकांच्या ताब्यांत आला. यानंतर कांहीं दिवसपर्यंत कुक्‌ची नेमणूक उत्तर अमेरिकेंतील आरमार खात्यांतच होती. इ. स. १७६७ च्या सुमारास तो इंग्लंडांत परत आला. या वेळीं पॅसिफिक महासागरांतील प्रदेशांकडे इंग्लंडांतील जनतेचें लक्ष अनेक कारणांनीं वेधलें होतें. इ. स. १७६८ सालीं त्या महासागरांतील प्रदेशाची पाहाणी करण्यासाठीं एक मंडळी पाठवावी अशी योजना करण्यांत आली. त्या यात्रामंडळाचा पुढारी होण्यास कॅप्टन् कुक् इतका लायख दुसरा माणूस मिळणें कठीण होतें. अर्थात् हे काम त्याच्याच गळ्यांत पडले, व तो १७६८ सालच्या आगस्ट महिन्यांत पोर्ट्‌स्मथ् येथून **एन्डेव्हर** (प्रयत्न) या नांवाच्या जहाजांतून या सफरीवर निघाला.

दक्षिण अमेरिकेचें अगदीं शेवटचें टोंक जें केप हॉर्न (शृंगभूशिर) त्याला वळसा घालून १७६९ च्या एप्रिल महिन्यांत तो ओटाहीट नांवाच्या बेटावर पोंचला. तेथें असतांना ज्योतिःशास्त्र-दृष्टया महत्त्वाचे असे कांहीं आकाशस्थ ग्रहांचे वेध घेण्यांत आले. जून महिन्यांत जहाज पुनः हाकारलें, व आक्टोबर महिन्यांत ही मंडळी न्यूझीलंडच्या किनाऱ्यावर लागली. हा प्रदेश म्हणजे दक्षिणेकडील एका मोठ्या महाद्वीपाचा (खंडाचा) एक भाग आहे अशी त्या वेळेपर्यंत समजूत होती. परंतु कुक्‌नें लवकरच त्या सर्व प्रदेशाभोंवतीं प्रदक्षिणा केली, व त्यामुळें हें खंड नसून दोन निरनिराळीं बेटें आहेत असें ठरलें. मग त्यानें आपला मोर्चा

आस्ट्रेलिया बेटाकडे वळविला, व त्या बेटाच्या उत्तर टोंकास वळसा घातल्यावर आस्ट्रेलिया व न्यूगिनी हीं (आतांपर्यंतच्या समजुतीप्रमाणें) एकमेकांस जोडलेलीं नसून अगदीं अलग असे प्रदेश आहेत, असेंही निश्चित ठरलें.

टॉरेस सामुद्रधुनींतून निघून पुढें केप् ऑफ् गुड् होप् (आफ्रिका खंडाचें दक्षिण टोंक) वरून स्वदेशीं परत यावयाचा कुक्नें निश्चय केला. आतांपर्यंत त्याच्या प्रवासांत फारशीं संकटें आलीं नव्हतीं. मात्र वाटेंतील समुद्रांतर्गत खडकांवर (ग्रेट बॅरियर रीफ) आदळून जहाज बरेंच खिळखिळें झालेलें होतें, त्यामुळें हें सुरक्षितपणें जावा बेटांतील बटेव्हियापर्यंत नेतांना त्याला आपलें सर्व कौशल्य खर्च करावें लागलें. येथें जहाजाची दागदुगी करून पुढील प्रवासाची तयारी करण्यांत आली. बटेव्हियाचा किनारा सोडतो न सोडतो तोंच कुक्च्या जहाजावर स्कर्व्हीं रोगाचा प्रादुर्भाव झाला; इतका कीं सहा आठवड्यांत सत्तावीस माणसें दगावलीं, व कामाला योग्य अशीं फारच थोडीं माणसें शिल्लक राहिलीं! स्कर्व्हीं व त्याच जातीचे रोग या काळीं जहाजांवरील माणसांत फार पसरत, व त्यामुळें फार नुकसान होई. याचें मुख्य कारण बहुधा एकच असे. तें म्हणजे गलिच्छ पाणी, व ताजें मांस व भाजीपाला यांचा अभाव. आगबोटींचा शोध अद्याप लागलेला नव्हता. त्यामुळें समुद्रावरचा प्रवास अत्यंत सावकाश होई; शिवाय हवा अगदीं शांत व स्तब्ध झाली किंवा वारा प्रतिकूल दिशेनें

---

१ हा रोग रक्त बिघडल्यानें होतो, व यानें अंगावर पुरळ, खवडे वगैरे उठून ते चिघळतात व भराभर पसरत जातात.

वाहात असला, म्हणजे दिवसान् दिवस नांगर टाकून कोठें तरी उगीच पडून राहावें लागे. अशा वेळीं जवळचें गोडें पाणी, मांस, व भाजी-फळें इत्यादि पदार्थ किती दिवस पुरणार ? अर्थातच शिळें अन्न व घाणेरडें पाणी यांजवर भागवून घेण्याची पाळी येई. व याचमुळें स्कर्व्हीसारख्या रोगांचा प्रादुर्भाव होऊन भयंकर प्राणहानि होई.

हा प्रसंग एकाद्या लेच्यापेच्या माणसावर आला असता तर त्याची गाळणच उडाली असती. किंबहुना हें एक दैवी संकट आहे असें समजून "आलीया भोगासी असावें सादर, देवावरी भार घालूनीयां" म्हणून तो स्वस्थ बसला असता. पण कॅप्टन् कुक् अशा कच्च्या दिलाचा माणूस नव्हता. त्यानें या रोगाचें मूळ शोधून काढून त्याचा नायनाट करण्याचा निश्चय केला. पण ही गोष्ट थोड्या अवकाशानें होण्यासारखी होती. तूर्त उरलेल्या माणसांसह इंग्लंड देशाला परत कसें पोंचावें हाच प्रश्न महत्वाचा होता; व कुक्च्या प्रसंगावधानामुळें तोही सुटून हें खिळखिळें जहाज व त्यांतील थकले भागलेले लोक एकदाचे १७७१ च्या जुलई महिन्यांत स्वदेशीं पोंचले. ह्या यात्रेस एकंदर तीन वर्षें लागलीं.

फिरून पुढच्या जुलईंत कुक्च्या दुसऱ्या सफरीस सुरवात झाली. या वेळीं दक्षिण महासागरांतील प्रदेशांचा पुरता शोध लावण्याच्या उद्देशानें दोन जहाजें—यांचीं नांवें रेझोल्यूशन (दृढनिश्चय) व ॲडव्हेंचर (धाडस) अशीं होतीं—त्याच्या ताब्यांत देण्यांत आलीं.

त्यानें आपला मोर्चा थेट दक्षिण महासागराकडे वळवला, व दक्षिण ध्रुवाच्या भोंवतीं बर्फाची जी प्रचंड तटबंदी आहे तींतून ध्रुवप्रदेशाकडे जाण्याचा मार्ग सांपडतो किंवा नाहीं हें पाहाण्याचा

यत्न सुरू केला. या प्रदेशांत बर्फाचे मोठे विस्तीर्ण पर्वतप्राय खंड (आइसबर्ग्) समुद्रावर तरंगत असतात. त्यांना चुकवून मधून जेथें वाट सांपडेल तिकडून जहाज चालवावें, व ध्रुवानजीक जो भूमिभाग—महाद्वीप—आहे असें म्हणतात तेथपर्यंत जावें अशी त्याची खटपट होती. ह्या प्रदेशाचा तर या वेळीं शोध लागला नाहींच. पण या थंड प्रदेशांतील प्रचंड हिमनगांवर आदळून, अथवा दोन हिमनगांच्या मध्यें चिरडून त्याच्या जहाजांचा चक्काचूर झाला नाहीं, हेंच भाग्य म्हणावयाचें! या वेळींही कॅप्टन् कुक्चें अचल धैर्य व शांत डोकें यांनींच त्या सर्वांचा बचाव झाला. दक्षिण ध्रुवप्रदेशाचें कोडें जरी या प्रसंगीं उलगडलें नाहीं तरी कुक्नें या वेळीं एक फारच महत्वाचा शोध लाविला. तो वर सांगितलेल्या स्कर्व्ही रोगाच्या कारणाचा होय. स्वच्छ पाणी मिळण्याचा एक उपाय म्हणजे गोडें पाणी वरचेवर मिळविण्यासाठीं छोटे छोटे प्रवास करणें. पण हा उपाय अशा प्रसंगीं अशक्य होय. कारण एकदां तर त्यांना अकरा हजार मैलांचा प्रवास करी तोंपर्यंत जमिनीचें दर्शन झालें नाहीं! कुक्ला रोगाचें निर्मूलन करतां आलें तें त्यानें जहाजावर सर्वच बाबतींत **स्वच्छतेविषयीं जी खबरदारी घेतली** तिजमुळें होय. जहाजावरील माणसांना स्नान, कपडे धुणें व आपला बिछाना स्वच्छ राखणें या बाबतींत अतिशय कडक नियम त्यानें घालून दिले. जहाजावरील हवा स्वच्छ राहावी म्हणून तो मधून मधून डेकवर मोठी आगटी पेटवी; त्यामुळें वारा वाहूं लागून भोंवतालची शुद्ध हवा तेथें आकर्षिली जाई. रक्तशुद्धीला उपयोगी असे खाद्य पदार्थ आपल्या बरोबर भरपूर बाळगून तो आपल्या मंडळीस ते नियमित रीतीनें वांटून देई. या सर्व तजविजीचा

परिणाम असा झाला कीं, तीन वर्षें व अठरा दिवसपर्यंत सारखी समुद्रयात्रा करून तो जेव्हां इंग्लंडला परत आला, तेव्हां त्याच्या मंडळीपैकीं केवळ चार माणसें मृत्यूनें कमी झालीं होतीं, व या चारींपैकीं आजारामुळें एकच मरण पावला होता! ज्या वेळीं समुद्र-यात्रेमध्यें निदान एक तृतीयांश माणसें तरी रोगाला बळी पडलींच पाहिजेत असा सार्वत्रिक समज होता, त्या वेळीं कुक्‌ची ही यशस्वी मोहीम किती कौतुकास्पद वाटली असेल बरें? उद्योग व अक्कल यांचे जोरावर माणूस काय करूं शकतो याचें हें उत्कृष्ट उदाहरण नाहीं काय?

फिरून एका वर्षाचे आंत कुक् तिसऱ्या सफरीवर निघाला. या खेपेस रेझोल्यूशन् हें जहाज होतेंच. पण दुसरें जहाज **डिस्कव्हरी** (संशोधन) या नांवाचें होतें. या खेपेस त्याचा उद्देश वायव्येकडून उत्तर अमेरिकेला वळसा घालून ॲटलांटिक महासागरांतून पॅसिफिक महासागरांत प्रवेश करण्याचा होता. याच प्रवासांत असतांना सँड्‌विच बेटांपैकीं हावाई नांवाच्या बेटांत त्याचा खून झाला. या दुःखदायक प्रसंगाची हकीकत अशी आहे.

तो या बेटांत इ. स. १७७९ च्या जानेवारी महिन्यांत पोंचला. प्रथमतः तेथील रानटी लोकांनीं अगदीं देवाप्रमाणें त्याचें स्वागत केलें. या अडाणी लोकांत बरेच दिवसांपासून अशी एक समजूत पसरली होती कीं, पूर्वीं एका काळीं एक मोठा प्रबल देव हें बेट सोडून निघून गेला होता. जातांना त्यानें असें आश्वासन दिलें होतें कीं, "मी फिरून येथें परत येईन तो एका बेटावरच बसून येईन व माझे बरोबर झाडें, कुत्रीं व डुकरें घेऊन येईन". त्या अडाणी माणसांना

कुक्चें मोठें जहाज म्हणजे एक बेटच वाटलें. त्यावरील शिडें बांधण्याच्या डोलकाठ्या ह्यांना ते झाडेंच समजले; व जहाजावर डुकरें व कुत्रीं तर होतींच. मग काय? ज्याची आपण वाट पहात होतों तोच हा देव, असें समजून त्यांनीं कुक्पुढें दंडवत घातलें, त्याची पूजाअर्चा केली, व त्याकरितां देवळें उभारण्यापर्यंत मजल नेली! याप्रमाणें थोडे दिवस गेल्यावर कुक़नें तें बेट सोडून पुढें कुच केलें. पण दुर्दैवाची गोष्ट; थोड्याच दिवसांत तुफान झालें, व त्यामुळें पुढें जाण्याऐवजीं खिळखिळें झालेलें जहाज दुरुस्त करण्यासाठीं कुक्ला फिरून हावाई बेटाचा आश्रय घ्यावा लागला.

पण काय असेल तें असो; या खेपेस त्या द्वीपवासी लोकांची वृत्ति अगदीं बदलून गेली होती. या पाहुणे मंडळीचें स्वागत करणें तर दूरच राहिलें, पण ते त्यांना टाळण्याचा यत्न करूं लागले; किंबहुना त्यांच्याशीं शत्रुभावानें वागूं लागले. ता. १४ फेब्रुवारी रोजीं असें आढळून आलें कीं, या लोकांनीं जहाजावरील एक लहानशी होडी चोरून नेली आहे. लगेच कॅप्टन् कुक्नें ती परत मिळविण्यासाठीं आपल्या खलाशांची एक तुकडी रवाना केली. या लोकांची व त्या रानटी लोकांची होडीविषयीं बोलाचाल सुरू असतां कुक्कडील एका माणसानें दुरून बंदूक झाडली, व ती गोळी लागून तद्देशीय लोकांचा एक पुढारी पडला. मग काय विचारतां? एकच हाहाकार होऊन सर्व बेटांतून लोक धांवून आले, व त्यांनीं इंग्रजांवर जोराचा हल्ला चढवला. कुक् ह्या हल्ल्यांत जवळ जवळ पहिलाच बळी पडला. समुद्र-किनाऱ्याजवळ पाण्यांतच उभा राहून तो आपल्या माणसांना कांहीं तरी हुकूम सोडीत होता. इतक्यांत मागाहून एका माणसानें त्याच्या

पाठींत खंजीर खुपसला. त्यासरशीं तो पाण्यांत पडला, व फिरून उठलाच नाहीं !



चित्र ४—कॅप्टन् कुक्‌चा अंत

अशा रीतीनें या विख्यात नाविक वीराचा आकस्मिक अंत झाला. आस्ट्रेलियांतील ब्रिटिश वसाहतीचा पाया तर त्यानें घातलाच, पण या शिवाय आपल्या प्रवासांत ठिकठिकाणीं त्यानें भूगोलविषयक, प्राणी व वनस्पति यांसंबंधीं, व रानटी लोकांचे आचार, विचार व समजुती यांविषयीं जी माहिती मिळविली, ती त्यानें आपल्या रोजनिशींत फार मनोवेधक रीतीनें लिहून ठेवली आहे. तिचा उपयोग त्यापुढें होऊन गेलेल्या संशोधकांस फार झाला, व अद्यापि होत आहे.

प्रश्नः—( १ ) कुकला नौकानयनाच्या धंद्यांत पडण्याची इच्छा होण्यास कोणत्या गोष्टी कारण झाल्या? या धंद्यांत यशस्वी होण्यास त्याच्या अंगचे कोणते गुण उपयोगीं पडले?

( २ ) खालील प्रसंगांचें थोडक्यांत वर्णन द्याः—

( अ ) क्वेबेक्च्या वेढ्यांत कुक्नें बजावलेली कामगिरी.

( ब ) स्कर्व्ही रोगाचा प्रतिकार त्यानें कसा केला?

( क ) त्याची दक्षिण ध्रुवाकडील सफर.

( ड ) शेवटची सफर व मृत्यु.

( ३ ) कुकनें कोणत्या देशांचा चांगला शोध लावला, व त्याचा पुढें काय उपयोग झाला?

---

## ८

# वसईचा मोहरा

[ खालील उतारा 'पेशव्यांची बखर' या जुन्या ग्रंथांतून घेतला आहे. थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांचे कारकीर्दींत त्यांचे बंधु चिमाजी अप्पा यांनीं पोर्तुगीज लोकांकडून वसईचा किल्ला काबीज केला ( इ. स. १७३९ ) त्या वेळच्या मोहिमेचें सरस वर्णन या उताऱ्यांत आहे.]

मागतीं चिमाजी आपा कोंकणपट्टीला स्वारीस निघाले, ते कोंकणांत येऊन तळा, घोसाळा, अवचितगड, बिरवाडी, करनाळा, रेवदंडा, बेलापूर, साष्टी, असा मुलूख आपले कबजांत आणून आपला अंमल चालता केला. पुढें मुलूख काबीज करावा, अशा

बेतानें जाऊन वसईला लागले. तेथें अंमल पहिला फिरंग्यांचा[1]. तेव्हां शह[2] जाऊन दिला; परंतु किल्ला समुद्रांत. एक आंग खुषकीला[3]. त्यासमयीं आपासाहेब यांनीं जहाजें तयार करून, आरमार जमवून, समुद्रांतून लढाईचा उद्योग केला; तीन वर्षे वसई भांडली. किल्ला हस्तगत होतां दिसेना. मनुष्य फार कामास[4] आले. नऊ लाख बांगडी फुटली[5]. लढाईचा मोठा प्रसंग केला, परंतु किल्ला हस्तगत होईना. चिमाजी आपा यांचा तर किल्ला घेण्याचा निश्चय मोठा. तेव्हां सर्व सरदार आपले जमा करून त्यांजला आपासाहेब बोलले कीं, "किल्ला हस्तगत होत नाहीं, याजकरितां मजला तोफेच्या तोंडीं बांधून माझें डोकें तरी किल्ल्यांत पाडावें, नाहीं तर किल्ला घ्यावा." तेव्हां सर्व सरदार यांनीं आपासाहेबांस सांगितलें कीं, "जो आपला निश्चय झाला, तोच नेम आमचा आहे; परंतु कांहीं तरी किल्ल्यांतील भेद[6] समजल्याशिवाय किल्ला हस्तगत होणें कठीण. यासाठीं याचा विचार करून कांहीं तरी मसलत काढली पाहिजे, मग दुसरा विचार किल्ला घेण्याचा ठरवूं. आधीं किल्ल्यांतील भेद आणावा."

तेव्हां सर्वांनीं विचार करून खंडोजी माणकर यांस गुराखी करून, त्यांणीं किल्ल्यांत जाऊन गुरें राखावयाची नोकरी पतकरली. रोज किल्ल्यांत जाऊन लोकांचीं गुरें चारावयास न्यावीं आणि फिरून किल्ल्यांत पावतीं करावीं, असा क्रम माणकर यांणीं चालविला. दुसरे आंजूरकर पंचकळशे सुतार सरदार होते, त्यांणीं सुतारकाम करावयास किल्ल्यांत जाण्याचें पतकरून, रोज किल्ल्यांत जावें आणि लोकांचे

---

१ पोर्तुगीज लोकांचा. २ वेढा. ३ जमिनीचे बाजूस. ४ मारले गेले. ५ ही अर्थात् अतिशयोक्ति आहे. ६ गुप्त बातमी.

घरीं सुतारकाम करावें. दुलबाजी मोरे सरदार होते, त्यांणीं कासारपणा पतकरून रोज किल्ल्यांतील लोकांचे बायकांस किल्ल्यांत जाऊन बांगड्या भरून बाहेर येत जावें. याप्रमाणें तिघांनीं किल्ल्याचा भेद आणल्यावर, आपले लष्करांतून सुरुंग[1] खणून, किल्ल्याचे बुरुजाखालीं सुरुंग नेऊन, त्यांत दारूचे बुधले भरून बत्ती दिली. तेव्हां तो बुरूज उडाला, तो मागतीं जागचे जागीं बसला. नंतर दुसरा सुरुंग पाडावयास काम चालविलें. त्या समयीं किल्ल्यांतील फिरंगी याची बायको जहाजांत बसून बाहेर निघाली. तें पाहून सरकारचीं जहाजें धावून फिरंग्यांचें जहाज धरलें, आणि त्या बायकोस श्रीमंतांकडे आणिली, व ती बहुत देखणी रूपवान होती, म्हणून श्रीमंतांस दाखविली. त्यांणीं पाहून आपले लोकांस बोलले कीं, "ही कशाला धरून आणिली?" असें बोलून तिला सार्डी, चोळी नेसवून सोडून दिली. तेव्हां ती माघारी जाऊन आपले नवऱ्यास तिनें वर्तमान सांगितलें कीं, "तुम्ही त्याशीं कशासाठीं भांडतां? तो पुण्यवान् आहे; मी तेथें गेल्यें असतां मला बांकडे दृष्टीनें पाहिलें देखील नाहीं, तेव्हां त्याशीं लढून यश येईल, असें दिसत नाहीं, व तुम्हांस दुसरेकडून कुमकही येत नाहीं." असा तिणें उपदेश केला. याजकरितां गलिमोशीं[2] सल्ला करून, स्नेह ठेवून, आपले खटल्यासुद्धां निघून जावें. याप्रमाणें ठरल्यावर फिरंगी यांणीं श्रीमंत यांजकडे बोलणारा पाठवून तह केला कीं, "आमचे पदरीं कारकून आहेत त्यांचा सांभाळ आपण करावा. आणि आमची जात

---

१ खडक फोडण्यास त्यांत भोंक पाडून व त्यांत दारू ठासून ती पेटवून देतात. यास सुरुंग लावणें असें म्हणतात. २ गलीम किंवा गनीम—शत्रु.

आहे, त्यांजला हरएक बेगार[1] सांगूं नये; आणि आम्हांस आठ दिवसांची मुदत द्यावी, म्हणजे आम्ही आपला सरंजाम घेऊन जातों आणि किल्ला तुमचे हवालीं करतों." त्यावरून आपासाहेब यांणीं कबूल करून त्यांचे पदरचे कारकून होते, त्यांस "दरसाल ३६ रुपये व पंधरा मण भात याप्रमाणें देऊं, त्यांजकडे कामकाज सांगणार नाहीं. व तुमचे जातीचे लोकांस बिगार सांगणार नाहीं," असें ठरल्यावर फिरंगी यांणीं आपली सर्व वस्तभाव, सारें खटलें, आपले जहाजांत भरून किल्ल्यांतून निघून गेले. पुढें आपासाहेब यांणीं किल्ल्यांत शिरून भगवे झेंडे किल्ल्यावरतीं चढविले. वसईखालीं नऊ लक्षांचा मुलूख होता, तितक्या मुलुखाचा अंमल चालता केला. असा गुजराथपावेतों अंमल बसवून श्रीमंत आपासाहेब मागतीं माघारे येऊन वसईवर मुक्काम केला. तेथें आल्यानंतर लढाईंत लोक पडले होते, त्यांस कित्येकांस पालख्या दिल्या, व कित्येकांस गांव इनाम दिले. कित्येकांस जमिनी दिल्या. बालपरवेशी[2] पडलेले लोकांची चालविली. ज्याला संतति नव्हती, त्याची नानापरवेशी[3] चालविली. असा सारा बंदोबस्त करून शंकराजी केशव फडके यांजकडे वसई सरसुभा सांगितला. असा बंदोबस्त करून श्रीमंतांची स्वारी पुण्यास येऊन, बाजीरावसाहेब यांस सारा मजकूर सांगून, साताऱ्यास जाऊन, शाहूमहाराज यांस भेटून मुलूख सर केला, हा मजकूर महाराजांस सांगून, मागतीं चिमाजी आपा पुण्यास आले.

---

१ वेतन न देतां सक्तीनें काम करून घेणें. २ बालपरवर्षा—लढाईंत पडलेल्या शिपायांच्या कुटुंबांस दिलेला पगार, पेन्शन, गांव, जमीन. ३ लढाईंत मयत होऊन वंश नसेल तर बायकोच्याच निर्वाहापुरतें देणें.

प्रश्नः—( १ ) वसईची मोहीम सुरू करण्यास कारण काय झालें ?

( २ ) किल्ला सर करण्यास मराठ्यांस इतके श्रम कां पडले ?

( ३ ) वसईच्या मोहिमेंत चिमाजी अप्पाच्या अंगचे कोणते गुण मुख्यतः दिसून आले ?

( ४ ) या प्रकरणांत आजकाल प्रचारांत नसलेले असे जे शब्द किंवा विभक्तिरूपें आलीं आहेत तीं वेगळीं काढून दाखवा.

---

९

# इतिहास

[ खालील उतारा परलोकवासी **विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांच्या निबंधमालेंतील ‘ इतिहास ’ या विषयावरील निबंधांतून संक्षेपरूपानें घेतला आहे. मराठी गद्यरचनेला जोरदार व भारदस्त असें नवें वळण लावणारा पहिला दांडगा लेखक विष्णुशास्त्रीच होय. स्वतंत्र विचार, निरुत्तर कोटिक्रम, व निष्ठुर विनोदात्मक टीका यांबद्दल त्यांचे लेख प्रसिद्ध आहेत. ]

इतिहास या शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे. इति–ह–आस—म्हणजे ‘ या प्रमाणें झालें.’ तेव्हां या शब्दाचा अर्थ मागें घडलेला वृत्तांत असा आहे. मूळापासून आतांपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडल्या त्या सर्वांचें टिपण ज्या ग्रंथांत केलेलें असतें त्याचें नांव इतिहास.

सप्रमाण[1] व खरे इतिहास लिहिण्याची प्रवृत्ति जशी ग्रीक व रोमन लोकांत प्राचीन काळीं दिसून आली, तशी ती आपल्या देशांत कधीं पडली असेल असें दिसत नाहीं. हा एके रीतीनें मोठा

---

१ एखादा वृत्तांत खरा आहे याबद्दल पुरावा देणारे.

चमत्कार आहे. कारण जे प्राचीन हिंदू लोक त्या वेळेस सर्व राष्ट्रांत अग्रगण्य होते, ज्यांच्यांत विद्या तर सर्व रूपानें पूर्ण अवतरली होती, त्यांच्या हातून येवढें हेंच अंग सुटावें ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ? आहे खरी. याचीं कारणें दोन असावीं. आपल्या देशाच्या चतुःसीमा बहुधा अलंघ्यच असल्या कारणानें प्राचीन चीनी लोकांप्रमाणेंच आपले पूर्वजही आपल्या ठिकाणींच स्वस्थ व सुखरूप होते. ग्रीक व रोमन लोकांचा जसा नेहमीं शेजारच्या राष्ट्रांशीं वारंवार युद्धप्रसंग पडे तसा हिंदू लोकांचा कधींच पडला नाहीं. तेव्हां मोठे युद्धप्रसंग, मोठ्या राज्यक्रांति वगैरे जी इतिहासाची सामग्री, ती नसल्यामुळें इतिहास लिहून ठेवण्याचा पाठ इकडे पडला नसेल असें वाटतें. दुसरें एक मोठें कारण असें दिसतें कीं, आपल्या लोकांच्या मनाचा एकंदर कल निवृत्तिमार्गाकडे जेवढा दृष्टीस पडतो, तेवढा प्रवृत्तिमार्गाकडे नाहीं. जग सर्व मिथ्या आहे, प्रपंचांतील सर्व व्यवहार लटके आहेत, अवघा ईश्वरी मायेचा गोंधळ आहे, असे विचार ज्यांच्या मनांत नेहमीं घोळावयाचे अशा लोकांस राज्यांच्या घडामोडी, रक्तपात वगैरे गोष्टींचीं वर्णनें करून नरस्तुति गात बसण्याचा कंटाळा असल्यास काय नवल ?

या प्रमाणें इतिहासाचा अभाव हें आपल्या प्राचीन विद्येचें मोठें व्यंग होय. आतां हें शास्त्र केव्हां व कोठें प्रथमतः उत्पन्न झालें व याचा प्रसार कसा झाला याविषयीं लिहितों.

साऱ्या जगांत ज्ञानाचा जो प्रसार झाला आहे, त्याचे उगम

---

१ निवृत्ति—वैराग्य, संसाराचा कंटाळा; प्रवृत्ति—संसाराची आवड.

मुख्यतः दोन होत. एक **हिंदुस्तान** व दुसरा **ग्रीस** देश. पहिला देश जसा आशिया खंडाचें नाक होतें, तसा दुसरा देश यूरोपचें होतें. अर्वाचीन काळीं यूरोपांतील सर्व देशांत जी सुधारणा झाली आहे तिचें मूळ केवळ ग्रीस देश होय. यूरोपांत जी इतिहास लिहिण्याची प्रवृत्ति पडली आहे, तिचेंही कारण ग्रीस देशच होय. या देशांत **हिरॉडटस्** हा पहिला इतिहासकार झाला. ग्रीक लोकांचें पारसीकांशीं[1] मोठें दारुण युद्ध ज्या काळीं चाललें होतें त्याच काळांत हा जन्मला. त्यानें आपला इतिहास ग्रीस देशांत दर पांच वर्षांनीं "आलिंपिक गेम्स" नांवाचे जे सार्वजनिक उत्सव होत असत त्यांतील एका प्रसंगीं आपल्या देशबंधूंपुढें वाचला. त्यांतील विषय अगोदरच देशाभिमानाचा—म्हणजे ग्रीक लोकांच्या पराक्रमांचें वर्णन—असल्यामुळें, व इतरही चमत्कारिक माहिती मोठ्या चातुर्यानें आंत घातली असल्यामुळें तो ग्रंथ सर्व लोकांस फारच प्रिय झाला. याच प्रसंगाची दुसरी एक गोष्ट अशी सांगतात कीं, हिरॉडटस् आपला इतिहास वाचीत असतांना त्या समाजांतील एका नऊ वर्षांच्या मुलास इतका गहिंवर आला कीं, तो आंसवें ढाळूं लागला. तें पाहून त्या इतिहासकर्त्यानें असें भाकीत केलें कीं हा मुलगा पुढें मोठा नामांकित इतिहासकार निपजेल ! आणि खरोखरच तसें घडून आलें. तो मुलगा पुढें ग्रीस देशांतला, किंबहुना साऱ्या जगांतला, अत्युत्कृष्ट इतिहासकार, **थुसिडिडीज्** झाला. असो; या प्रमाणें आणखीही कित्येक इतिहासकार ग्रीस देशांत होऊन गेले;

---

१ पर्शिया अथवा इराण देशचे रहिवाशी; आपल्या देशांतील पारशी लोकांचे पूर्वज.

ग्रीक लोकांच्या वीर्याचा व वैभवाचा अस्त झाल्यावर पुढें **रोमन** लोकांची भरभराट झाली. त्यांच्यांतही कित्येक मोठमोठे इतिहासकार झाले. पुढें रोमन लोकांनीं हजार दीड हजार वर्षें राज्यवैभव भोगल्या-वर त्यांची सद्दी संपली, आणि आरब व तुर्क लोकांचें दैव उदयास आलें. इतिहास लिहिण्याचा प्रघात त्यांनींही ( बहुधा ग्रीक लोकां-पासून ) उचलला. अलीकडील इंग्लिश वगैरे लोकांनीं तर तो थेट ग्रीक व रोमन लोकांपासून उचलला हें वर सांगितलेंच आहे.

इतिहासाचा उपयोग काय ? हा प्रश्न दिसतांच असमंजस दिसून कोणी करीत नसतीलसें प्रथमतः वाटतें. कां कीं दुसरा कोणताही उपयोग नाहीं म्हटला, तरी मनुष्याच्या मनास अत्यंत स्वाभाविक अशी जी जिज्ञासा ती तरी त्याच्या योगानें तृप्त होते, हाच काय थोडा उपयोग आहे ! हा अगदीं निदान पक्षींचा उपयोग सांगितला,— दुसरे जे इतिहास वाचल्यापासून मोठमोठे नफे आहेत ते पुढें सांगण्यांत येतीलच. पण असें असतांही इतिहासांत ज्यांस कांहीं अर्थ दिसत नाहीं, जे त्याचा तिरस्कार करितात, असे मनुष्य पुष्कळ आढळतात. "अहो, मागील काळाशीं आपणाला काय करावयाचें आहे ? ते लोक गेले, मेले, पार झाले; आतां त्यांची कर्मकटकटें[1] आपणास कशाला हवी ? बाजीरावानें दिल्ली घेतली, नाना फडणविसानें अशी अशी युक्ति लढविली—आपणाला त्यांत काय लभ्य आहे ? सध्यां चाललें आहे तें खरें ! ज्यांत आपला कांहीं नफाही नाहीं व तोटाही नाहीं अशा मागच्या गोष्टी मिळवायाच्या, जुने लेख पहावयाचे, वगैरे

---

1 वायफळ चर्चा.

जी विनाकारण यातायात करावयाची, तींत काय अर्थ ? "—असें म्हणणारे पुष्कळ सांपडतील. खरेंच जीवमान आहे तोंवर खाऊन घ्यावें, पिऊन घ्यावें; दुपारची वामकुक्षी[1] चुकूं देऊं नये; संध्याकाळच्या खाशा वेळीं शानदारसा पोषाख करून बाहेर पडावें; मग गंध्याचें दुकान किंवा (विद्येचा शौक अगर सुधारणेंत पुढारीपणा दाखवावयाचा असल्यास) लायब्ररी, अशा ठिकाणीं चार घटका साऱ्या जगाच्या उलाढाली करून नंतर रमत रमत घरीं यावें !—अशा प्रकारचा स्तुत्य आयुष्यक्रम ज्यांनीं निरंतर चालवावा अशा थोर लोकांपुढें बाजीराव काय आणि मोठा शिकंदर बादशहा झाला म्हणून तो तरी काय ! असो; या वामकुक्षीवाल्यांच्या मतांत कांहींच अर्थ नाहीं. पण नवल हें कीं ज्यांच्या ठायीं विचारशक्ति चांगली प्रखर दृष्टीस पडते, व जे समंजसतेचा मोठा आव घालतात, अशांमध्येंही इतिहासावरची अप्रीति पुष्कळ वेळां दृष्टीस पडते. इंग्रज लोकांतला प्रसिद्ध ग्रंथकार डॉ. जान्सन्[2] हा अशा विषयींचें एक मोठें उदाहरण आहे. हा वर्ग दुराग्रही व स्थूलबुद्धि लोकांचा होय. यांचीं मतें इतर विषयांवर कितीही मान्य असलीं तरी ज्यांवर त्यांनीं कधींही व्यासंग केला नाहीं, व ज्यांचा आस्वाद घेण्यास त्यांची स्थूलबुद्धि

---

१ झोंप. २ डॉ. जॉन्सन् हा इ. स. च्या अठराव्या शतकांत इंग्लंडमध्यें एक विख्यात ग्रंथकार होऊन गेला. इंग्रजी भाषेचा पहिला मोठा शब्दकोश यानेंच रचला. याचे अनेक निबंध व 'रासेलस' या नांवाची गंभीर चर्चात्मक कादंबरी हीं इंग्रजी वाङ्मयांत फार प्रसिद्ध आहेत. विष्णुशास्त्र्यांच्या निबंधमालेंत डॉ. जॉन्सन् यावरील चरित्रात्मक निबंध फारच चित्ताकर्षक असा वठला आहे, तो वाचकांनीं अवश्य वाचावा.

स्वभावतःच समर्थ नाहीं, अशा विषयांवरचीं त्यांचीं मतें असमंजसच समजण्यास हरकत नाहीं.

## भाग २ रा

आतां इतिहासाचे उपयोग कोणकोणते आहेत याविषयीं लिहितों.

एक तर वर सांगण्यांत आलाच आहे. कोणता ? तर जिज्ञासा-तृप्ति. ईश्वरानें ही मनोवृत्ति मनुष्याच्या ठायीं मोठी प्रबळ ठेविली आहे. पहा बरें, मनुष्याचा अंतराळांतील गोलांशीं काय संबंध आहे ? पृथ्वी फिरत असली कीं सूर्य फिरत असला, चंद्र स्वयंप्रकाशित असला कीं परप्रकाशित असला, ग्रहमालेचा मध्य पृथ्वी असली कीं सूर्य असला, तारे कितीही असले, कांहींही असलें, तरी त्यांत मनुष्याचें काय बरें हिताहित आहे ? मागें सूर्य फिरतो असें लोक मानीत होते, आतां पृथ्वी फिरते असें मानतात; म्हणून मनुष्यें काय रोग्याचीं निरोगी झालीं, कीं दरिद्राचीं संपन्न होऊन बसलीं ? एवढी उठाठेव करून, दुर्बिणीची कल्पना काढून, नानाप्रकारचीं गणितें करून ज्योतिष्यांस किंवा मनुष्यांस कोणता फायदा झाला ?—खरें आहे. कवडीचाही झाला नाहीं. पण सूर्यबिंबाचा चंद्रानें ग्रास केला, किंवा शुक्र सूर्याच्या आड आला, कीं लोक कोणी हिंदुस्तानांत, कोणी अमेरिकेंत, कोणी दक्षिण समुद्रांत, धांव घेतातच कीं नाहीं ? तेव्हां सांगावयाचें काय कीं अंतराळांतील दूरवरच्या गोलांविषयींही जर मनुष्याच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न होते, तर ज्या गोलावर तो वास करतो त्यावर निरनिराळ्या ठिकाणीं काय वृत्तांत घडले, हें समजून घेण्याची त्यास उत्कंठा होणार नाहीं काय ?

वर सांगितलेला इतिहासाचा उपयोग सर्वांत पहिला, साधा व लहान असा होय. तरी इतिहासाची प्रवृत्ति मूळारंभीं पडण्यास तोच कारण आहे असें दिसून येईल. त्याहून वरचढ दुसरा उपयोग म्हणजे **नीतिबोध.** सज्जनांचा जय व दुर्जनांचा पराजय असेंच जरी इतिहासांत नेहमीं आढळत नाहीं, तरी एकंदरींत परिणाम असाच दृष्टीस पडतो. शिवाय दुसरें असें लक्षांत येतें कीं, भलेपणानें वागूनही नेहमीं परिणाम लागतोच असें नाहीं, तरी पण दुष्टपणा केल्यानें तर तो नाहींच नाहीं लागत. त्याचप्रमाणें मोठ्या प्रसंगींही ज्यांचें धैर्यबळ ढळत नाहीं असे थोर पुरुष विपत्तींतही जें सुख पावतात, तें दुष्ट व कुत्सित मनाच्या लोकांस मोठ्या भाग्यशालीपणांतही लाधत नाहीं. सहस्रावधि मनुष्यांचा अनुभव थोडक्यांत त्यास आलांसा होतो; त्याच्या योगानें मनुष्याची दृष्टि फांकते. म्हणूनच एका थोर ग्रंथकारानें "इतिहास हा प्रत्यक्ष उदाहरणें दाखवून केलेला बोध होय" असें म्हटलें आहे.

इतिहास हा मनास **उन्नति** व **प्रसन्नत्व**ही देणारा आहे. म्हणजे त्याच्या निरंतर वाचनानें चित्त शांत व स्थिर राहातें, आणि थोर होतें. एका चतुर ग्रंथकारानें असें म्हटलें आहे कीं, 'इतिहास म्हणजे या जगांत जे महापुरुष होऊन गेले त्यांचीं चरित्रें आहे.' म्हणजे अशा लोकांनीं जीं कृत्यें केलीं त्यांनींच इतिहास भरला आहे; तीं काढून निराळीं केलीं तर त्यांत काय उरेल ? तेव्हां आजपर्यंत या जगतास भूषणभूत जीं रत्नें निरनिराळ्या देशांत निपजलीं त्यांचा सहवास जर अक्षयीं घडेल, तर त्यापरता लाभ तो कोणता ? **प्लूटार्क** नामेंकरून एक नामांकित इतिहासकार ग्रीस देशांत होऊन गेला. त्याचा अत्यंत

प्रसिद्ध व सर्व जगाचा प्रीतिपात्र झालेला ग्रंथ "थोर लोकांचीं चारित्रें" या नांवाचा आहे. त्याच्या प्रस्तावनेंत त्यानें असें म्हटलें आहे कीं, "मला या लोकांच्या उज्ज्वल चरित्रांचें मनन केल्यापासून जो लाभ झाला तो सांगतां पुरवणार नाहीं. जेव्हां जेव्हां कांहीं अनुचित कृत्याकडे मनाचा कल होई, किंवा सदाचरणाचा उत्साह कमी झालासा वाटे तेव्हां मी यांचीं चरित्रें वाचीं. येणेंकरून मला पुनः हुशारी वाटे." असो. सत्समागमाचा महिमा असाच आहे. दुसरें असें कीं वरच्या सारखे थोर लोक कोणत्याही देशांत ईश्वरकृपेनें एखादे वेळेसच उत्पन्न होतात, व तेव्हां त्यांचा वर्तनक्रम पाहून दुसरेही कित्येक त्यांचा कित्ता उचलून योग्यतेस चढतात. पण तेवढा काळ गेला कीं आटपलें! इतिहास, चरित्रें वगैरे लिहिण्याचा प्रघात नसला म्हणजे पांच पन्नास वर्षांत त्यांची आठवणही पार बुजून जाते! मग पुढील लोकांच्या ठायीं उत्साह कसा उत्पन्न व्हावा? व देशाची पहिली थोरवी तरी कशी राहावी? होमर[१] कवीनें आकीलीसचा पराक्रम वर्णन केला नसता तर शिकंदर उत्पन्न होता काय? व्यासानें जर पांडवांचें चरित्र गाइलें नसतें तर शिवाजी उत्पन्न होऊन त्यानें यवनांपासून[२] राज्यश्री माघारी हरण केली असती काय?

इतिहासापासून चवथा उपयोग **मनाचें रंजन.** निरनिराळ्या देशांत घडलेले वृत्तांत समजल्यानें व त्यांचें मनन केल्यानें—इतिहास तशा शैलीनें लिहिले असतील तर—वाचकांस आल्हादही होईल. असे

१ रामायणाप्रमाणेंच ग्रीक भाषेंतील आदि कवि जो होमर त्याच्या ईलियड् या काव्यास तिकडे मान आहे.

२ मूळ अर्थ ग्रीक लोक; पुढें मुसलमान, असा अर्थ आला.

इतिहास ग्रीक, लॅटिन व फारशी भाषांत आहेत, तसेच अलीकडे इंग्लिश भाषेंत झालेले ह्यूम, गिबन, मेकाले यांचे ग्रंथही सर्वप्रसिद्ध आहेत. अशा इतिहासांची भाषासरणी, यथास्थित ग्रंथरचना, कथानकाची जुळणी, गहन विचार, तरतऱ्हेची माहिती मध्यें घालून देण्याची खुबी, यांच्या योगानें सर्व प्रकारच्या वाचकांस ते मान्य होतात. ज्यांस केवळ भाषाच शिकावयाची असते त्यांस तिचें अत्यंत रमणीय रूप त्यांत पहावयास सांपडतें; ज्यांस विषयाची मांडणी कशी करावयाची याची समजूत करून घ्यावयाची असते, त्यांस ती धाटणी त्यांतून उचलतां येते; केवळ गोष्टवेल्हाळच जे असतात त्यांस कादंबऱ्यांप्रमाणें त्यांत चमत्कृति भासते; जे तत्त्वजिज्ञासु[1] असतात त्यांस पोक्तपणाचे व खोल असे विचार त्यांत सादर केले असतात; आणि ज्यांस चमत्कारिक व मौजेच्या गोष्टींचा संग्रह करावासा वाटतो त्यांस तो त्यांतून सहज करतां येतो. याप्रमाणें इतिहास अनेक प्रकारांनीं मौजेचा होतो. कादंबऱ्या वाचतांना श्रम न होतां जशी करमणूक होते तशीच बहुधा अलीकडील कित्येक उत्कृष्ट इतिहासांनीं होते. मनोरंजनाचा दुसरा कांहींच प्रकार अनुकूल नसल्या कारणानें पूर्वीं लोकांचा कादंबऱ्यांकडेच विशेषतः भर असे. मनोरंजक इतिहासांच्या योगानें निवळ कादंबरीवाचनामुळें होणारे अनर्थ टळून मनोरंजनाचेंही कार्य होतें. यांत निवळ सत्यच लिहावयाचें असतें. यास्तव भुताराक्षसांच्या अद्भुत गोष्टी यांत येत नाहींत. तरी पण त्यांत अद्भुतरस येत नाहीं असें नाहीं. नेपोलियन सारख्या वीरांच्या, वॉट[2] सारख्या

---

१ सृष्टीचें गूढ रहस्य समजून घेऊं इच्छिणारे.

२ वाफेचें एंजिन यानें प्रथम शोधून काढलें.

कल्पकांच्या, बेकनसारख्या तत्त्वज्ञांच्या चरित्रांत अद्भुत रसास काय उणीव आहे ?

## भाग ३ रा

इतिहासापासून पांचवा उपयोग म्हणजे **राजकारणी पुरुषांस म्हणजे मुत्सद्यांस** होय. 'पुढच्यास ठेंच मागला शाहाणा' या म्हणी-प्रमाणें पूर्वीं होऊन गेलेल्या मनुष्यांचा अनुभव जसा पुढच्यांस उपयोगीं पडतो, त्याप्रमाणें या पृथ्वीवर आजपर्यंत जीं अनेक राज्यें होऊन गेलीं, त्यांचा अनुभव हल्लींच्यांस कामास येतो. राज्यास हितकर गोष्टी कोणत्या, अपायकारक कोणत्या, त्यावर अनिष्टें आलीं असतां कोणत्या युक्तिप्रयुक्तीनें त्यांचें निवारण करावें, तंटेबखेडे कशामुळे उत्पन्न होतात, प्रजेस सुखी ठेवण्याचे मार्ग कोणते, कायदेकानू कशा प्रकारचे असावे वगैरे शेंकडों गोष्टी पूर्वींच्या इतिहासावरून सध्यांच्या राज्यकर्त्यांस समजल्या आहेत. राज्यरीति, कायदेकानू, सैन्यव्यवस्था वगैरे सर्व गोष्टींत प्राचीन ग्रीक व रोमन राष्ट्रांनीं जी प्रगति केली होती, ती अलीकडील यूरोपांतील राष्ट्रांस आयतीच उपयोगीं पडली, व याच कारणानें तेथील लोकांचा पगडा आजकाल साऱ्या पृथ्वीवर बसला आहे. पूर्वीं नशिरवान् नामें करून एका पारसदेशच्या राजानें मुद्दाम एक वकील हिंदुस्थानांत पाठवून आपल्या संस्कृत 'हितोपदेशा'चें पारशी भाषेंत भाषांतर करविलें; रोमच्या सेनेट[1] सभेनें तसेच तीन वकील अथेन्स[2] शहरास पाठवून तेथून सोलनचे कायदे आणविले. लायकर्गसही स्पार्टनें[3] लोकांस राज्यव्यवस्थेचे

---

१ रोमन लोकांची प्रतिनिधि सभा. २-३ आथेन्स् व स्पार्टा हीं प्राचीन ग्रीस देशांतील दोन प्रमुख संस्थानें होतीं.

नियम बांधून द्यावे या उद्देशानें एशिया मायनर, ईजिप्त या दूरच्या देशांस जाऊन हिंदुस्थानासही आला होता असें म्हणतात! असे दीर्घ प्रयत्न त्या वेळच्या लोकांस राज्यनीतिविषयक ज्ञान मिळवावयास पडत असत, आणि येवढेही त्या ज्ञानाची योग्यता जाणून लोक करीत. मग अलीकडच्या हजारों नव्या सोईच्या योगानें तेंच अमोलिक ज्ञान जर सर्वांस सुलभ झालें आहे, तर हा लाभ लहानसहान काय?

इतिहासाचा शेवटला एकंदर उपयोग म्हणजे **मनाचें पोषण** होय. एक तर इतिहासांत निरनिराळ्या तऱ्हेची माहिती असल्यामुळें मनाच्या कोठारांत पुष्कळ नव्या गोष्टींचा भरणा होतो. त्या तर्क चालविण्यास किंवा हातीं घेतलेल्या विषयास वैचित्र्य किंवा विशदत्व[1] देण्यास उपयोगीं पडतात. दुसरें, इतिहासांत मानवी स्वभावाचीं अनेकविध अशीं चित्रविचित्र रूपें वाचकांस दृष्टीस पडून त्यांचें व्यवहारांत अत्यंत उपयोगी असें मार्मिक व पूर्ण ज्ञान त्यांस होतें. निरनिराळ्या देशांतील लोकस्थिति, राज्यव्यवस्था, रीतिरिवाज, धर्मादि विषयांवर समजुती वगैरे कळल्या असतां मनुष्याची नजर दूरवर फांकते. त्यामुळें बुद्धीची पोंच वाढून तिचा संकुचितपणा नाहींसा होतो. कूपमंडूक किंवा उंबरांतले किडे यांसारखी सदोदित अवस्था असल्या कारणानें ज्या मूर्ख समजुती व जे दुराग्रह मनास खिळून जातात, ते दूर होतात. शाहाणे काय ते आम्ही; रीतभात उत्तम म्हणजे काय ती आमचीच; सर्व सुधारणेचें आगर म्हणजे आमचा देश; खरा व सदाचरणप्रवर्तक असा आमचाच धर्म; आमची भाषा उत्तम; आमची विद्या, आमच्या

---

१ स्पष्टपणा.

कला याच बाकीच्या साऱ्या जगास वंद्य; फार तर काय, आमची पोषाकाची तऱ्हा, आमची जेवणाखाण्याची तऱ्हा, आमची तोंड धुण्याची तऱ्हा ही सुद्धां सर्वांत उत्कृष्ट—अशा प्रकारच्या ज्या निराधार कोत्या समजुती त्या नाहींशा होऊन इतिहासाच्या योगानें आपणां-विषयीं व इतर राष्ट्रांविषयीं यथार्थ ज्ञान होतें.

या शिवाय आणखीही एका प्रकारें विचारशक्ति वाढते. तो हा कीं, सगळ्या जगाचा इतिहास पहिल्यापासून आजपर्यंत सगळा एकदम मनांत आणला असतां जगदीशाचें वैभव त्यांत दिसून येतें, व एकंदर जगाच्या रहाटीचा रोंख सुधारणेकडे आहे असें खास दिसून येतें. मधून मधून मोठे अनर्थ, युद्धें, व राज्यक्रांत्या होऊन जगाची नासाडी झाल्यासारखें दिसतें खरें. पण जो अंमळ विचार करील त्यास कळून येईल कीं, हे अनर्थ केवळ तात्कालिक असून त्यांपासून जगाचें चिरकालिक कल्याण झालें आहे. सध्यां जी पृथ्वीवरील सुधारलेल्या देशांची स्थिति आहे तिजमध्यें व चारपांचशें वर्षांमागें जी स्थिति होती तींत जमीनं अस्मानाचा फरक झाला आहे असें म्हटलें असतां चालेल. हल्लीं अगदीं सामान्य मनुष्यास अशीं शेंकडों सुखें व सोई प्राप्त झाल्या आहेत कीं, ज्या त्या वेळेस मोठ्या बादशहास अनुकूल नव्हत्या. सध्यां पोरांसोरांस अशा कित्येक गोष्टी माहीत आहेत कीं, ज्या त्या वेळच्या मोठमोठ्या पंडितांच्या स्वप्नीं कधीं आल्या नसतील. त्या वेळीं एका भागाचें सुखदुःखज्ञान दुसऱ्यास पोंचण्याचा बिलकुल मार्ग नसे. यास्तव जवळजवळचे देश सुद्धां परस्परांविषयीं उदासीन असत. ग्रीक लोकांचें व पारसीकांचें मोठ्या निकराचें युद्ध झालें; पण एकीकडे रोमन वगैरे लोक व दुसरीकडे हिंदू वगैरे अगदीं गार होते.

पण आतां कसा चमत्कार झाला आहे पहा! अमेरिकेंत लोक भांडतात[1]—एक होतात; आणि त्यांच्या संबंधानें पातालवासी जे मुंबईचे शेटसावकार ते त्या भांडणाच्या योगानें एकदम कोट्याधीश होतात, आणि भांडण एकाएकीं मिटतांच घरोघर शेणाचे दिवे लागतात! सारांश तारायंत्राची तार जशी सध्यां पृथ्वीच्या एका टोंकाशीं हालविली असतां दुसऱ्या टोंकापर्यंत ती हालत जाते, त्याप्रमाणें एका भागाचें सुखदुःख तत्क्षणीं दुसऱ्या भागाच्या अनुभवास येतें. असो; तेव्हां हा सर्व प्रकार जेव्हां लक्षांत येतो, व एकंदर जगाचा क्रम दिवसेंदिवस सज्ञान व सुखी होण्याचा आहे असें त्यावरून समजतें, तेव्हां धर्मशील पुरुषांस मोठी उमेद येऊन त्यांची परमेश्वराचे ठायीं भक्ति दृढ होते.

---

**प्रश्नः**—( १ ) प्राचीन हिंदुस्थानांत इतिहास लिहिण्याची चाल कां दिसून येत नाहीं ?

( २ ) इतिहासाच्या अध्ययनापासून मुख्य फायदे कोणते ?

( ३ ) इतिहास व राष्ट्रीय घडामोडी यांचा कांहीं संबंध आहे काय ?

---

१ इ. स. १८६०चे सुमारास अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं उत्तरेकडील व दक्षिणेकडील संस्थानांमध्यें कांहीं कारणावरून यादवी युद्ध माजलें. याचा परिणाम, अमेरिकेंतील कापूस इंग्लंडांतील गिरण्यांना मिळेनासा झाला, व म्हणून हिंदुस्थानच्या कापसास अकस्मात् फार मोठी मागणी आली. मग काय ? मुंबईचे व्यापारी एकदम कोट्याधीश बनले. पण पुढें हें युद्ध तसेंच एकाएकीं बंद झालें. त्यामुळें हिंदुस्थानच्या कापसाची मागणीही ताबडतोब थांबली, व या व्यापारावर गबर झालेल्या कित्येक व्यापाऱ्यांस दिवाळें काढावें लागलें.

१०

# पांडवांची राजधानी—इंद्रप्रस्थ

[ प्रस्तुत लेख श्री. न. चिं. केळकर यांच्या लेखसंग्रहांतील आहे. आजकालच्या मराठी लेखकांत श्रीयुत केळकर यांचा दर्जा फार मोठा आहे. चरित्रलेखक, इतिहासकार, नाटककार, कवि, विनोदी व मार्मिक टीकाकार या सर्व नात्यांनीं ते महाराष्ट्रीय वाङ्मयांत प्रख्यात झाले आहेत. प्रसिद्ध ' केसरी ' पत्राचे संपादक या नात्यानेंही त्यांनीं वाङ्मयांत अमूल्य भर टाकली आहे. सुंदर भाषाशैली व मार्मिक व समतोल विवेचनपद्धति हे त्यांच्या वाङ्मयरचनेचे प्रमुख गुण होत.

आपले वैभवशाली सम्राट् **पंचम जॉर्ज** हे इ. स. १९११ सालीं हिंदुस्थानांत आले होते, त्या वेळीं त्यांनीं दिल्ली येथें एक बादशाही दरबार भरविला होता. त्या संबंधाचें वर्णन देतांना साहाजिकच दिल्ली शहराचें प्राचीन व अर्वाचीन स्वरूप लेखकानें प्रथम रेखाटलें आहे. ह्या "दिल्लीच्या ऐतिहासिक चित्रपटा" पैकीं फक्त प्राचीन इंद्रप्रस्थ व हस्तिनापुर, तेथील राज्याभिषेकांचें वर्णन, व त्या काळच्या राजनीतीचें दिग्दर्शन करणारा प्रथमार्ध तेवढा खालीं उद्धृत केला आहे. ]

भरतखंडाचा अति प्राचीन काळापासून आजपर्यंतचा इतिहास व्यापक व स्थूल दृष्टीनें पाहणारांच्या डोळ्यांपुढून या देशांतील कांहीं स्थळें न हालतां सदैव कायमचींच नजरेंत भरलेलीं असतात. भरतखंडाच्या उत्पत्तीपासून पश्चिमेस सिंधुसरस्वती नद्यांचा व पूर्वेस गंगायमुना नद्यांचा प्रवाह जसा अखंड चालूच राहिला आहे, त्याप्रमाणें स्यमंतपंचक ऊर्फ कुरुक्षेत्र, पानपत, हस्तिनापुर, दिल्ली ह्या टापूच्या ऐतिहासिक महत्त्वाचा ओघहि आज तागायत अखंड वाहात



चित्र ७—श्री. न. चिं. केळकर

आहे. भरतखंडांतील बहुतेक सर्व स्वकीय परकीय सार्वभौमांचें वसतिस्थान या टापूनजीकच असून, या देशाची ऐतिहासिक भवितव्यता निश्चित करणारे आजपर्यंतचे सर्व युद्धसंग्राम याच पुरातन रणभूमीवर झालेले आहेत. भरतभूमीचें रक्षण करण्याऐवजीं स्वतःच्या दुष्कृत्यांनीं भूभार झालेल्या उन्मत्त व मदांध क्षत्रियांस व राजांस मारून परशुरामानें त्यांच्या रक्ताचे पांच मोठे डोह ह्या ' स्यमंतपंचकांत ' च निर्माण केले होते; व पुढें याच डोहांचीं तेथें ऋषींच्या आशीर्वादानें पवित्र तीर्थें झालीं! कुरुराजानें या स्थलीं केलेल्या महान् तपश्चर्येच्या पुण्यानें या स्थलास कुरुक्षेत्र हें पावित्र्यदर्शक नांव मिळालें. याच कुरुक्षेत्रांत पुढें चंद्रवंशीय व पुरुकुलोत्पन्न हस्तिराजानें जगप्रसिद्ध हस्तिनापूर नगर वसविलें. या नगराच्या स्थापनेसंबंधानें व नांवाच्या उत्पत्तीसंबंधानें एक निराळीच गोष्ट पुराणांतरीं आढळते. ससा शिकारी कुत्र्यांचा पाठलाग करतांना ज्या जागेवर दिसला ती यशस्वी समजून जसा पुण्यांतील शनवारचा वाडा तेथें बांधण्यांत आला[1], तसाच एक चमत्कार पुरातन-काळीं दृष्टोत्पत्तीस आल्यानंतर हस्तिनापुर नगर वसविण्यांत आलें. अत्रिपुत्र सोमऋषि वनांत हिंडत असतां एके स्थळीं, एका पक्ष्यानें झपाट्यानें येऊन एका प्रचंड हत्तीस उचलून भरारीसरशीं आकाशांत नेल्याचें त्यास दिसलें. अर्थात् ही भूमि यशस्वी मानून तेथें त्यानें नगर वसविलें, व त्यास ' हस्तिनापुर ' हें नांव ठेवलें. ह्याच हस्तिनापुरांत पुरुवंशीय राजे अखेरपर्यंत राज्य करीत असून कौरव-पांडवांच्या भाऊबंदकीचे तंटे व अखेरचें संहारक भारतीय युद्ध याच नगरा नजीकच्या कुरुक्षेत्रांत झालें. धृतराष्ट्र—पांडुराजापर्यंत कुरुदेशाची व

---

१ अशीच दंतकथा चांदा येथील किल्ल्याविषयींही ऐकूं येते.

पुरुवंशाची राजधानी येथेंच होती. परंतु कौरव व पांडव यांच्या भाऊबंदकीचें, लहानपणच्या खोड्या व कुचेष्टा हें स्वरूप जाऊन त्यास द्वेषाचें व हाडवैराचें स्वरूप येऊं लागलें, तेव्हां हस्तिनापुराचे जोडीस इंद्रप्रस्थ नांवाचें नवें नगर वसलें. पांडव सर्व संकटांतून निभावून आणि द्रुपदराजाशीं शरीरसंबंध करून हस्तिनापुरास परत आल्यावर उभयतांची भाऊबंदकी सान्निध्यानें विकोपास जाऊं नये, म्हणून धृतराष्ट्रानें पांडवांस अर्धें राज्य तोडून दिलें; व हस्तिनापुराच्या नैर्ऋत्येस ५० मैल दूर असलेल्या खांडव वनांत नवें नगर वसविण्याची त्यांस परवानगी दिली. इंद्रप्रस्थ ऊर्फ अर्वाचीन दिल्ली या शहराचा पाया याप्रमाणें भाऊबंदकीवर उभारल्यामुळेंच कीं काय, आजपर्यंतच्या इतिहासांत बहुतेक प्रसंगीं तिजवर असल्याच भाऊबंदकीमुळें अनेक विपत्ति आल्या आहेत.

पांडवांच्या या इंद्रप्रस्थ नगराच्या संबंधाचें जें वर्णन महाभारतांत दिलें आहे त्याकडे ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां त्यांतून पुढील हकीकत निष्पन्न होते. ह्या खांडव वनांत त्या वेळीं असुर नांवाच्या राक्षस जातीची व तक्षक नांवाच्या नाग जातीची बरीच वस्ती होती. या वनाचा एका बाजूचा भाग रान तोडून मोकळा केल्यावर तेथें पांडवांनीं आपलें नगर वसविलें, व त्यास प्रारंभीं खांडवप्रस्थ असें नांव दिलें. या नगराचे भोंवतीं त्यांनीं समुद्रप्राय खंदक खणले व गगनचुंबित तट उभारले! पंख पसरलेल्या गरुडाकार वेशी, बुरुज व गोपुरें यांजवर नगरसंरक्षणार्थ अनेक शक्ति, शतघ्नी[1] वगैरे शस्त्रास्त्रें चढवून ठेविलीं.

---

१ शेकडों लोकांचा फन्ना पाडणारें एक अस्त्र (फेंकण्याचें शस्त्र).

नगराबाहेर अनेक बागबगीचे, राया, लताकुंज, कृत्रिम पर्वत वगैरे विहारस्थळें व पुष्करणीहि त्यांनीं तयार केल्या. अशा प्रकारचें उत्कृष्ट नगर व तेथील युधिष्ठिराची न्यायी राजसत्ता पाहून देशोदेशींचे व्यापारी, कारागीर व विद्वान् ब्राह्मण तेथेंच येऊन राहूं लागले. या नगराचें वैभव व विस्तार इतका वाढला कीं, तेथील रहिवाशांस ती दुसरी इंद्राची अमरावतीच वाटे; आणि म्हणून त्यांनीं आपल्या नगरास अभिमानपूर्वक इंद्रप्रस्थ (हल्लींचें इंद्रपत–ऊर्फ पुराणा किल्ला–हा सांप्रतच्या दिल्लीचे दक्षिणेस दोन मैलांवर आहे) हें नांव दिलें. पण इंद्रप्रस्थ नगराच्या वाढत्या वैभवास व विस्तारास नगराची संकुचित मर्यादा पुरेनाशी झाली. सांप्रत काळीं देशाची संपत्ति व लोकसंख्या वाढूं लागली म्हणजे त्याची गर्दी मोडण्यासाठीं जशी परदेश जिंकून वसाहती निर्माण करण्याची आवश्यकता उत्पन्न होते, तसाच प्रकार इंद्रप्रस्थासंबंधानें झाला. नगरानजीकचें सबंध खांडव वनच मोकळें करून तेथें वस्ती करण्याची जरूर पांडवांस भासूं लागली. ह्या वनांत वरचेवर मोठमोठे वणवे पेटून त्याचा बराच भाग पूर्वीं मोकळा होत असे; पण पुनः पाऊस पडून तेथें दाट जंगल वाढे. इंद्रप्रस्थ नगर स्थापन झाल्यानंतर सात वेळां याप्रमाणें खांडव वनांत मोठमोठे वणवे पेटले, पण सातहि वेळां पुनः तेथें अरण्य वाढलें. अखेर पांडवांनीं सर्वच वन, वणवे पेटले असतां, जास्त पेटवून देऊन तेथें पुनः जंगल वाढूं द्यावयाचें नाहीं असा बेत केला. ही कामगिरी मुख्यतः श्रीकृष्णार्जुनांकडे देण्यांत आली. त्यांनीं पंधरा दिवसांत सर्व खांडव वन जाळून टाकून मोकळें केलें. अर्थात् त्या वनांतील तक्षकांची व असुरांची बहुतेक वस्ती या अग्निप्रलयांत सांपडून नाहींशी झाली;

उरली सुरली कृष्णार्जुनांच्या बाणांस बळी पडली. तक्षक राजा व त्याचा पुत्र अश्वसेन आणि असुरांचा कुशल शिल्पी मयासुर यांचे मात्र प्राण या अग्निप्रलयांतून वांचले. यांपैकीं पहिले दोघे कुरुक्षेत्रांत जाऊन राहिले. व मयासुर आपल्या या नव्या प्राणदात्या यजमानांचे नौकरीस राहिला.

जाळून टाकल्यामुळें मोकळ्या झालेल्या ह्या खांडव वनांत आपणांसाठीं एक उत्कृष्ट व प्रचंड सभा—म्हणजे राजवाडा—प्रथमतः बांधवावा, असें पांडवांनीं ठरविलें. तें काम करण्यास अर्थातच मयासुर एका पायावर तयार झाला; व त्यानें या कामीं आपल्या असुरी शिल्प-विद्येचा व असुरांच्या संपत्तीचा पांडवांसाठीं पूर्ण उपयोग केला. हिमालय पर्वताचे पलीकडे कैलासाचे उत्तरेस मैनाक पर्वतानजीकच्या बिंदु सरोवराजवळ वृषपर्वा नामक असुर राजानें मोठा यज्ञ करून राजवाडे बांधले होते; तेथें पांडवांच्या राजवाड्यांत उपयोगीं पडतील अशा अनेक उत्कृष्ट शिला, रंग, चूर्ण वगैरे सामग्री व सोनें वगैरे खनिज संपत्ति होती. ती सर्व तेथें जाऊन मयासुरानें इंद्रप्रस्थास आणली; आणि नुकत्याच जाळलेल्या खांडव वनामध्यें त्यानें या असुरांच्या सामग्रीचा उपयोग करून १४ महिन्यांत १०।१० हजार हात लांबीरुंदीचा अत्युत्कृष्ट राजवाडा पांडवांसाठीं बांधला! या राजवाड्याच्या भिंती, खांब, तट, कमानी वगैरे सर्व रत्नांनीं मढवि-लेलीं होतीं. राजवाड्यांत ठिकठिकाणीं अनेक चित्रें, व केवळ प्राण मात्र नाहीं, इतके हुबेहुब बनविलेले पुतळेहि ठेविले होते. राजवाड्याच्या आवारांत मयासुरानें अनेक रत्नांनीं बनविलेलें कृत्रिम सरोवर तर अत्यंत आश्चर्यकारक होतें. हा राजवाडा बांधण्यासाठीं

बिंदु सरोवराजवळून आणलेले ८००० राक्षस मयासुरानें या राजवाड्याचे संरक्षणासाठींच ठेवून घेतले. मयासुराच्या ह्या अद्वितीय कौशल्याचें चीज करण्याचे हेतूनें पांडवांनीं उदारपणें या राजवाड्यास 'मयसभा' असेंच नांव दिलें. या मयसभेचा प्रथम प्रवेशसमारंभ अत्यंत थाटाचा झाला. त्या समारंभास तपोनिष्ठ ऋषि व विद्वान् ब्राह्मण यांजबरोबरच आतांप्रमाणें क्षत्रिय राजे, आणि नामांकित मल्ल, नट, गवई वगैरे तमासगीर मंडळीही जमली होती.

पांडवांच्या ह्या अफाट इंद्रप्रस्थ नगरांत व मयनिर्मित राजवाड्यांत लवकरच राजसूय व अश्वमेध हे यज्ञ झाले. त्यांचें विस्तृत व आश्चर्यकारक वर्णन महाभारतांत असून तत्कालीन भरतखंडाच्या वैभवाचा व संपत्तीचा त्यावरून सहज अंदाज बांधतां येतो. भरतखंड व नजीकचे देश यांतील राजांवर दिग्विजय करून पांडवांनीं आपलें वर्चस्व स्थापन केल्यावर व हे सर्व राजे अमूल्य करभारासह या यज्ञसमारंभास आले, तेव्हां हस्तिनापुर किंवा इंद्रप्रस्थ नगरांत सबंध जंबुद्वीपांतीलच[1] संपत्ति व वैभव एकवटलें आहे, असा भास होत असे! राजांनीं आणलेल्या नजराण्यांत व त्यांचे बरोबरही अनेक बहुमूल्य रत्नें; सोन्याचीं नाणीं, भांडीं व अलंकार; रत्नखचित व हस्तिदंती मुठीच्या आणि आकाशाप्रमाणें नीलवर्ण तरवारी; जडावाचीं चिलखतें; उत्तम श्रृंगारलेले रथ; बारीक व तलम अशीं रेशमाचीं व लोंकरीचीं वस्त्रें; भरजरी झुली घातलेले हत्ती व हत्तिणी; बाल्हीक (बल्क), आनर्त (काठेवाड) व वनायु (इराण) या देशचे जग-

१ पृथ्वी; मेरुपर्वताभोंवतालच्या सप्तमहाद्वीपांपैकीं एक द्वीप.

प्रसिद्ध घोडे; वगैरेंचीं केवळ वर्णनें वाचणाराहि त्या काळच्या वैभवानें दिपून जातो !

## भाग २ रा

भारतीय युद्ध संपून सर्व भरतखंड निष्कंटक झाल्यावर धर्मराजानें हस्तिनापुरांत केलेला नगरप्रवेश, व त्यानंतर त्यास झालेला राज्याभिषेक यांचेंहि सुंदर वर्णन महाभारतांत आढळतें. या नगरप्रवेशाचे वेळीं युधिष्ठिरासाठीं नवीन रथ तयार केला असून तो तलम लोंकरीचीं वस्त्रें व मृगाजिनें यांनीं मढविलेला होता, व त्यास सोळा पांढरे बैल जुंपले होते. मिरवणुकींतून जाणाऱ्या या रथाचें सारथ्य भीम करीत होता; अर्जुनानें धर्माचे मस्तकावर तारांकित[१] शुभ्र राजछत्र धरलें होतें; आणि नकुल सहदेव चामरें उडवीत होते. या रथाचे मागून युयुत्सु व श्रीकृष्ण जात असून त्यांचे मागें पालखींतून धृतराष्ट्र व गांधारी वगैरे राजस्त्रिया चालल्या होत्या. त्यांचे मागून क्रमानें अनेक रथ, हत्ती, पायदळ व स्वार असे चालले होते. नगराचे वेशींत पाण्यानें भरलेले नवे असे मंगलसूचक कुंभ ठेवले होते; व पांडवांचे स्वागतार्थ ठिकठिकाणीं सुंदर व कुलीन कुमारिका उभ्या होत्या. धर्माचे स्वागतार्थ नागरिकांनीं नगर व राजरस्ते पांढऱ्या फुलांच्या माळा व पताका यांनीं शृंगारलेले असून मधून मधून सुगंधित धूपहि जळत होते. पांडवांचा रथ नगरांत येतांच चंद्रोदयाचे वेळीं समुद्राच्या लाटा उसळतात त्याप्रमाणें राजरस्त्यांत जनसमुदाय उसळत होता; व भोंवतालचीं घरें स्त्रीपुरुषांच्या भारानें कांपत होतीं !

---

१ आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें फुल्या काढलेलें.

स्त्रियांचें लक्ष अर्थात् वैभवशाली द्रौपदीकडेच विशेष ओढलें होतें. मिरवणूक आटोपल्यावर युधिष्ठिराचा राज्याभिषेक-समारंभ झाला. त्या वेळीं धर्मराजा पूर्वाभिमुख असलेल्या सुवर्णसिंहासनावर बसला; त्याचे दोहों बाजूंस भीमार्जुन बसले असून समोर श्रीकृष्णादि यादव वीर होते; कुंती व नकुल सहदेव एकीकडे होते व दुसरीकडे धृतराष्ट्र विदुरादि अवशिष्ट कौरवपक्षीय मंडळी बसली होती. प्रथमतः धर्मानें पांढरीं फुलें, अक्षता, भूमि, सोनें, रुपें व माणकें यांस हस्तस्पर्श केला. नंतर प्रधान व मंत्री यांनीं राजाजवळ जाऊन त्यास नमस्कार केल्यावर, व्याघ्रचर्मानें मढविलेल्या व मजबूत अशा अष्टकोनी सर्वतोभद्र[1] आसनावर युधिष्ठिर व द्रौपदी हीं येऊन बसलीं. त्यांनीं राज्याभिषेक-विधीप्रमाणें होम केल्यानंतर श्रीकृष्णांनीं स्वतः उठून कुरुक्षेत्र दणदणविलेल्या आपल्या पांचजन्य शंखांतील उदकानें त्यांस राज्याभिषेक केला. शंखांतून अभिषेकाच्या धारा पडूं लागतांच दुंदुभी वगैरे वाद्यांचा एकच गजर होऊन त्या योगानें धर्मास राज्याभिषेक झाल्याचें वृत्त राजवाड्याबाहेरच्या सर्व लोकांस विदित झालें.

महाभारतांतील वर्णनावरून त्या काळचें दिल्ली शहर, तेथील राजांचें वैभव, नगरप्रवेश व राज्याभिषेकसमारंभ आणि राजसूय—अश्वमेधादि मोठे प्रसंग यांची जशी ओळख होते, तशीच त्या काळच्या राजनीतीची व राजांच्या कर्तव्याचीहि माहिती देणारे अनेक भाग महाभारतांत वर्णिले आहेत. त्या सर्वांचा परामर्ष घेणें या लेखांत शक्य नाहीं व जरूरहि नाहीं. परंतु मयसभा निर्माण झाल्यानंतर लवकरच तेथें नारद

---

१ शुभ किंवा मंगलप्रद.

आले; त्यांनीं धर्मराजास प्रश्नरूपानें जी उत्तम राजनीति उपदेशिली आहे, ती कोणच्याही प्रसंगीं पाहण्यासारखी आहे. किंबहुना, नारदांच्या ह्या 'कच्चित्प्रश्ननीति'[1]—रूपानें हिंदुस्थानांतील उत्तम राजनीति व राजनिष्ठा जगांतल्या सर्वच राजांस पुनः प्रश्न विचारीत आहे, असा ही नीति वाचणारांस भास झाल्यावांचून राहत नाहीं. नारदांची ही 'कच्चित्प्रश्न-नीति' सर्व देशच्या व सर्व कालच्या राजांस व राज्यकर्त्यांस पुढील आशयाचे प्रश्न करीत आहे:—

"राजाचें राज्य टिकण्यास धर्म व अर्थ या दोहोंचेंहि बळ पाहिजे असतें. राजानें अर्थाविषयीं[2] लोभ धरून धर्म बुडवूं नये; धर्माकडे लक्ष देऊन अर्थाकडेहि दुर्लक्ष करूं नये; किंवा तात्कालिक सुखावर लुब्ध होऊन धर्म व अर्थ ह्या दोहोंविषयीं उदासीन बसूं नये. राजा, तूं असाच वागत आहेसना ? तुझे राज्याधिकारी पुरुष ऐश्वर्य-मदानें धुंद व कर्तव्यपराङ्मुख होऊन स्वतःच्या व तुझ्या भावी नाशास कारणीभूत होत नाहींतना ?

राजाचा विजय त्यास जो सल्ला मिळेल त्यावरच अवलंबून असतो; तर तुझे सल्लागार—मंत्री वृद्ध, कुलीन, सदाचरणी, स्वामिनिष्ट असेच आहेतना ? कृषिकर्म, व्यापार वगैरे थोड्या भांडवलावर होणाऱ्या व पुढें जास्त नफा मिळवून देणाऱ्या धंद्यांस तूं उत्तेजन देतोसना ? निदान हे व्यवसाय करणारांस तूं अडथळे तरी करीत नाहींसना ?

तुझ्या राज्यांतील आचार्य म्हणजे गुरु—सर्व कुमारांना—तरुण

---

१ 'कच्चित्' हा शब्द संस्कृत भाषेंत प्रश्नार्थक वाक्यांत येतो.

२ संपत्ति.

पिढीला—सर्व विद्या—विशेषतः धनुर्विद्या शिकवून वीर बनवीत आहेतना ?

शत्रूच्या गुप्त बातम्या काढण्यास गुप्त हेर अवश्य ठेवलेच पाहिजेत; पण आपले अधिकारी प्रजेस पाळतात, कीं गांजतात, हें पाहण्यासाठीं आपल्या प्रत्येक अधिकाऱ्याचे मागें तूं तीन तीन गुप्त हेर ठेवले आहेसना ?

वरचेवर कडक शासन करून तूं प्रजेला उद्विग्न व असंतुष्ट करीत नाहींसना ? 'उग्रप्रतिग्रहीता' म्हणजे 'जबर कर कडकपणें वसूल करणारा' अशीं नांवें तुला लोक ठेवीत नाहींतना ? युद्धांत पराभूत करून एकदां जिंकल्यावर मग जिंकलेल्यांना तूं पुत्रवत् मानीत आहेसना ? सर्व प्रजाजनांशीं तूं सारखा वागून ते आपल्या कुटुंबांतलेच आहेत असें तूं मानतोसना ? राजा हा आपला मातापिताच आहे, असें प्रजाजनांस वाटत आहेना ?

स्वस्ताईचे वेळीं उत्पन्नाचा $\frac{१}{४}$, मध्यम स्थितींत उत्पन्नाचा $\frac{१}{२}$ व दुर्भिक्षाचे वेळीं उत्पन्नाच्या $\frac{३}{४}$ चे आंत तुझ्या राज्याचा खर्च आहेना ? तूं राष्ट्रास पीडा देत नसून तुझे शेतकरी संतुष्ट आहेतना ?

मोठमोठे व पाण्यानें भरलेले तलाव शेतांत पाणी देण्यासाठीं तूं योग्य अंतरानें बांधले आहेसना ? आकाशांतून देव पाऊस पाडतील तेवढ्यावरच तुझ्या राज्यांतील शेती अवलंबून नाहींना ? तुझ्या राज्यांतल्या शेतकऱ्यांजवळची भरपूर पोटगी व बीं बियाणें कमी कमी होत नाहींतना ? कारागिरांस लागणारें भांडवल व धंद्याचीं हत्यारें वगैरे साधनें तूं त्यांस चार चार महिन्यांनीं पुरवितोसना ? तूं व तुझे अधिकारी, लोभ, मोह, किंवा अभिमान यांस वश होऊन रयतेस न्याय

देण्याकडे दुर्लक्ष करीत नाहींतना? तुझ्या कृत्यामुळें प्रजेंत दुःख किंवा क्रोध उत्पन्न होत नाहींना? खरोखर निष्पाप, कुलीन व सदाचरणी अशा पुरुषांवर खोटे आरोप येऊन त्यांस तुझे राज्यांत विनाकारण शासन झालेलें नाहींना!"

नारद-नीतीनें विचारलेल्या या व इतर प्रश्नांस आत्मविश्वासपूर्वक प्रामाणिकपणें जो राजा 'होय' असें उत्तर देऊं शकेल, किंवा "जसें आपण सांगितलें तसें अवश्य करीन" असें वचन देऊन नंतर तसें वागणाऱ्या युधिष्ठिराचें अनुकरण करील, त्याचे राज्यास काळाचीही भीति बाळगावयास नको.

---

**प्रश्नः**—( १ ) कुरुक्षेत्र व त्याच्या आसमंतांतील प्रदेश यांना हिंदुस्थानच्या इतिहासांत येवढें महत्त्व कां प्राप्त झालें आहे?

( २ ) प्राचीन इंद्रप्रस्थाचें थोडक्यांत वर्णन द्या.

( ३ ) युधिष्ठिराच्या राज्याभिषेकांत धार्मिक व राष्ट्रीय दृष्ट्या महत्त्वाच्या बाबी कोणत्या होत्या?

( ४ ) नारदांनीं विचारलेल्या प्रश्नांवरून राजाच्या कर्तव्यांविषयीं काय बोध होतो?

# ११

# सम्राट् हर्षवर्धन

( इ. स. ६०६–६४७ )

[ प्रस्तुत चरित्रात्मक लेख प्रख्यात विद्वान् संशोधक रा. ब. चिंतामण विनायक वैद्य यांच्या "मध्ययुगीन भारत" या ग्रंथांतून संक्षेपरूपानें घेतला आहे. रा. ब. वैद्य यांची बुद्धिमत्ता, इतिहासावरील दांडगा व्यासंग, व साधें पण सुंदर मराठी लिहिण्याची हातोटी हीं सर्वश्रुत आहेत. रामायण व महाभारत यांवर तर त्यांनीं फारच परिश्रमपूर्वक ग्रंथ लिहिले आहेत. या शिवाय "दुर्दैवी रंगू" सारख्या उत्कृष्ट कादंबऱ्या, श्रीरामचरित्र, श्रीकृष्णचरित्र यांसारखीं बालोपयोगी चरित्रें, वगैरे किती तरी उपयुक्त साहित्य त्यांच्या सरस लेखणींतून बाहेर पडलें आहे. ]

प्राचीन भरतखंडांतील सम्राटांच्या मालिकेंत हर्षवर्धन हा शेवटचा सम्राट् होय. कारण राज्यविस्तार, शौर्य, विद्वत्ता, व धर्मपर वृत्ति या सर्व गुणांत हर्षवर्धनानंतर येवढा भाग्यशाली हिंदू सम्राट् झालाच नाहीं.

खिस्ती शकाच्या सातव्या शतकाच्या प्रारंभीं ठाणेश्वराचा राजा **प्रभाकरवर्धन** हाच उत्तर हिंदुस्थानांतील राजमंडळांत प्रमुख होता. त्यानें हूर्णं लोकांचा पराजय करून त्यांस हतवीर्य केलें होतें.

---

१ हूण लोक हे मध्य एशियांत राहणारे मोंगोलियन वंशाचे लोक होते. दिसण्यांत हे साधारणपणें चिनी लोकांप्रमाणें असत. पण स्वभावानें अत्यंत क्रूर व रानटी असत. हे टोळधाडीप्रमाणें एकदम एखाद्या देशावर तुटून पडत, व जाळपोळ, लुटालूट व सरसहा कत्तल करून देशचे देश उजाड करून टाकीत. हिंदुस्थानांत हे पांचव्या शतकाच्या अखेरीस आले, व येथें यांचा अंमल सुमारें १०० वर्षें होता. यापैकीं पुष्कळ लोक पुढें हिंदू धर्म स्वीकारून लोकांत मिसळून गेले.

शिवाय सिंधप्रांताचा तत्कालीन राजा व राजस्तानांतील गुर्जर या प्रमुख राज्याचा अधिपति यांचाही प्रभाकरवर्धनानें पराभव केला असून माळवा व गुजराथ येथील राजांनाही त्यानें आपले अंकित करून सोडलें होतें. उत्तर हिंदुस्थानच्या पूर्वभागांत या काळीं **मौखरि** घराण्याचा अंमल असून त्यांच्या राज्याचा विस्तार बहुधा लोहित्या ( ब्रह्मपुत्रा ) नदीपासून पश्चिमेकडून विंध्यपर्वतापर्यंत असावा. या मौखरि घराण्यांतील ग्रहवर्म्याला प्रभाकरवर्धनाची कन्या **राज्यश्री** ही दिलेली असल्यामुळें या दोन घराण्यांत शरीरसंबंध घडून आला होता. एवंच इ. स. ६०५ च्या सुमारास प्रभाकरवर्धन हा उत्तर हिंदुस्थानांतील सर्व राजांमध्यें प्रबळ असल्यामुळें " महाराजाधिराज परमभट्टारक " ही त्यानें धारण केलेली पदवी त्याला योग्यच होती.

परंतु इ. स. ६०५ चे सुमारास कांहीं आकस्मिक संकटांमुळें प्रभाकरवर्धनाच्या कारकीर्दीचा शेवट होऊन त्याचा कनिष्ठ मुलगा हर्षवर्धन यास सिंहासनावर बसण्याचा योग आला. ती हकीकत अशी:—

हूण लोकांनीं आपल्या पूर्वीच्या अपमानाचा सूड घेण्यासाठीं एकाएकीं उत्तरेकडून स्वारी केली. त्यांचा प्रतिकार करण्यासाठीं प्रभाकरवर्धनाला पुरेशी फुरसत देखील मिळाली नाहीं. तरी कमें तगी करून त्यानें आपला ज्येष्ठ पुत्र **राज्यवर्धन** याची त्या कामावर रवानगी करून दिली. यापूर्वीं हूणांशीं ज्या लढाया झाल्या त्यांत कनोजच्या मौखरींचें साह्य प्रभाकरवर्धनास मिळत असे. परंतु प्रस्तुत प्रसंगीं ही खबर त्यांना कळवावयास देखील प्रभाकरवर्धनाला वेळ मिळाला नाहीं. राज्यवर्धनाचें वय या वेळीं अवघें एकोणीस वीस वर्षांचें

होतें. त्याचा कनिष्ठ बंधु हर्षवर्धन हाही त्याच्या मागून निघाला. वडील भावास जाऊन मिळण्यापूर्वी कांहीं दिवस त्यानें हिमालयाचे पायथ्याशीं असलेल्या अरण्यांत मृगया करण्यांत घालविले.

राज्यवर्धनानें लवकरच हूणांचा पक्का पराभव केला व त्यांना सरहद्दीपलीकडे हांकून लाविलें. विजयी होत्साता तो ठाणेश्वराला परत आला. पण पाहतो तों काय ! आपल्या पित्याच्या निधनामुळें सर्व नगरी शोकार्णवांत मग्न झालेली ! पित्याची प्रकृति एकाएकीं बिघडल्याचें समजल्यावरून हर्षवर्धनही आपला पुढील कार्यक्रम सोडून ताबडतोब ठाणेश्वरास आला होता, व तो पित्याच्या अंतकाळीं त्याच्या जवळ होता. प्रभाकरवर्धनाची पत्नी यशोमती रजपूत स्त्रियांच्या उच्च मनोभावनेला अनुसरून सती गेली. याप्रमाणें मातापितरांच्या आकस्मिक निधनामुळें उद्विग्न झालेल्या राज्यवर्धनाला ठाणेश्वराच्या सिंहासनावर आरूढ होण्याची पाळी आली. त्याच्या मनाचा कल बौद्धधर्माकडे असल्यामुळें हें राज्य कनिष्ठ बंधु हर्ष याच्या स्वाधीन करून आपण भिक्षु व्हावें असें राज्यवर्धनाच्या मनांत आलें. पण इतक्यांत एक विलक्षण वार्ता कानीं आल्यामुळें त्याला तो विचार तेव्हां तरी सोडून द्यावा लागला.

माळव्यांतील **गुप्त** राजे कनोजच्या मौखरी घराण्याचे पिढीजाद शत्रु होते. हूणांनीं ठाणेश्वरच्या राज्यावर स्वारी केली, व इतक्यांत त्याचा राजा प्रभाकरवर्धनही मृत्यु पावला ही बातमी सर्व प्रांतांत हां हां म्हणतां पसरली. तेव्हां राज्यवर्धन तिकडे अडकला आहे अशी संधि साधून माळव्याचा राजा देवगुप्त यानें कनोजवर हल्ला चढविला.

कनोजचा तरुण राजा **ग्रहवर्मा** (राज्यवर्धनाची भगिनी **राज्यश्री** इचा पति ) हा या हल्ल्यांत मारला गेला, व राज्यश्री शत्रूच्या हातीं सांपडली. एवढें झाल्यावर आतां खुद्द ठाणेश्वरावरही स्वारी करण्यास हरकत नाहीं असें वाटून देवगुप्तानें तिकडे आपला मोर्चा वळविला. कर्णसुवर्ण ऊर्फ बंगालचा राजा **शशांकगुप्त**[१] हा देवगुप्ताचा सहकारी मित्र असून तो त्याच्या साहाय्यार्थ ससैन्य निघाला; पण तो येऊन पोंचण्याचीही त्यानें वाट पाहिली नाहीं, इतका तो जयोन्मत्त झाला होता.

राज्यवर्धन सिंहासनाधिष्ठित होतो न होतो तोंच त्याच्या कानावर वरील भगिनीविषयक संकटाची वार्ता पडली. पण तो निधड्या छातीचा वीर सर्व दुःख बाजूला सारून शंत्रूवर चाल करण्यासाठीं निघाला. बरोबर त्यानें आपला मामेभाऊ **भंडी** यास दहा हजार घोडेस्वारांसह घेतलें होतें. हर्षवर्धनास—त्याचा बरोबर स्वारीवर जाण्याचा आग्रह असतांही—राज्याच्या बंदोबस्तासाठीं त्यानें ठाणेश्वरासच ठेवलें. राज्यवर्धन शक्य तितकी त्वरा करून शत्रूच्या सैन्याशीं जाऊन भिडला, व त्यावर एकदम हल्ला चढवून त्यानें त्याचा पूर्ण पराभव केला. या युद्धांत देवगुप्त मारला गेला असावा असें वाटतें. याप्रमाणें विजय मिळवून तो पुढें कनोजच्या रक्षणार्थ तिकडे निघाला. वाटेंतच त्याची बंगालच्या शशांकगुप्ताशीं गांठ पडली. योगायोगाचा चमत्कार असा कीं, हर्षाचें जें दैवचक्र पहिल्यापासूनच त्याला न कळत त्याला

---

१ हे बंगालचे गुप्त राजे मौखरींच्या आधिपत्याखालीं असून, मनांतून त्यांचा द्वेष करीत.

अनुकूल दिशेनें फिरत होतें, त्याचा तिसरा फेरा आतां सुरू होऊन, त्यांत बिचारा राज्यवर्धन गडप झाला. शशांकगुप्ताला विजयी राज्यवर्धनाशीं उघड सामना करण्याची छाती झाली नाहीं. म्हणून त्यानें विश्वासघाताचा डाव टाकला. त्यानें गोडीगुलाबीचें बोलणें सुरू केलें, आणि कृतापराधाची क्षमा मागून प्रायश्चित्तादाखल आपली कन्याही राज्यवर्धनाला देण्याचें कबूल केलें. पूर्वकाळीं एकमेकांशीं भांडणाऱ्या क्षत्रियकुळांत आपसांत एकी घडवून आणण्याची ही रीतच होती. शशांकाच्या मानभावी बोलण्यावर भाबड्या राज्यवर्धनानें विश्वास ठेवला व निःशस्त्र होत्साता तो कांहीं निवडक लवाजम्यासह शशांकाच्या छावणींत गेला. पुढें ठरल्याप्रमाणें भोजनाचे प्रसंगीं शशांकानें त्याचा कपटानें वध करविला ! राज्यवर्धनाची अशी वाट लावल्यावर भंडीच्या सेनापत्याखालीं असलेल्या त्याच्या सैन्याला तोंड देण्याच्या भानगडींत न पडतां तो तसाच कनोजहून आपल्या देशास परत गेला. तो गेल्यावर कनोज येथें मागें राहिलेल्या गुप्त सरदारानें भंडीला हुलकावणी देण्याकरितां राज्यश्रीला कारागृहांतून काढून हळूच तिची दूर रवानगी करून दिली.

या प्रमाणें इ. स. ६०६ सालाच्या सुरवातीस, अगदीं अल्प वयांत–म्हणजे सोळाव्या वर्षाच्या सुमारास–हर्षाला राज्यकारभाराचा भार अंगावर घेणें भाग पडलें. वयानें लहान असला तरी तो अतुल धैर्यवान्, कुशाग्र बुद्धीचा, आणि दैवशाली होता. हर्षानें आलेल्या स्थितीला तोंड देऊन लगेच विश्वासघातकी शशांकगुप्ताचें पारिपत्य करून आपल्या दुर्दैवी बहिणीची ( म्हणजे कनोजच्या महाराणीची ) सुटका करण्याचा निश्चय केला. आपण लहान व अननुभवी, व

आपल्याला कोणाचें साह्य नाहीं, असें पाहून आपल्याविरुद्ध सर्वच देशांतील राजे उठण्याचा संभव आहे हें जाणून त्यानें सैन्याची जय्यत तयारी केली, आणि एकट्या शशांकगुप्ताचा बंगालच नव्हे, तर सर्व राजे जिंकून भरतखंडभर द्विग्विजय करण्याच्या इरादानें त्यानें प्रस्थान ठेवलें. हा सर्व प्रसंग विख्यात कवि **बाणभट्ट** यानें **हर्षचरित्र** या नांवाच्या आपल्या ग्रंथांत फार सरस रीतीनें वर्णिला आहे. बाणभट्ट हा हर्षाचा समकालीन असून त्याचा आश्रित होता हें सुप्रसिद्धच आहे. या चरित्रकारानें केलेलें वर्णन त्या वेळीं हिंदुस्थानांत यात्रेसाठीं आलेला बौद्धधर्मीय चिनी प्रवासी जो **ह्युएनत्संग** त्यानें दिलेल्या हकीकतीशीं फारच जुळतें असल्यानें तें विश्वसनीय असलें पाहिजे हें उघड आहे. असो. दिग्विजयाला निघण्यापूर्वीं त्यानें आपल्या अमात्या-कडून भरतखंडांतील सर्व राजांना "शरण या, नाहीं तर युद्धास तयार व्हा," अशा अर्थाचीं पत्रें धाडलीं. या प्रमाणें तयारी करून दिग्विजयास निघाल्यावर त्यानें पहिला तळ आपल्या नगरीपासून थोड्याच कोसांवर सरस्वतीचे कांठीं दिला. या पहिल्या मुक्कामावर तेथील गांवच्या पाटलानें मुद्दाम या प्रसंगासाठीं पाडलेली वृषभछापाची मोहोर आपल्या तळहातावरून नजर केली. पाटलाच्या हातावरून घेत असतां हर्षाच्या हातून निसटून ती मोहोर खालीं पडली, आणि सरस्वतीच्या कांठच्या चिखलांत पडून तिनें त्यावर आपला ठसा उमटविला. हा प्रकार म्हणजे दिग्विजयाच्या आरंभींच झालेला मक्षिकापात समजून हर्षाच्या बरोबरची मंडळी अगदीं घाबरून गेली. पण खंबीर मनाच्या व प्रसंगावधानी हर्षराजानें त्यांची समजूत करून त्यांस सांगितलें कीं, झालेला प्रकार हा अपशकुन नसून शुभ शकुनच

आहे ! कारण आतां सर्व भूमीवर माझ्या अधिराज्याचा छाप बसणार आहे'[1] !

## भाग २ रा

असो; याप्रमाणें हर्ष दिग्विजयार्थ निघाला, तो त्यानें प्रथम कनोजचा रस्ता धरला. तेथें वाटेंत भंडीची व त्याची भेट झाली, व त्याजपासून राज्यवर्धनाच्या वधाची दुःखदायक कहाणी पुनः एकदा विश्रुत झाली. भंडीनें माळव्याच्या राजाचा पराभव करून त्याच्या हत्तींचें पथक व कोश हस्तगत करून घेतले होते, व त्याच्या बायकामुलांना नौकराचाकरांसह बंदिवान् करून राज्यश्रीच्या छळाबद्दल चांगला सूड उगवला होता. नंतर भंडीपासून त्याला असें कळलें कीं, राज्यश्री कारागृहांतून सुटून विंध्याद्रीच्या अरण्यांत आश्रयासाठीं कोठें तरी पळाली आहे, व प्रयत्नांतीही तिचा अद्याप शोध लागला नाहीं. हें ऐकून भगिनीप्रेमाच्या वेडांत हर्षराजा आपल्या सैन्यास तेथेंच गंगेच्या कांठीं मुक्काम करण्याची आज्ञा करून कांहीं निवडक अनुचरांसह तिच्या शोधार्थ स्वतःच धांवला. शोध करतां करतां तो अकस्मात् दिवाकरमित्र नांवाच्या एका बौद्धभिक्षूच्या आश्रमांत आला.

---

१ ११ व्या शतकांत इंग्लंड जिंकणाऱ्या वुइल्यम् राजाची गोष्टही अशीच लक्षांत ठेवण्यासारखी आहे. इंग्लंडच्या किनाऱ्यावर पाऊल टाकतांना चिखलावरून पाय निसरून वुइल्यम् सपशेल खालीं पडला. पण यत्किंचित् न डगमगतां आपले चिखलांनीं भरलेले हात सर्वांस दाखवीत तो हंसून म्हणाला, “ पाहिलेंत ना गड्यांनो ! हें पहा, इंग्लंड माझ्या हातीं आलेंच ! ” एकंदरींत खरे शूर व कर्तबगार वीर शकुनापशकुनाकडे लक्ष देतांना सहसा आढळत नाहींत हेंच खरें !

हा दिवाकरमित्र त्याच्या मेहुण्याचा—म्हणजे ग्रहवर्म्याचा—प्रियमित्र होता. त्याच्या आश्रमांत आल्यावर त्याच्या एका शिष्याकडून हर्षाला अशी बातमी कळली कीं, तेथून जवळच एके ठिकाणीं कोणी दुःखार्त स्त्री चिता रचून तीवर आपल्याला जाळून घेण्याच्या विचारांत आहे. हें ऐकतांच त्याला काय वाटलें असेल तें असो; तो तडक त्या शिष्यांसह त्या चितेकडे निघाला व तेथें पोंचल्यावर पाहतो, तों राज्यश्रीच दुःख अनावर झाल्यामुळें देहांत करून घेण्याच्या बेतांत आहे. अशा आकस्मिक रीतीनें भावाबहिणींची भेट झाल्यावर त्यांस जो आनंद झाला असेल तो काय वर्णावा ?

तेथून परत फिरण्यापूर्वीं हर्ष व राज्यश्री हीं दोघेंही दिवाकरमित्राची अनुज्ञा घेण्यासाठीं त्याच्या आश्रमांत आलीं. त्या स्थानाचें पावित्र्य व शांतता पाहून राज्यश्रीच्या दुःखदग्ध मनावर कांहीं निराळाच परिणाम झाला, व सर्वसंगपरित्याग करून आपणही बुद्धभिक्षुणी व्हावें असें तिच्या मनानें घेतलें. लगेच तिनें तो बेत आपल्या भावाला कळविला, व कळकळीनें ती त्याची आज्ञा मागूं लागली; परंतु हर्ष व दिवाकरमित्र या दोघांनींही तसें न करण्याविषयीं तिचें मन वळविलें, व हर्षानें तर तिला सांगितलें कीं आपल्या जन्माची इतिकर्तव्यता होऊन गेल्यावर आपण दोघें बरोबरच ही पवित्र दीक्षा घेऊं. असो. याप्रमाणें राज्यश्रीचा शोध लागल्यावर हर्षराजा तिच्यासह गंगातटाकीं पुनः आपल्या सैन्याला येऊन मिळाला.

हर्ष राज्यश्रीला घेऊन जेव्हां कनोजला गेला तेव्हां कनोजच्या गादीची काय व्यवस्था करावी हा प्रश्न उपस्थित झाला. राज्यश्री ही

निपुत्रिक विधवा असल्यामुळें तिच्या नात्यांतील कोणा अपरिचित वारसाला तिच्या गादीवर बसवावें कीं काय ? आपल्या उद्विग्न बहिणीला नुकतेंच चितेपासून व भिक्षुणी होण्याच्या विचारापासून परावृत्त करून आणिलें असल्यामुळें तिचा हक्क दूर करावा असें हर्षाच्या मनांत कसें येणार ? त्याला स्वतःला त्या राज्याची अपेक्षा नव्हती. ग्रहवर्मा बहुधा बौद्ध झालेला असावा; तशीच राज्यश्रीही होती. हर्ष हा जरी मूळचा कट्टा शिवोपासक होता, तरी अगदीं अल्पवयांत आलेल्या या अनेक संकटांमुळें त्याचें मन बौद्ध धर्माकडे प्रवृत्त होऊं लागलें होतें. अशा स्थितींत वर सांगितलेल्या प्रश्नाचा उलगडा कनोज नगराबाहेर असलेल्या बोधिसत्व[1] **अवलोकितेश्वर** देवाच्या कौलाप्रमाणें करावा असें मुत्सद्यांनीं धूर्तपणानें ठरविलें. त्याप्रमाणें देवास कौल लाविला, व त्यानें सर्वांस मानवेल असाच निकाल दिला. त्यानें असें ठरविलें कीं, राज्यश्रीच्या नांवानें हर्षानें राज्याचा कारभार चालवावा, आणि स्वतः सिंहासनारूढ न होतां किंवा कनोजाधिपति अशी पदवीही न घेतां राजपुत्र **शिलादित्य** हें नांव धारण करून

---

१ बुद्ध म्हणजे ज्ञानी. बौद्ध धर्माचा प्रणेता भगवान् गौतम यास " बुद्ध " ही पदवी प्राप्त होण्यापूर्वी त्याचे अनेक जन्म झाले होते, व त्या वेळीं तो " बोधि-सत्व " म्हणजे बुद्ध होण्याच्या मार्गांत होता, अशी कल्पना आहे. गौतमाच्या या पूर्वावतारांपैकींच बोधिसत्व अवलोकितेश्वर हा एक अवतार होय. बौद्ध धर्माच्या परिणतावस्थेंत ( महायान पंथांत ) या बोधिसत्वांच्या मूर्ति व मंदिरें बनविणें, त्यांचे उत्सव करून मिरवणुकी काढणें वगैरे प्रकार फार सुरू झाले होते. अशा एका उत्सवाचा ह्युएनत्संग यानें केलेला उल्लेख पुढें याच प्रकरणांत आला आहे.

राहावें. याप्रमाणें राज्यश्री कनोजच्या गादीवर बसली, व हर्ष युवराज नात्यानें कनोजचा कारभार चालवूं लागला.

सारांश, ठाणेश्वरचा राजा, व कनोजचा युवराज अशा दुहेरी नात्यानें या संयुक्त राज्याचा कारभार यापुढें हर्षास पाहावा लागला. यापुढें त्यानें आपलें ठाणेश्वराचें ठाणें सोडून कनोज हीच मुख्य राजधानी केली. दोन्ही भावंडांचें अकृत्रिम प्रेम आजन्म तसेंच राहिलें.

कनोज व ठाणेश्वर येथील संयुक्त सैन्यांच्या जोरावर भरतखंड पादाक्रांत करण्याचा आपला निश्चय हर्षराजास अधिक सुलभतेनें पार पाडतां आला. त्याला पहिला शकुन उत्तम झाला. कामरूप (आसाम) देशाचा राजा कुमारराज (हा बहुधा बंगालच्या शशांकाचा शत्रु असल्यामुळें) यानें हर्षाशीं सख्य करण्याच्या हेतूनें त्याच्याकडे (भारतीयांच्या कल्पनेप्रमाणें) सम्राट्चिन्ह म्हणून एक बहुमूल्य श्वेतछत्र पाठवून दिलें. नंतर पूर्व व पश्चिम या दोन्ही दिशांकडे आपलें सैन्य घेऊन क्रमाक्रमानें कूच करीत व वाटेंत येणारे प्रांत जिंकीत हर्ष सहा वर्षे फिरला, आणि येवढ्या अवधींत त्यानें उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक राजांवर आपलें अधिराज्य स्थापित केलें. या ठिकाणीं येवढें सांगणें जरूर आहे कीं हर्षाच्या साम्राज्याचें स्वरूप पुढें मुसलमान बादशहांनीं स्थापिलेल्या साम्राज्याहून भिन्न होतें. भारतीयांची पूर्वापार साम्राज्यविषयक कल्पना अशी होती कीं, सम्राटानें जिंकलेल्या देशांच्या राजांना गादीवरून हुसकून लाविलेंच पाहिजे असें नाहीं. जिंकलेल्या राजानें विजयी सम्राटाचें प्रभुत्व मान्य करून ठराविक वार्षिक करभार (खंडणी) दिला, व ठराविक वेळीं सम्राटाचे दरबाराला तो हाजर

राहिला म्हणजे पुरे, अशी त्या वेळची कल्पना होती. पिढ्यान्‌पिढ्या उपभोगलेल्या राज्यावरून कोणा राजाला काढून टाकणें हें त्या काळीं खरोखर निंद्य समजत असत. या गोष्टीचा विचार केल्यास हर्षाचें साम्राज्य पुढच्या मुसलमानी साम्राज्याहून, किंबहुना ब्रिटिश साम्राज्या-हूनही कसें भिन्न होतें हें समजून येईल. दिग्विजय करतांना जित राजांकडून हर्षानें फक्त आपलें प्रभुत्व मान्य करविलें, आणि बाकीच्या बाबतींत त्यांना स्वातंत्र्य दिलें.

हर्षवर्धनाच्या दिग्विजयाचें सविस्तर वर्णन उपलब्ध नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे. आपल्या बंधूचा वध करणाऱ्या कपटी शशांकाचें त्यानें कसें पारिपत्य केलें हेंही कळत नाहीं. हर्षाचा कल बौद्धधर्माकडे वळल्यामुळें कदाचित् पराजित केल्यानंतर त्यानें शशांकाला क्षमा करून सोडून दिलें असण्याचाही संभव आहे. त्याच्या साम्राज्याचा विस्तार स्थूलमानानें सर्व उत्तर हिंदुस्थानभर होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. सिंध, पंजाब व काश्मीर ह्या प्रांतांकडूनही त्यास खंडणी मिळत होती. नर्मदेच्या दक्षिणेस मात्र या वेळीं त्याला एक जबरदस्त प्रतिस्पर्धी भेटला, व त्यामुळें दक्षिण हिंदुस्थान जिंकण्याचा बेत हर्षास सोडून द्यावा लागला. या वेळीं महाराष्ट्रांत चालुक्य घराण्यांतील दुसरा **सत्याश्रय पुलकेशी** हा राज्य करीत होता. तो फार शूर व बुद्धिमान् होता, व त्यानें लवकरच आपल्या राज्याची सीमा थेट दक्षिण समुद्रा-पर्यंत भिडविली. याप्रमाणें एका चमत्कारिक योगायोगामुळें हिंदुस्था-नांत या वेळीं दोन प्रबळ साम्राज्यें स्थापन होऊन त्यांचे बलाढ्य अधिपति दोघेही एकमेकांना पुरून उरले होते. या दोन साम्राज्यांची सरहद्द स्वाभाविकच नर्मदा नदी ही होती.

सहा वर्षें अविश्रांत दिग्विजयाची मेहनत केल्यावर मग मात्र पसतीस वर्षें पर्यंत अविच्छिन्न शांततेंत हर्षानें कारभार केला, असें ह्युएनत्संग म्हणतो. अर्थात् इ. स. ६२० चे सुमारास पुलकेशीशीं झालेलें युद्ध, व ६४३ च्या सुमारास गंजम प्रांतांशीं झालेला युद्ध-प्रसंग हे ह्या शांततेस अपवादादाखल समजावयाचे.

हर्षाच्या राज्यव्यवस्थेविषयीं ह्युएनत्संगचें वर्णन मोठें बहारीचें आहे. तो म्हणतो:—" आपल्या राज्याचा विस्तार केल्यावर हर्षानें आपलें सैन्य वाढवून हत्तींची संख्या ६०००० केली, व पायदळ १००००० केलें. तो आपलीं कामें अगदीं दक्षतेनें करी, आणि त्याचा सर्व कारभार चोख न्यायाचा असे. सत्कृत्यें करण्याची वेळ आली म्हणजे त्याला अन्न व झोंप यांचाही विसर पडे. हिंसा करणें हा त्यानें भयंकर अपराध ठरविला होता, व पांची हिंदू प्रांतांत त्यानें सर्वत्र मांसाहार वर्ज्य करण्याचे हुकूम सोडले होते. राज्यांत त्यानें सर्वत्र पांथस्थांसाठीं धर्मशाळा बांधल्या. राज्याची पाहाणी करण्यासाठीं तो ठिकठिकाणीं दौरे करी, व फिरती-वर असतां कोठेंही एका ठिकाणीं फार दिवस मुक्काम करीत नसे. मुक्कामाच्या ठिकाणीं राहाण्याकरितां तात्पुरत्या झोंपड्या उभारीत असे. तो दिवसाचे तीन भाग करून, एका भागांत राज्यकारभार व उरलेल्या दोन भागांत धर्मकृत्यें करी. तो अविश्रांत श्रम करी. व इतकें करूनही सर्व दिवस त्याच्या कामाला अपुरा पडे. त्यानें आपले प्रतिनिधि निरनिराळ्या प्रांतांत ठेवले असून त्यांच्या मार्फत तो राज्यांत न्याय वगैरे सर्व लोकांना नीट मिळतो किंवा नाहीं हें पाहात असे." एकंदरीनें हर्षाचें साम्राज्य म्हणजे जगांत आजपर्यंत जीं

थोडीं रामराज्यें होऊन गेलीं त्यांपैकींच एक होतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

हर्ष इ. स. ६४७ त मृत्यु पावला असें चिनी लेखावरून दिसतें, म्हणजे त्यानें एकंदर ४१ वर्षें राज्य केलें. त्याला बहुधा पुत्रसंतति नव्हती. त्याची राणी व मुलें यांसंबंधीं कोठेंच कांहीं सांगितलेलें नाहीं याचें मोठें आश्चर्य वाटतें. त्याला एक कन्या मात्र होती व ती वलभीच्या[1] राजाला दिली होती. या निपुत्रिकत्वामुळेंही त्याचा ओढा धर्माकडे अधिक वळला असेल. हा ओढा इतका होता कीं या अद्वितीय सम्राटाला ऐहिक ऐश्वर्य व संपत्ति हीं अगदीं तुच्छ वाटत, व त्यामुळें तो दर पांच वर्षांनीं मोठा जंगी समारंभ करून आपलें सर्व धन विद्वान् व भक्तिमान् बौद्ध, ब्राह्मण व जैन भिक्षु इत्यादिकांना अर्पण करी. अशा एका समारंभाचें वर्णन ह्युएनत्संगनें सविस्तर केलें आहे. त्यांत तो म्हणतो " हर्ष राजा असल्या समारंभानंतर निर्धन झाल्यानें आपल्याकरितां व वस्त्रांसाठीं राज्यश्रीजवळ भिक्षा मागे ! " असा प्रकार जगांतील कोणत्याही सम्राटाविषयीं सांगतां येईल असें वाटत नाहीं. असा हा चक्रवर्ती हर्ष दातृत्व, तत्त्वज्ञान व शौर्य यांचें एकवटलेलें आश्रयस्थान होता.

चिं. वि. वैद्य यांच्या " मध्ययुगीन भारतवर्ष–भाग १ ला " यावरून संक्षेपानें.

---

१ काठेवाडचा एक भाग.

प्रश्नः—( १ ) हर्षाला राज्यप्राप्ति कशी झाली ?

( २ ) राज्यश्रीची गोष्ट थोडक्यांत सांगा.

( ३ ) साम्राज्य स्थापन करण्यास उपयोगी असे कोणते गुण हर्षाचे अंगीं होते, हें उदाहरणें देऊन दाखवा.

( ४ ) त्या वेळच्या व आतांच्या साम्राज्यांत भेद कोणता दिसून येतो ?

( ५ ) हर्षाच्या साम्राज्याची मर्यादा कोठवर पोंचली होती ? दक्षिणेंत त्याची सत्ता पसरण्यास कोणतें विघ्न आलें ?

---

# १२

# नाना फडणवीस व पार्वतीबाई

[ पुढील संवाद "तोतयाचें बंड" नामक नाटकांतून घेतला आहे. हें ऐतिहासिक नाटक श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांनीं लिहिलें आहे.

पानिपतच्या घनघोर संग्रामांत सदाशिवराव भाऊ पेशवे नापत्ता झाले. त्यांचें शव कोणास सांपडलेंच नाहीं, यामुळें कांहीं काळानें जशी इतर कांहीं मंडळी पानपताहून दक्षिणेंत परत आली तसेच भाऊसाहेबही येतील, अशा आशेनें त्यांची पत्नी पार्वतीबाई हिनें सौभाग्यचिन्हांचा त्याग केला नव्हता. या गोष्टीचा फायदा घेऊन भाऊसाहेबांशीं चेहेऱ्यांत साम्य असलेल्या एका कनोजा ब्राह्मणानें मीच सदाशिवराव भाऊ असें सांगण्यास सुरवात केली. ही हकीकत थोरले माधवराव यांच्या कारकीर्दीत झाली. माधवरावानें ताबडतोब चौकशी करून हे भाऊसाहेब नव्हेत अशी खात्री झाल्याबरोर या परदेशी तोतयास रत्नागिरीच्या किल्ल्यावर बंदींत ठेवलें. तेथें तो १२ वर्षे होता. पण यानंतर कांहीं उपद्व्यापी मंडळींनीं त्याला पुढें करून आपला डाव साधण्याचा यत्न केला व रत्नागिरीचा सुभेदार रामचंद्र नाईक परांजपे हा भोळसर माणूस त्यांच्या कारस्थानांत सांपडला. त्यानें तोतयास सोडून दिलें. मग काय? त्यास

भराभर लोक मिळूं लागले, व या बंडास लवकरच रंग चढला. ‘ तोतया शेणामेणाचा होता, तो लोखंडाचा झाला.’ या वेळीं पेशवाईचा कारभार नाना फडणविसाच्या हातीं होता म्हणूनच ही वेळ निभावली. त्यानें महादजी शिंद्यांच्या मदतीनें लवकरच या तोतयाचा पराभव करून त्याला पकडून आणलें, व सर्वांसमक्ष त्याची लबाडी उघडकीस आणून त्याला मेखसूंनें डोकें फोडून मारण्याची शिक्षा दिली.

पुढील प्रवेशांत तोतया हा खरा सदाशिवरावच अशी खात्री झाल्यामुळें, आपण, त्याला कसें सोडून दिलें हें सांगण्याकरितां रामचंद्र नाईक पुण्यास आला आहे, व तो पार्वतीबाईशीं बोलत असतांच नाना फडणवीस प्रवेश करतो. नाना नाईकास ताबडतोब कैद करतो, व नंतर पार्वतीबाईचा व त्याचा संवाद होतो. भेटीचे अखेरीस “ तोतया आपल्या प्रत्यक्ष नजरेस घालीन, आणि मगच काय करावयाचें तें करीन ” असें नाना पार्वतीबाईस वचन देतो. ]

( पार्वतीबाई व तिची दासी विठाई ह्या बोलत असतां रामचंद्र नाईक प्रवेश करतो. )

**पार्व०:**—नाईक, या. तुम्हांला शंभर वर्षं आयुष्य आहे!

**राम०:**—( नमस्कार करून दूर बसतो ) नको, नको सरकार. तेवढं शंभर वर्षं आयुष्य नको, अशी परमेश्वराजवळ दोन्ही हात कोपरापासून जोडून प्रार्थना आहे.

**पार्व०:**—( हंसून ) कां नाईक, नको कां म्हणतां ? ज्याला हवं त्याला आयुष्य मिळत नाहीं, आणि ज्याला मिळतं ते नको म्हणतात ! हा काय बरं चमत्कार ?

**राम०:**—बाईसाहेब, आयुष्य मिळतं पण तें सुखाचं मिळत नाहीं म्हणून नकोसं वाटतं. एरव्हीं अमर व्हावं अशी कुणाला नाहीं

इच्छा होणार ? भरभक्कम आयुष्य घेऊन पुष्कळ दिवस जगलं तर धिंडवडेच करून घ्यायचे कीं नाहीं ?

**पार्व०:**—नाईक, तुम्ही म्हणतां तसं माझं मात्र झालं आहे खरं. तिकडेचंही तसंच झालं; पानपताहून जिवंत राहून येणं होतं काय ? आणि बारा वर्षं घरच्या घरीं कैदेंत जातात काय ? आतां पेशव्यांच्या[1] घराण्यांत कैद अशी थोड्यांनाच चुकली म्हणा. पण कैदे कैदेंत झालं तरी अंतर असतं. पण म्हणतें आमचं एक मेलं कसंही असो. पण तुम्हांला आयुष्याची खंती कां यावी ?

**राम०:**—खंती इतक्याच करितां, कीं जें होऊं नये तें हातून घडलं. धन्याला कैदेंत ठेवणाऱ्याचे माझे प्राण दोन वर्षांपूर्वींच जाते तर असलं घोर पातक तरी हातून घडलं नसतं !

**पार्व०:**—नाईक, असं कां बरं म्हणतां ? तुमच्या पापाची तुमच्याच हातून निष्कृति झाल्यावर तुम्हांला वाईट वाटण्याचं खरोखर कारण उरलं नाहीं. शिवाय असं पहा, कीं तुमच्या सारखा निश्चयी स्वामिभक्त किल्लेदार रत्नागिरीस नसता, तर आज इतक्या वर्षांनीं तरी स्वारींच्या पायांतली बिडी निघाली तीही निघाली नसती ! तुमचे माझ्यावर किती उपकार झाले म्हणून सांगूं ! तुम्हीं मला चुडेदान दिलंत. मीं खरोखर तुमच्या पायावर डोईच ठेवली पाहिजे !

(नाईकाच्या पाया पडावयास जाते. तो उठून ' छे: छे: , बाईसाहेब, हें काय हें !' असें म्हणतो. इतक्यांत नाना फडणवीस प्रवेश करतो.)

---

१ भाऊसाहेबांचें. २ यांत विशेषेंकरून राघोबाच्या कैदेचा उल्लेख आहे.

**नाना:**—कोण नाईक ? ( रामचंद्र नाईक नमस्कार करतो; तो न घेतां नाना पाठ फिरवितो. ) तुम्ही पुण्यास केव्हां आलां ? तुम्हांला रत्नागिरी सोडायला परवानगी कोणी दिली ?

**पार्वे०:**—नाना, तुम्ही केव्हां आलां ? तुम्ही उभे कां ? बसा. ( सर्व बसतात. )

**नाना:**—आतां इतक्यांतच आलों. तब्बेत आज विशेष बिघडली आहे वाटतं ! मला कळतं तर मी आधींच आलों असतों याहून.

**पार्वे०:**—तुम्ही आलां असतां. पण म्हटलं थोड्या वेळांत तुम्हांला पुष्कळ कामं करून गडावर[1] परत जायचं. गर्दींत असणार ! म्हणून नाहीं आधीं बोलावलं इतकंच. कुटुंबाचं[2] क्रियाकर्मांतर कालच संपलंना ?

**नाना:**—( उश्वास टाकून ) होय. तिचा माझा ऋणानुबंध काल सुटला खरा !

**पार्वे०:**—नाना तुमच्या कुटुंबासारखा स्वभाव मिळायचा नाहीं ! तुम्हांला मोठं दु:ख झालं नाना ! त्या इथं असतांना त्यांची मला मोठी करमणूक होती. तुमचं धोरण संभाळून त्यांतल्यात्यांत माझ्याशीं त्या मोठ्या मोकळ्या मनानं वागत.

**नाना:**—( स्वगत ) या बोलण्यांत किती नाजूक खोंच आहे, हें ज्याचं त्यालाच कळणार. ( उघड ) ती मोकळ्या मनाची तर खरीच.

---

१ पुरंदरच्या किल्ल्यावर. या वेळीं बालपेशवा सवाई माधवराव याच्या संरक्षणासाठीं त्यास या किल्ल्यावर ठेवलें होतें. व येथूनच नाना फडणवीस कारभार पाही. २ नानांची एक पत्नी याच सुमारास वारली होती.

पण तिनं संभाळण्यासारखं असं माझं धोरण म्हणून मात्र कांहींच नव्हतं ! मीही बाईसाहेबांशीं होईल तितक्या मोकळ्या मनानंच वागत असतों. मग बाईसाहेबांना कसंही वाटो !



चित्र ८—नाना फडणवीस

**पार्व०**:—मला काय वाटायचं नाना ? मी का म्हणतें आहें तुम्ही मोकळ्या मनानं वागत नाहीं म्हणून ? पण त्यांतल्या त्यांत इतकंच कीं, पुरुषांना मोकळेपणानें वागतांना राज्यकारभाराचीं अनेक अड-चणींचीं धोरणं संभाळून वागावं लागतं ! बायकांना ती राजकारणाची उपाधि कांहींच मागं नसते. म्हणून त्यांना भाबडेपणानं वागतां येतं. त्यांचा मोकळेपणा दिसायला अधिक असला म्हणून त्यांत त्यांचा म्हणजे कांहीं विशेष गुण आहे असं नाहीं हो मी म्हणत ! राजकारण कठीण आहे, हें आम्हां बायकांना झालं तरी कळत का नाहीं ?

**नाना:**—( स्वगत ) आजचा रोंख जरा वेगळाच दिसतो आहे; पण त्याला भितां कामा नये. ( उघड ) राजकारण कठीण असेल कदाचित्. पण ईश्वरकृपेनं राजकारणांत झालं तरी सत्याला सोडावं लागत नाहीं फारसं. खोटं कसं आणि किती टिकणार ?

**पार्व०:**—बरोबरच आहे. खोटं कसं चालेल ! पण खरंसुद्धां सगळंच घेऊन चालत नाहीं हो ! सोन्याची झाली म्हणून सुरी कांहीं उरांत घालून घेतां येत नाहीं. तसंच खऱ्याचंही आहे. खरं हें चागलं. पण त्यानं इतर गोष्टींना बाध येत असेल तर तें दूरच ठेवलं पाहिजे !

**नाना:**—तसं नव्हे बाईसाहेब. खरं काय हें निश्चित झाल्यावर मग पंचाईत नसते कसली ! पण पुष्कळ वेळां होतं काय, कीं खरं काय हेंच ठरत नाहीं. जें आपल्या मनाला बरं, तेंच खरं म्हणून घेऊन चालायची मनुष्याची प्रवृत्ति असते. आणि विशेषत: कांहीं कांहीं प्रकारच्या दु:खांत तर इष्ट-चिंतन इतकं मनाशीं जखडून बसतं, कीं खऱ्या खोट्याचा विवेक करण्याची बुद्धि असली तरी ती नष्ट होऊन जाते. आणि जें मनाला बरं, तेंच जगांतलं खरं असं वाटूं लागतं. आतां विवेक-भ्रष्टतेची ही स्थिति खासगी व्यवहारांत सुद्धां बाधक होते, तर ती राजकारणांत विशेष बाधक होईल यांत काय नवल ? स्त्रिया अधिक प्रेमळ, मोकळ्या मनाच्या दिसल्या तर हा त्यांचा गुण नाहीं म्हणून आपण आतांच म्हणालां, तेंच थोडें बदलून मी म्हणतों कीं पुरुष जरी केव्हां केव्हां निष्ठुर किंवा मुग्ध स्वभावाचे दिसले तरी हा व्यक्तिश: त्यांचा दोष नसतो.

**राम०:**—( स्वगत ) ही मध्यें बोलण्याची संधि बरी दिसते. केव्हां

तरी एकदां चकमक झडायची खरी. मग पार्वतीबाईसाहेबांच्या समोर झडलेलीच बरी. मला त्यांच्याकडून थोडा पाठिंबा तरी मिळेल. ( उघड ) आपणा उभयतांच्या बोलण्यांत मी बोलावं असं नाहीं. पण एक शब्द बोलायची परवानगी घेतोंच. मनाला बरं भासतं तेंच डोळ्याला खरं दिसतं, हें तर ठीकच आहे. पण दुसऱ्याच्या कां होईना, पण डोळ्यांना प्रत्यक्ष दिसणाऱ्या खऱ्याचा संशय घ्यायला तरी कांहीं सीमा आहेच कीं नाहीं ?

**नाना:**—नाईक, तुम्ही मध्यें बोललां नव्हतां तेंच बरं होतं. पण आतां बोललांत तेंच पुरतं बोला ? कोणतं खरं ? आणि त्याचा संशय घेण्याची सीमा कोणीं पोंचविली ? मी आतां तुम्हांला उघडच विचारतों. तोतयाच्या पायांतल्या बिड्या काढून तुम्ही मात्र सत्याला जागलां ? आणि आम्हीं मात्र त्याला इतके दिवस कैदेंत ठेवून असत्याचरण केलं आाणि बाईसाहेबांचें व्यर्थ वैर साधलं, असंच कीं नाहीं तुमचं म्हणणं ?

**राम०:**—नाहीं, मी तसं म्हणत नाहीं. पण आपलं सांगितलें ! आपण म्हणतां तसंच पूर्वीं माझंही म्हणणं होतं खरं. पण शेंकडों लोकांनीं समक्ष येऊन आपली खात्री करून घेतली; अखेर निर्वाणींचे शब्द बोलून भाऊसाहेबांनीं तुरुंगाच्या दगडावर डोकं फोडून घेण्याचा आणि किल्ल्यावरून समुद्रांत उडी टाकण्याचा प्रयत्न केला, तेव्हां मग मीं मनाशीं निर्धार केला कीं, हातून आपलीच काय गुन्हेगारी होईल ती होवो, पण सरकारस्वारीला या पुढें बंदिवासांत ठेवणं हें ईश्वराच्या घरीं पाप होईल. म्हणून मग आज्ञेचं उल्लंघन मोठ्या कष्टानं केलं !

**नाना:**—नाईक, तुम्हांला शरम नाहीं वाटत असलीं कांगावखोर मायावी भाषणं बोलायला ? तुम्हीं भाऊसाहेबांना पानपताला जाण्याच्या आधीं पाहिलें होतें काय ?

**राम०:**—होय. पाहिलें होतें !

**नाना:**—मग तोतया प्रथम रत्नागिरीस तुमच्या कैदेंत आला, तेव्हांच त्याला ओळखून तुम्हीं त्याच्या पायांतल्या बिड्या कां नाहीं काढल्या ?

**राम०:**—माझी एकदम खात्री होईना ! शिवाय सरकारचा हुकूम तोडायला एकदम मन घेईना !

**नाना:**—तोतयाला प्रथम पाहतांच तुमची खात्री झाली नाहीं याचा अर्थ, हल्लीं खात्री झाली ती लोकांच्या सांगण्यावरून, असाच कीं नाहीं ? आणि पूर्वीं आमचा हुकूम तोडायला तुमची छाती होत नव्हती ती आतां झाली याचा अर्थ, दुसऱ्या कोणाचं तरी तुम्हांला पाठबळ मिळालं आहे म्हणून, असाच कीं नाहीं ?

**पार्व०:**—नाना ! मला तुम्ही मनांत काय वाटेल तें समजा, पण तिकडच्या पायांतल्या बिड्या काढायला रामचंद्र नाईकांना माझं पाठबळ मिळालं असा जर तुमच्या म्हणण्याचा रोख असेल, तर तो मात्र बरोबर नाहीं एवढंच मी सांगत्यें. मला तुमच्या राजकारणांत पडायचं नाहीं. आणि मला जर अशी ढवळाढवळ खरोखर करायचीच असती मनांतनं, तर मीं पूर्वींच नसती का केली ? आणि पुण्यांत या वाड्यांत तरी कां राहिलें असतें तुमच्या अशा नजर कैदेंत ?

आमच्या आनंदीबाईच्या सारखं वागायचं मीं मनांत आणलं असतं तर वाड्यांतून बाहेर पडायला माझा कोण हात धरणार होतं?

**नाना:**—बाईसाहेब! नाईकांना आपलं पाठबळ मिळालं असं मी मुळींच म्हणत नाहीं. त्यांना पाठबळ मिळालं आहे तें आमच्या शत्रूंचं. हैदरखानं, करवीरकर, मोरोबा आणि दादासाहेब इतक्यांच्या[1] जोरावर जेव्हां दौलतगीरानं तळी उचलली, तेव्हां नाईकांना दयेचा पान्हा फुटला! हें आपण लक्षांत घेतलं पाहिजे! नाईकांनीं आरंभिलेला हा खेळ सर्व बंडाचा आहे! दयाधर्माचं हें निव्वळ सोंग—ढोंग आहे. किल्लेदार नेमतात ते हुकुमाची तामिली[2] करायला नेमतात; दयाधर्माची नसती उठाठेव करायला नेमीत नाहींत. तोतया कांहीं आजकालचा कैदेंत नाहीं. आज बारा वर्षे कैदेंत आहे. या अवधींत या कृत्याच्या पापपुण्याचा भार ज्यांनीं आपल्या माथ्यावर वाहिला ते तो भार यापुढंही वाहायला समर्थ आहेत, समजलां? शेषाचा[3] भार हलका करायला सरड्यानं धावण्याचं कारण नाहीं. लांडे कारभार करून त्यांना मोठं प्रतिष्ठित नांव दिल्यानें गुन्हेगारी कमी होत नसते. उलट ती वाढते. समजलां नाईक! तोतयाला मोकळा सोडून, कोकणांत बंड उभारून, आपण होऊन इकडं आल्यानं तुमच्या धाडसी सत्यप्रियतेचा पगडा माझ्यावर बसेल अशी जर तुमची समजूत असेल तर ती मात्र चूक आहे! उंदीर सर्पाच्या बिळांत न पकडतां आपण होऊन गेला, म्हणून तो धर्मात्मा मानला जाऊन सुटत नसतो.

---

१ म्हैसूरचा हैदरअल्ली, कोल्हापूरचे राजे, नाना फडणविसाचा चुलतभाऊ मोरोबादादा, व राघोबादादा पेशवे. २ अंमलबजावणी. ३ पृथ्वी शेषाच्या डोक्यावर असते अशी पौराणिक कल्पना.

पहा याची प्रचीति ! कोण आहेरे बाहेर ! चला, आंत या ! पकडा या हरामखोराला ! आणि घाला याच्या हातापायांत बिड्या माझ्या देखत आत्तां ! ( शिपाई येतात व रामचंद्र नाईकास बिड्या घालतात.) ( पार्वतीबाईस उद्देशून ) बाईसाहेब ! हे प्रकार आपल्या डोळ्यांपुढें व्हावे, याबद्दल मला फार वाईट वाटतं. पण आपल्या समजुतीप्रमाणें मीं खऱ्या भाऊसाहेबांना बारा वर्षे कैदेंत ठेवलं, त्या मानानं हा आपला उपमर्द म्हणजे कांहींच नाहीं ! मी आपल्याला निक्षून प्रतिज्ञेनं सांगतों, कीं लवकरच हे नाईक, त्यांची कारस्थानी बायको आणि त्यांचा आगलाव्या मुलगा यांचीं कृष्ण कारस्थानं पत्त्यामुद्यासुद्धां आपल्या नजरेला घालीन. म्हणजे मग आत्तांच्या माझ्या निष्ठुरतेचं आपणाला कांहींच वाटणार नाहीं. (शिपायांस) कोण आहेरे तिकडे, जा या नाईकांना घेऊन कोतवालाच्या स्वाधीन करा. त्याला म्हणावं यांना कैदेंत ठेवा, पण नीट खायला प्यायला द्या. म्हणावं त्यांचे हाल करूं नका.

**राम०:**—ठीक आहे. पण अखेर सत्याचाच जय होईल हें लक्ष्यांत ठेवा.

( शिपाई नाईकास घेऊन जातात.)

**नाना:**—बाईसाहेब, गोष्टी या थराला आल्या, तेव्हां आज थोडंसं या बाबतींत आपल्याशीं बोलण्याचा मीं निश्चय केला आहे. परवानगी असेल तर बोलतों.

**पार्व०:**—नाना, खुशाल बोला. त्याला माझी परवानगी कशाला पाहिजे ? आणि परवानगी देणारी मी कोण ? माझ्या भेटीला

आलेल्या नाईकांना खुद्द माझ्या दिवाणखान्यांत तुम्हीं हातकड्या—पायकड्या घातल्या, त्याला जर तुम्हांला माझी परवानगी लागली नाहीं, तर मला दोन अधिक उणीं उत्तरं तुमच्या मनांत बोलायचीं असलीं, तर त्याला माझ्या परवानगीची वाट तुम्हांला थोडीच पहावी लागणार आहे! बोला, खुशाल बोला! मी ऐकायला तयार आहें. मीं सगळ्याच गोष्टींना मन कसं दगडासारखं घट्ट केलं आहे! माझ्या या हतभागी डोळ्यांनीं या शनवार वाड्यांत कांहीं अनिष्ट पहायचं बाकी ठेवलेलं नाहीं! नारायणाचा खून करून गारद्यांनीं त्याच्या प्रेताचे तुकडे, रस्त्यांत मेलेल्या बिनवारसी कुत्र्याप्रमाणें, ओढीत आणून सदरेवर[1] टाकले, आणि दादासाहेबानीं त्याच सदरेवर गादीवर बसून नारायणाच्या रक्ताचा टिळा आपल्या कपाळाला लावून घेतला, हें ज्या डोळ्यांनीं पाहिलं त्यांना, रामचंद्र नाईकासारख्या नोकराला कैद केल्याचं पाहाण्यांत काय विशेष आहे? बाकी माझ्यावरचा राग तुम्हीं त्यांच्यावर काढावा, हें कांहीं बरं नाहीं.

**नाना:**—आपले हे शब्द काळजाला कसे घरे पाडतात तें काय सांगूं! बाईसाहेब, पुष्कळ वेळां असं मनांत येतं कीं, सकृद्दर्शनीं आपणाशीं इतकं निष्ठुर आचरण पावलोपावलीं करण्याचा प्रसंग येण्यापेक्षां मला मरण आलं असतं तरी पुरवतं! पण मरण हें कोणाच्या हातच नाहीं.

**पार्व०:**—नाना, मरण हातचं असतं तर मी तरी अशी ही विटंबना करून घ्यायला कशाला जगलें असतें? मला जगून राज्य-

---

१ दिवाणखान्यांत.

कारभार थोडाच करायचा आहे ? तसंच ज्यांच्या आशेवर आणि ज्यांच्या जिवाकरतां म्हणून जगायचं ते जिवंत होऊन आले, तरी त्यांची वाट काय लागणार हें दिसतच आहे उघड ! मग मला जगून काय करायचं आहे, नाना !

**नाना:**—( डोळ्यांना पाणी आणून ) शिवशिव ! बाईसाहेब ! खरे-खुरे भाऊसाहेब जिवंत असते तर ते मला नको का होते ? मीं अधिकाराची क्षुद्र हाव धरून त्यांना कैदेंत ठेवलं असतं, असं आपल्या मनांत चुकून तरी कसं येतं ? हा नाना इतका नीच, अधम झाला काय ? मी लहान असतांना पोटच्या मुलाप्रमाणं माझ्यावर प्रेम कोणीं केलं ? भाऊसाहेबांनीं ना ? मला माधवरावसाहेबांबरोबर[1] आस्थेनं शिक्षण कोणीं दिलं ? 'हा पुढं मोठा होईल' म्हणून मला शाबासकी देऊन ममतेनं पाठीवरून हात कोणीं फिरविला ? पानपतच्या स्वारीवर निघतांना मुद्दाम हौसेनं विश्वासरावांबरोबर मला कोणीं मागून घेतलं ? वाटेंत नर्मदातीरावर मी आजारी पडून अत्यवस्थ झालों असतां, "काकी, तुम्ही घाबरूं नका" असं माझ्या मातुश्रीला आश्वासन देतांना, स्वतःच प्रेमामुळं घाबरून जाऊन डोळ्याला पाणी कोणीं आणलं ? आपल्या हातानें मला औषधपाणी कोणीं दिलं ? केवळ माझ्याकरितां लष्कराचे मुक्काम जवळजवळ करवून माझी बरदास्त कोणीं ठेविली ? आणि एखादेवेळीं लष्कराला लांब मजल मारावीच लागली तर माझ्या औषधपाण्याकरितां मुद्दाम मागं राहून मला आपल्याबरोबर बंदोबस्तानें घोड्यावर घालून घेऊन, जिवाचें रान करून लष्कर गांठायचे श्रम-

---

१ थोरले माधवराव पेशवे.

सायास कोणीं केले ? बाईसाहेब ! पानपतच्या युद्धप्रसंगाच्या दिवशीं सकाळीं, जिव्हाळ्याच्या मंडळींना एकत्र जमवून स्वत:विषयीं निर्वाणींचे उद्गार काढून " जगून वांचून जे कोणी परत जातील त्यांचं रक्षण करण्याचं काम हा नाना करील " असं म्हणून सद्गदित होऊन माझ्याकडे बोट कोणीं दाखविलं ? भाऊसाहेबांनींच ना ? बाईसाहेब, आपल्या हत्तीला लागून राहिलेल्या हत्तीवर जेव्हां गोळी लागून विश्वासराव ठार झाले, तेव्हां हत्तीवरून उतरून घोड्याच्या रिकबींत पाय टेवतांना " नाना, मी चाललों ! आतां तूंच सांभाळ ! " अशी दु:खपूर्ण आरोळी कोणीं मारली ? भाऊसाहेबांनीं ना ? त्या वीराला, त्या महात्म्याला, पित्यासमान आणि गुरुसमान असणाऱ्या माझ्या त्या धन्याला—तो केवळ पानपताहून जगून वांचून परत आला येवढ्या आरोपावरून—मी जन्मभर कैदेंत टाकीन, आणि त्याच्या खरेपणा-बद्दल कोणीं शंका काढिली येवढ्या करितां त्यांचा मी छळ करीन, इतका अधम, निमकहराम हा नाना आहे, असं का अद्यापि वाटतं आपल्याला ? बाईसाहेब, आपल्याला आणखी आठवणी म्हणून कोण-कोणच्या करून देऊं ? भाऊसाहेब गर्दींत शिरले असं पाहून आपण शोक करूं लागलां. मी जवळच होतों. तेव्हां माझ्या मातुश्रीनं आपलं सांत्वन करतांना " हा माझा नाना आजपासून तुमचा मुलगा झाला असं समजा. त्याच्याकडं पाहून तरी कांहीं भलतं सलतं करूं नका " असं विनविलं तें आपणाला स्मरतं का ?

**पार्व०:**—होय नाना, मला तें चांगलं स्मरतं. मी तें कसं विसरेन ?

**नाना:**—मग हें जर खरं, तर मग मी कृतघ्न, उलट्या काळजाचा मांग आहें असं कसं मानतां ! आपल्या मनांत क्षणभर तरी असं कसं येत नाहीं कीं, भाऊसाहेबांना कैदेंत ठेवून मला काय लाभ होणार ? भाऊसाहेब जिवंत असते तर मी कारभार करतों हें पाहून त्यांना उलट बरंच वाटलं असतं ! आपल्या हातानं लावलेल्या झाडाला फळ आलेलं पाहून कोणाला बरं वाटणार नाहीं ? एवढंच नव्हे, तर गृहकलहांत त्यांनीं माझीच बाजू घेतली असती. फार काय, पण भाऊसाहेबांचा मला आधार असता तर नारायणरावांचा खून न होता, आणि रघुनाथरावदादांच्या मुळं आज दौलतीवर ओढवलेले अनर्थ ओढवले नसते. त्यांच्या अनुभवाचा फायदा कुणाला नको होता ? त्यांच्या तरवारीचा पराक्रम पहाण्याला कुणाला हौस वाटली नसती ! त्यांच्या कृपाछत्राच्या शीतळ छायेखालीं बसून पडतील तीं दोन कामं-धामं करून त्यांना खूष ठेवण्याला कुणाला प्रेम वाटलं नसतं ?

**पार्व०:**—नाना, तुमचे शब्द मला पटतात. पण ( गहिंवरून ) मी तरी काय करूं ? स्वारी जिवंत आहे अशीं स्वप्नं मला कां पडतात ? " मुली, तुझ्या सौभाग्याला धक्का लागलेला नाहीं " अशा शब्दांनीं माझी मनोदेवता मला नित्य नवा आशीर्वाद कां देते ? जो कोणी अतीत-अभ्यागत, गोसावी-बैरागी भेटतो तो माझ्या आशेच्या अंकुरावर प्रेमपूर्ण शब्दांच्या अमृताचं सिंचन कां करतो ?

**नाना:**—बाईसाहेब, कसूर माफ असावी. पण मी सांगतों कीं असल्या आशीर्वादांवर जाणं व्यवहाराला धरून नाहीं. उदार

श्रीमंताच्या दानपूर्ण हस्ताकडे पाहून प्रत्येक जण खोटंच बोलतो असं मी तरी कसं म्हणूं ? सर्व जगाच्या डोक्यावर आपमतलबी असा शेरा मी कसा मारूं ? पण आपल्या दुःखपूर्ण मुद्रेकडे पाहून, विशेषतः आपणा स्वतःला आशा वाटते म्हणून गोड बोलणारेच पुष्कळ ! पण बाईसाहेब, असल्या गोष्टी कुठं होत असतात का ?

**पार्व०:**—नाना, असं कां बरं म्हणतां ? तुमची आई गिलच्यांच्या कैदेंत जिवंत आहे अशा बातमीवर तुमचा स्वतःचा विश्वास बसला होताना ? आणि तिला सोडविण्याकरितां माळव्यांत हिंगण्यांना पत्रं लिहून, 'माझं सर्वस्व देतों, पण आईचा शोध लावून तिला सोडवा' अशी प्रार्थना तुम्हींच केली होतीना ?

**नाना:**—होय. पण पुढं पत्ता लागेना तेव्हां त्या गोष्टीचा नाद मीं नाहीं का सोडला ?

**पार्व०:**—मग काय, पानपतच्या लढाईंतून कुणीच का जिवंत सुटून आलं नसेल ?

**नाना:**—बाईसाहेब, आपण आणि मीच स्वतः जर पानपताहून जिवंत परत आलों, तर कोणीच जिवंत परत आला नाहीं असं मी कसं म्हणेन ? पण कोण आला नी कोण न आला याचा निर्णय पुढं एक दोन वर्षांतच झाला पाहिजे होता.

**पार्व०:**—तुम्ही हा निर्णय दोन वर्षांत झाला पाहिजे होता असं म्हणतां; मी तेवढं मात्र म्हणत नाहीं. कुणीं सांगावी कुणावर कशी परिस्थिति आली असेल ती ? फार काय सांगूं ? माझी कुणबीण विठी, तिचा नवरा हैबती निंबाळकर पुण्यांत प्रगट होऊन तिला

भेटला ! आणि ही गोष्ट कांहीं लांबची नाहीं. नुकती परवां घडली ! आणि शनवारवाड्यापासून हाकेच्या आंतल्या अंबरखान्यांतचं ना ? ती गोष्ट तुमच्याही कानावर आलीच असेल. मग तुम्ही विश्वास ठेवा अगर न ठेवा, तो तुमच्या मनाचा धर्म आहे !

**नाना:**—होय. ती गोष्ट मीं ऐकली आहे. पण त्याजबरोबर हेंही ऐकलं आहे कीं, हैबती एकदां त्याच्या बायकोला दिसला, पण तो दुसऱ्या कुणींही पाहिला नाहीं. फार काय पण तिलाही तो फिरून दिसला नाहीं. ती थट्टा नसेल कशावरून ?

**पार्व०:**—बरं हैबतीचं असो ! पण रत्नागिरीस नाईकांनीं कैदेतून सोडले हे जर खरे नव्हते, तर मग इतके सरदार अन् मानकरी खात्री करून घेतल्याशिवाय त्यांना कसे जाऊन मिळाले असते ? हैदरखाना-सारख्या शत्रूंचं मी नाहीं बोलत ! पण प्रत्यक्ष माझा दादा ! त्याला नसेल का कांहींच सत्याची चाड ? त्याचंही पत्र मला आलं. तो कशाला खोटं लिहील ? शिवाय, ज्यांनीं आपल्या हातानं त्यांच्या पायांतली बिडी काढली, ते रामचंद्र नाईक स्वतः आपण होऊन आले सांगायला ! तुम्हांला दुखवून त्यांना काय बरं मिळणार आहे ? नाईक आपल्या घराण्याचे जुने अभिमानी आहेत हें मीं तुम्हांला सांगायला पाहिजे असं नाहीं. माधवरावे[2] मरणाच्या दारीं टेकला, पण कर्जदार येऊन दाराशीं बसल्यानं त्याचा प्राण जातां जाईना. कष्ट होऊं लागले. तेव्हां नाईकांनींच नाहीं का आपण स्वतः कर्जरोखे लिहून देऊन माधवरावाला सोडविलं ? अशीं अशीं मातबर माणसं !

---

१ कोठार. २ थोरले माधवराव पेशवे.

तीं सर्व म्हणतात तें खोटं. आणि नाना–बोललें तर राग येऊं देऊं नका, पण सांगतें–तुम्ही मात्र म्हणतां तेवढं खरं ? असंच ना ?

**नानाः**—आपला युक्तिवाद बरोबर आहे. पण बाईसाहेब ! आमच्या सरदार–दरकदारांची गोष्ट कशाला सांगतां ? आमच्या सरदारांसारखे हरामखोर अलम दुनियेंत[1] सांपडणार नाहींत ! त्यांच्या घरबुडवेपणामुळं तर गोष्टी या थराला आल्या. रघुनाथरावदादा आग्या-वेताळ; आणि त्याच्या हातून सांडलेल्या रक्तमांसावर तहान भूक भागविणारीं पिशाचं म्हणजे आमचे हे सरदार लोक. यांना कलहा-शिवाय दुसरं कांहीं प्रिय नाहीं. पुरंदरेंचा[2] तह होऊन मोठं कारस्थान बंद पडलं, तेव्हां यांनीं काढलं उकरून हें ठेवणींतलं फर्माशीचं कारस्थान. तोतयाकडे गेलेल्या सरदारांची काय मोठी लायखी आणि अब्रू म्हणून मला त्यांचा दाखला देतां ? कोणी कसंही म्हणो. स्वतः आपल्या डोळ्यांनीं तोतयाला पाहून तो खोटा अशी खात्री करून घेतल्यावर, मी जर केवळ दुसऱ्याच्या अभिप्रायामुळं तोतया खरा मानूं लागलों तर धन्यच म्हणायची माझी !

**पार्व०:**—फिरून म्हणतें नाना, राग येऊं देऊं नका. पण याचंच नांव अभिमान !

**नानाः**—पण ही कांहीं लहानसहान बाब नव्हे कीं जींत मीं आपलं मत बाजूला ठेवून दुसऱ्याला खुष करण्याकरितां त्याच्या

---

१ साऱ्या जगांत.

२ मराठे व इंग्रज यांचें पहिलें युद्ध कांहीं वेळ या तहानें बंद पडलें होतें.

म्हणण्याप्रमाणं करावं! मग त्याला अभिमानाचं स्वरूप आलं तरी त्याची मला चिंता नाहीं.

**पार्व०:**—असंच जर आहे तर मग हा वादविवाद काढलांत तरी कशाला?

**नाना:**—बाईसाहेब, तुमच्या माझ्यांतला हा विरोध कांहींसा बिनतोड आहे खरा! परंतु माझं मत बाजूला ठेवावयाला फक्त आपण स्वत: तोतया पाहून खात्री करून खरा ठरविला असतात तरच गोष्ट निराळी!

**पार्व०:**—या गोष्टीला मीं कधीं नाहीं म्हटलं होतं बरं? आठवण करून सांगा, नाना. माधवराव होता तो तुमच्या सारखाच मताचा अभिमानी—कर्ता पेशवा! मी त्याच्या पुढं काय बोलूं? नारायणाच्या कारकीर्दीचा तसा शेवट झाला! रघुनाथरावदादा वडील; त्यांनीं गोष्ट मनावर घ्यायची. पण त्यांना झाली मुलीच्या लग्नाची घाई. त्यांना असं होऊन गेलं कीं अभद्र-दर्शनं[१] कपाळकरंटी मी. लग्नाच्या शुभ-मंगल प्रसंगाच्या आधीं माझी धिंडका घरांतून जाईल तर बरं. आणि घरांत ठेवायचीच झाली तर क्षेत्राला पाठवून तीर्थविधि[२] करवून तरी आणावी! त्यांच्या त्या खऱ्याखुऱ्या लगीनघाईपुढं माझं गाऱ्हाणं कोण आणणार मनाला? मीं तेव्हांच सांगितलं कीं तोतया पुण्याला आणा; चारचौघांसमक्ष परीक्षा होऊं द्या. त्याचा फडशा[३] करा; मग आहेच बसलेली मी वैधव्याच्या दारांत. सारंच खोटं ठरलं तर मग मीं नाहीं

१ अपशकुनी. २ केशवपन. विधवा स्त्रियांनीं केश ठेवणें हें महत्पाप होय अशी समजूत, अद्यापही थोडी बहुत आढळते. ३ निकाल.

म्हणून तरी काय होणार ? मग तेव्हां तसं कां नाहीं झालं? संशयाचं मूळच खणून निघालं असतं म्हणजे मग कशाला पडला असता हा इतका गोंधळ !

**नाना:**—आपण म्हणतां तें खरं आहे. पण–पण–( स्वगत ) तोतया बाईच्या दृष्टीस घालण्यांत काय अडचणी आहेत हें उघड बोलून काय उपयोग ? असो, तूर्त कशाला बोला ?

**पार्व०:**—नाना, कां, शंका कसली आली ?

**नाना:**—नाहीं, मीं म्हटलं तेंही झालं असतं. पण आतां बोलून काय उपयोग ? कारण इच्छा असली तरी तें हातीं राहिलेलें नाहीं. आतां लढाईपर्यंत मजल आलेली आहे. आपल्या होय ना म्हणण्यावर आम्हीं सर्व तंटा तोडायला तयार आहों अशी कबुली दिली तरी माझं कोण ऐकणार ? बोरघाटांत लवकरच लढाई जुंपेल असा रंग दिसतो. तोतयाचा जय होऊन तो आपल्याच पायानं पुण्याला आला तर आपल्या इच्छेप्रमाणं सरळच होईल.

**पार्व०:**—आणि तुमचा जय झाला तर ?—

**नाना:**—तरी मी असं परमेश्वर-स्मरण करून वचन देतों कीं, आपला स्वत:चा अभिप्राय बाजूस सारून, मी प्रथम त्याला आपल्या नजरेस घालीन आणि मगच त्याचं काय पारिपत्य व्हावयाचं असेल तें होईल.

**पार्व०:**—इतकं झालं तरी मी पुष्कळ म्हणतें.

**नाना:**—आपण दीन वचन बोललां म्हणजे मला फार दु:ख होतं. आपला अधिकार मला काय वाटेल ती आज्ञा करण्याचा आहे.

पण या एका बाबतींत आपल्याला अप्रिय अशा रीतीनं वागायचं माझ्या नशीबांत आलं आहे खरं. तथापि, आपणाला अप्रिय असं वागतांनाही 'ईश्वरा, मी सत्य स्मरूनच वागत आहें' अशी त्याची आठवण केल्याशिवाय मीं केव्हांही पुढें पाऊल टाकलेलं नाहीं. बरं मी येतों आतां.

**पार्व०:**—( डोळ्याला पाणी आणून ) ऋणानुबंध असेल तसं घडेल. मीही कधीं तुमच्या कारभाराला आडकाठी आणण्याच्या बुद्धीनें वागलें नाहीं यालाही ईश्वरच साक्ष.

( नाना व पार्वतीबाई जातात. )

---

**प्रश्नः**—( १ ) तोतयाच्या बंडाची हकीकत थोडक्यांत सांगा.

( २ ) रामचंद्र नाईक तोतयास सोडून देण्याचें कोणतें कारण सांगतो, व त्यास नाना फडणवीस काय उत्तर देतो ?

( ३ ) तोतया हाच भाऊसाहेब असें वाटण्यास पार्वतीबाईस काय कारण झालें ? तिला तोतया प्रत्यक्ष दाखविण्यास नाना फडणवीस कां कचरत होता ?

( ४ ) पार्वतीबाईशीं झालेल्या संवादांत नाना फडणवीस मुख्यतः कोणत्या मुद्यांवर भर देतो ? व त्यांचा उपयोग कितपत होतो ?

१३

# हिंदुस्थानचें नंदनवन काश्मीर

[ पुढील प्रवासवृत्त प्रि. गोविंद चिमणाजी भाटे यांच्या " माझा उत्तर हिंदुस्थानचा प्रवास " या पुस्तकांतील एका भागावरून संक्षेपरूपानें घेतलें आहे. उत्कृष्ट प्रवासवृत्तलेखक म्हणून प्रि. भाटे हे आतां सर्वांच्या परिचयाचे झाले आहेत. त्यांनीं आपले लेख प्रथम मासिक मनोरंजनांत प्रसिद्ध केले व नंतर ते पुस्तकरूपानें प्रकाशित केले. सर्वच पुस्तक फार मनोरंजक आहे. त्यांतल्यात्यांत काश्मीरच्या वर्णनांतील कोणता भाग सोडावा व कोणता ठेवावा हेंच कळेनासें होतें. यामुळें संक्षेपाचा पुष्कळ यत्न करूनही हा उतारा अमळ लांब झाला आहे. ]

काश्मीरच्या अपूर्व सृष्टिसौंदर्यावरून इंग्रज प्रवासी त्या प्रांताला हिंदुस्थानचें नंदनवन म्हणतात. पण काश्मीरचा हा लौकिक नवा नसून फार पुरातन काळापासून चालत आला आहे. 'राजतरंगिणी' या प्रख्यात संस्कृत इतिहासग्रंथांत या देशाची महती अशी वर्णिली आहे: "त्रैलोक्यामध्यें बहुरत्ना वसुंधरा ही प्रशंसनीय आहे; त्या पृथ्वीवर कुबेराची उत्तर दिशा अधिक प्रशंसनीय आहे; त्या उत्तर दिशेकडील हिमालय पर्वत हा विशेषच प्रशंसनीय आहे; व त्या हिमालयामधील काश्मीर देश तर सर्वांत प्रशंसनीय आहे." मोगल बादशहांच्या काळीं तर काश्मीर हें त्यांचें आरोग्यालयच होतें, असें म्हटलें तरी चालेल. जहांगीर बादशहाची शेवटची इच्छा "मला काश्मीर पाहिजे. दुसरें कांहीं नको," अशी होती ! असा अगदीं

प्राचीन काळापासून सृष्टिसौंदर्य, हवापाणी, फुलझाडें व फळझाडें यांकरितां नाणावलेला प्रदेश पाहण्याचा सुयोग आम्हांला येणार हें पाहून आमचीं मनें सुप्रसन्न झालीं, हें सांगण्याची जरूरी नाहीं.

आमचा "अटकेपार प्रवास" संपवून आम्ही रावळपिंडीला परत आलों. येथून काश्मीरचा प्रवास पायमार्गानेंच करावा लागतो. रावळपिंडीहून काश्मीरची राजधानी श्रीनगर १९६ मैल आहे. काश्मीरांतील सृष्टिसौंदर्य स्वस्थपणें पहावयाचें असेल तर स्वतंत्र टांगा करून जाणें इष्ट असा आम्हांस सल्ला मिळाला. व त्याप्रमाणें आम्हीं भाडें, जकातपट्टी वगैरेंसह पन्नास रुपयांस एक टांगा ठरविला.

आम्ही ता. २० मे १९१५ रोजीं रावळपिंडीहून निघालों. येथून सुमारें पंधरा मैलपर्यंत रस्ता साधारण सपाटीचाच आहे. सोळाव्या मैलापासून थोडा चढाव लागूं लागतो. पण टेंकड्या फार उंच दिसत नाहींत. या लहान लहान टेंकड्यांचा वर वर जातां जातां प्रचंड हिमालय बनतो, आणि आपण आतां लहानसा चढाव व टेंकड्या चढत आहों, त्या चढत चढत आपणाला जगांतला एक मोठा पर्वत ओलांडून जावयाचें आहे याची कल्पनाही त्या वेळीं होत नाहीं.

दोनचार मैल चढून गेल्यानंतर छत्तर म्हणून एक खेडें लागलें. तेथें आम्हीं रात्रभर विश्रांति घेतली, व पुनः पहांटे पांच वाजल्यापासून प्रवासास सुरवात केली. येथून चढाव बराच कठीण आहे,

---

१ अलीकडे अर्थातच टांग्यांऐवजीं हा सर्व प्रवास मोटारीनें होऊं लागला आहे.

म्हणून घोड्यांस मधून मधून विश्रांति द्यावी लागते; रावळपिंडीच्या बाजूला प्रथम लागणाऱ्या टेंकड्यांवर फारसें रान नाहीं. पण आमच्या सकाळच्या कार्यक्रमणांत जिकडे तिकडे दाट झाडी व रान दृग्गोचर होत होतें.

सकाळच्या साडेसाताच्या सुमारास आम्ही ट्रेट या ठिकाणीं आलों. हें एक विश्रांतीचें ठिकाण आहे. येथपर्यंतचा चढाव साधारणतः सह्याद्रीच्या चढावासारखाच दिसला. झाडेंझुडपेंही इकडच्या सारखींच दिसतात. पण ट्रेट सोडून वर जाऊं लागलों म्हणजे वनसौंदर्य सर्व बदलतें. पूर्वीं कधींही न पाहिलेल्या पाईन व देवदार या प्रचंड व उंच झाडांचें रान लागतें. हीं झाडें सरळ सोटासारखीं वाढतात, व यांना बारीक बारीक पानें असतात. यामुळें कांहीं अंशीं हे वृक्ष सुरूच्या झाडांसारखे दिसतात; पण सुरूच्या झाडांहून पुष्कळ जाड, उंच व भव्य असतात. झाडें निराळीं तशी डोंगराची जमीन, खडक यांचा रंगही निराळा, असा नाटकांतील देखावा एकदम बदलल्याप्रमाणें भास होतो. जागोजाग पाण्याचे झरे असून पाणीसुद्धां स्फटिकवत् स्वच्छ व गार असावयाचें.

आम्ही आतां सारखे वर चढत होतों. आतां हा चढाव चढला म्हणजे आपण माथ्यावर येऊं असें वाटावें; तो चढून वर जावें तों त्याच्यापुढें आणखीही प्रचंड चढाव आहेच! मला सह्याद्रीचा पुष्कळ परिचय. माझ्या लहानपणापासून मी बैलगाडीचा पुष्कळ प्रवास केलेला, व डोंगरावर डोंगर कसे सारखे चढत जातात याची मला बरीच कल्पना; तरी पण माझी सुद्धां या चढावांनीं फसगत होई. ज्यांना बैलगाडीनें घाट चढण्याचा अनुभव मुळींच नाहीं, त्यांना या मार्गानें

गेल्यास काय वाटेल याची मला कल्पनाही होत नाहीं ! हा पर्वत अगदीं अनंत आहे असेंच त्यांना वाटेल यांत शंका नाहीं.

अकरा वाजण्याचे सुमारास कोडागल्ली या गांवीं मुक्काम करून आम्हीं विश्रांति घेतली. व फिरून दोन वाजतां पुढें चालू झालों. अजून आम्ही वर चढतच होतों. डोंगरावर जिकडे तिकडे पाण्याचे पाटच्या पाट चालू असल्यामुळें इतक्या उंचीवर सुद्धां लहान शेतें दृष्टीस पडतात. येथला देखावा किंचित् रत्नागिरी—कोंकणांतल्या पाखाड्यांतल्यासारखा दिसतो. येथली मातीही तांबडीच आहे व डोंगराच्या उतारावरच ताली घालून लहान लहान सपाट पट्टे तयार करून भातशेतें तयार केलेलीं दृष्टीस पडतात.

अशी अपूर्व शोभा पहात आम्ही एकदाचे मरी या ठिकाणीं आलों. पंजाब सरकारचें हेंच उन्हाळ्याचें शीतल वसतिस्थान आहे. हें समुद्रसपाटीपासून साडेसात हजार फूट उंच आहे, व म्हणून मरीची चढण सरतां सरत नाहीं.

मरीपासून मात्र मनुष्य उतरण उतरूं लागतो, व हिमालयाचा दक्षिण भाग ओलांडून उत्तरभागांत प्रवेश करतो. हिमालयांतील विलक्षण वनश्रीला येथूनच खरी सुरवात होते. हा हिमालय किती रुंद रुंद पसरत गेला आहे याची कल्पना आमच्या मार्गक्रमणावरून वाचकांना येईल. जिकडे तिकडे पावसाळ्यासारखी वनशोभा भर उन्हाळ्यांत दिसते. कारण या प्रांतांत बहुधा बारा महिने थोडा फार पाऊस पडतो, व उन्हाळ्यांत हिमालयांतील बर्फ वितळूं लागल्यामुळें भर मे महिन्यांत नदीनाले पाण्यानें भरून जातात. रस्ते व जमीन

अगदीं कोरडी; सूर्यप्रकाश अगदीं उन्हाळ्यासारखा; कोठेंही चिखल अगर राड नाहीं; तरीपण जिकडे तिकडे हिरवी गार जमीन व शेतें, हा देखावा खरोखरीच प्रथमतः मनुष्याला आश्चर्यचकित करून सोडतो.

यापुढील आमचा मुक्काम फुगवाडी येथें झाला. हें ठिकाण मरीपासून १२ मैल आहे. दुसऱ्या दिवशीं पहांटे प्रवासाला फिरून सुरवात झाली. आदल्या दिवशीं आम्ही वर वर चढत असतां स्वर्गापर्यंत चाललों कीं काय असा भास होत होता, तर आतां खोल खोल पाताळापर्यंत उतरत जातों कीं काय, असा भास होत होता. फुगवाडी सोडल्यापासून लवकरच प्रचंड खोल अशा दरींत अगदीं झऱ्यासारखी एक नदी दिसूं लागली. हीच झेलम नदी होय, व आतां हिच्याच कांठाकांठानें आपला पुढील सर्व रस्ता आहे असें टांगेवाल्यानें आम्हांस सांगितलें. झेलम नदीचें प्रथम दर्शन आम्हांला झेलम स्टेशनावर लाहोराहून कँबेलपूरला जातांना झालें होतें. त्या वेळीं ती नदी समुद्रासारखी दिसत होती! यावेळीं ती किती तरी सूक्ष्म दिसत होती. कारण हजारों फूट उंच अशा पर्वतराजीवरून आम्हांस ती दिसत होती. जसजसे आम्ही खालीं येऊं लागलों तसतशी झेलम नदी स्पष्ट दिसूं लागली, व तिचा प्रचंड वेग व खळखळ आवाज दिसूं व ऐकूं येऊं लागला.

एकीकडे प्रचंड पर्वत तर एकीकडे खोल दरी व तिच्या तळाशीं प्रचंड वेगानें वाहणारी ती नदी! खंडाळा घाटांतील रिव्हर्सिंग स्टेशन[1] टाकून जरा पुढें गेल्यानंतर जसा देखावा दिसतो, तसाच येथेंही देखावा दिसतो. टांगा भराभर डोंगर उतरून खालीं खालीं जातो व नदीच्या अगदीं जवळ येतो. ती प्रचंड तटासारखी नदीची दुथड पाहून

१ हें स्टेशन अलीकडे काढून टाकलें आहे.

मनुष्याला भय वाटल्यावांचून राहात नाहीं. जरा का गाडीचें चाक उजव्या हाताला घसरलें कीं बघावयालाच नको! एकदम 'नद्यस्तृप्यंतु' ची पाळी यावयाची! इतका डोंगर सुळक्याचा असतो, व वाट इतकी बिकट वाटते. शेवटीं अगदीं नदीकिनाऱ्याला खेटून सडक जाऊं लागते, व झेलम नदीचें तें अरुंद पात्र, तिचा तो वेग व किंचित् धूसर पाणी पाहून मनाला एक प्रकारचा विलक्षण आनंद होतो, तोंच टांगा कोहाला गांवाला येऊन ठेपतो.

झेलम नदी हीच पंजाब व काश्मीर संस्थान यांमधील मर्यादा आहे. झेलम नदीवरील पूल ओलांडून पलीकडे गेलें कीं डाक्टरी तपासणी होते, व तसेंच माणसावर, टांग्यावर व व्यापारी मालावर कर द्यावा लागतो. कोहाला हा गांव नदी व पर्वत यांच्या अगदीं चिळणींत आहे. मरीपासून उतरत उतरत आलेल्या माणसाला येथें खोल भुयारांत येऊन पडल्यासारखें वाटतें. तरी हें ठिकाण समुद्र-सपाटीपासून दोन हजार फूट उंचीवर आहे. येथून आतां झेलम नदी सारखी डाव्या हाताला राहाते, व रस्ता व नदी यांची फारशी ताटातूट होत नाहीं. केव्हां केव्हां युरोपियन युवयुवतींप्रमाणें रस्ता व नदी जणुं कांहीं हातांत हात घालून चालल्यासारखीं भासतात, तर केव्हां नदी रुसून रस्त्यापासून दूर अगदीं दिसेनाशी होते. मग रस्ता जणुं काय अस्वस्थ होऊन धडाधड उड्या मारीत व सांदीकोंदींतून झपाझप पावलें टाकीत, नदी असेल त्या कोंपऱ्यांत येऊन तिला आलिंगन देतो कीं काय असा भास होतो. हा सर्व मार्ग भयंकर दऱ्याखोऱ्यांतून व प्रचंड पहाडांच्या चिळणींतून गेला आहे, तरी तो निर्जन मात्र नाहीं. वाटोवाट खेडीं व वसती लागते, व सर्व

डोंगरभर शेती केलेली दिसते. शिवाय वसतीची दुसरी खूण म्हणजे जेथें जेथें पाण्याचे पाट वाहातात तेथें तेथें दळणाच्या लहान पाण-चक्या असतात.

कोहाल्यापासून पुनः चढाव लागतो. तेथून छत्तर व तेथून डुमेल या गांवीं आम्ही थोडे थांबलों. डुमेल येथें किशनगंगा व झेलम यांचा संगम फार रमणीय आहे. येथून पुढील रान फार दाट असून बर्फानें आच्छादलेल्या हिमालयाचीं शिखरें मधून मधून डोकावूं लागतात. नदीचा प्रवाह फार खोलांतून जातो यामुळें तिला मिळणारे नाले व ओढेही फार खोल असतात. हे ओढे ओलांडण्याकरितां नदीजवळ पूल करणें शक्य नसल्यामुळें रस्ता पाहाडांत खोल खोल जाऊन मग तेथें पूल ओलांडून दुसऱ्या बाजूला जातो.

रावळपिंडी सोडल्यापासून तिसरे दिवशीं आम्ही उरी या गांवीं पोहोंचलों. हें गांव समुद्रसपाटीपासून ४५०० फूट उंचीवर असून बरेंच मोठें आहे. उरीच्या आसपास जी ऐसपैस सपाटी आहे तिचा वचपा काढण्यासाठींच कीं काय उरी टाकल्यावर वितस्ता (झेलम) नदी पुनः भयंकर पहाडाचा भेद करून आली आहे, असें दिसूं लागतें. दोन्ही बाजूंला सात सात हजार फूट उंच असलेले कडे असून त्या अत्यंत चिंचोळ्या दरींतून नदीला जावें लागल्यामुळें ती चवताळलेल्या वाघिणीप्रमाणें डुरकण्या फोडीत व उड्या घेत जाते. अशा या निबिड दरींत **महोरा** म्हणून काश्मीर राज्यांतलें वीज उत्पन्न करण्याचें स्टेशन लागतें. अशा या भयंकर दरींत एका लहानशा दुकानांत विजेचा दिवा पाहिला म्हणजे विलक्षण अचंबा वाटतो, व अर्वाचीन सुधारणा व तिनें उत्पन्न केलेल्या सुखसोयी

यांचा कोठें कोठें शिरकाव झाला आहे हें पाहून मन एक प्रकारें थक्क होतें. ही दरी आतां संपेल, मग संपेल असा कित्येक वेळां भास होई पण कित्येक वेळेला आमची फसगत होई. शेवटीं आम्ही बऱ्याच उंच अशा टेंकड्यांच्या बाजूकडे वळलों, व आतां पुढें रस्ता नाहीं असें आम्हांस वाटलें, तोंच त्या टेंकड्यांचा भेद करून नदी चालली आहे व तिच्याच कडेनें रस्ता चालला आहे असें आम्हांला आढळून आलें. जणुं काय दारासारखा असलेला हा भाग मागें टाकून आम्ही आंत पाऊल टाकतों, तों, वितस्तेचें पात्र केवढें तरी प्रशस्त व शांत झालेलें दृग्गोचर होऊन आमच्या समोर सपाटच्या सपाट भूमिभाग दिसूं लागला. तेव्हां हाच काश्मीरचा सपाट प्रदेश अशी आम्हांला प्रचीति आली.

**बारामुळा** गांवाला "काश्मीरचें द्वार" म्हणतात तें यथार्थ आहे. हें शहर झेलम नदीच्या कांठींच वसलेलें आहे. येथपासून **श्रीनगरला** जावयाला दोन मार्ग आहेत—एक खुष्कीचा व दुसरा जलमार्ग. बारामुळा येथें नावेंत बसलें कीं थेट श्रीनगरला जातां येतें. बारामुळापासून दहाबारा मैलांवर ही नदी वूलर नांवाच्या सरोवराला मिळते. या सरोवराचा परिघ तीस मैलांचा असून हिंदुस्थानांत येवढें मोठें सरोवर दुसरें नाहीं. येथील देखावा फारच रमणीय आहे. पण या मार्गानें श्रीनगरला पोंचण्यास तीन दिवस लागतात. आम्ही खुष्कीच्या मार्गानें गेलों. या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पॉप्लर (यांना इकडे सफेदा असें म्हणतात) नांवाचीं झाडें सारखीं लावलेलीं आहेत. हें झाड पोफळीच्या झाडाप्रमाणें अगदीं सरळ वाढत जातें, व याची साल पांढरी शुभ्र असते. दहाबारा फूट उंचीपर्यंत याला पानें नसतात. तेथून वर खांद्या व पानें सुरूच्या झाडाप्रमाणें बुंध्याला

चिकटून वरवर जातात. हा वृक्ष उंच सरळसोट ५० ते १०० फूटपर्यंत वाढत जातो. काश्मीरांत प्रथम प्रवेश करणाराला या रस्त्याची शोभा अदृष्टपूर्व होय यांत शंका नाहीं. ता. २४ मे रोजीं आम्ही बारामुळा येथें पोंचलों होतों. तेथून श्रीनगर चवतीस मैल, म्हणजे टांग्याचा सुमारें पांच तासांचा प्रवास होता. तो २५ तारखेस सकाळींच करून आम्ही श्रीनगरास पोंचलों.

## भाग २ रा

श्रीनगरास आम्ही विजेच्या खात्याचे एंजिनियर श्री. बोस या नांवाचे बंगाली गृहस्थ आहेत त्यांचे येथें उतरलों. आमचा काश्मीरांत किती दिवस राहण्याचा बेत आहे, याबद्दल त्यांनीं विचारपूस केली, तेव्हां सात आठ दिवसांपेक्षां जास्त राहण्यास आम्हांस सवड नाहीं असें आम्हीं सांगितलें. तेव्हां ते मोठ्या आश्चर्यानें उद्गारले, "काय म्हणतां ? इतक्या लांबच्या पल्ल्यावर इतका खर्च करून तुम्ही आलां, आणि सात आठ दिवसच येथें मुक्काम करणार ? येथें येणारे लोक निदान दीड दोन महिने तरी मुक्काम केल्याशिवाय परत जात नाहींत. शिवाय काश्मीर हा एक मोठा प्रांत आहे. यामध्यें किती तरी सुंदर सरोवरें आहेत; किती तरी वनश्रीनें भरलेलीं दऱ्याखोरीं आहेत; आठदहा हजार फुटांच्या वर असलेल्या पुष्पवाटिका व शीतल निवासस्थानें आहेत; यापैकीं तुम्ही सातआठ दिवसांत काय काय पहाणार ?"

हें बाबू महाशयांचें भाषण ऐकून आम्हांला थोडेंसें वाईटच वाटलें. काश्मीरप्रांत वनश्रीचें माहेरघर हें समजूनच आम्ही येथें आलों. पण तो प्रांत निवळ झटकाफटकी पहावयासही महिना पंधरा दिवस

पुरणार नाहींत असें दिसून आलें. पण वाईट वाटून उपयोग काय ? जास्त राहण्यास तर आम्हांस सवड नव्हती. तेव्हां आहे त्यांत जितकें पाहून घेतां येईल तितकें घ्यावयाचें असा आम्हीं निश्चय केला. प्रथम श्रीनगर व त्याच्या आसपासचीं स्थानें पहावयाचीं, व नंतर बाहेरील कांहीं स्थळें पहावीं असा आम्हीं कार्यक्रम ठरविला.

काश्मीर हा हिमालयवलयांकित असा एक सपाट प्रदेश आहे. हा सुमारें ऐंशी मैल लांब व तीस मैल रुंद आहे. या सपाट पट्टींतून झेलम नदी वाहात जाऊन बारामुळा येथें हिमालय फोडून पंजाबांत उतरली आहे. या पट्टीच्या सरासरी मध्यावर श्रीनगर वसलें आहे.

काश्मीरला ज्याप्रमाणें हिंदुस्थानचें नंदनवन म्हणतात त्याप्रमाणें यूरोपीय लोक श्रीनगरला **व्हेनिस** नगरीची उपमा देतात. या दोन शहरांत पुष्कळ बाबतींत वैषम्य आहे. पण एका बाबतींत मात्र विलक्षण साम्य आहे. व्हेनिस शहर हें समुद्राच्या कांठीं एका मोठ्या नदीच्या मुखाशीं सांचलेल्या गाळाच्या जमिनीवर वसलें आहे, व त्याचे निरनिराळे टापू अथवा बेटें झालीं आहेत, आणि मध्यें मध्यें पाणी व पाण्याचे पाट आहेत. ग्रांदेकनाल या मुख्य कालव्यानें व्हेनिस शहराचे दोन भाग झालेले असून, या कालव्याला अनेक पाट काढले आहेत. यामुळें या शहराला जिकडे तिकडे कालवेच कालवे असून या कालव्यांचा रस्त्याप्रमाणें उपयोग होतो. ज्याप्रमाणें इतर शहरांत गाड्या, तांगे, ट्रॅम वगैरे दळणवळणाचीं साधनें आहेत, त्याप्रमाणें व्हेनिसमध्यें गॉंडोला नांवाच्या होड्या, जॉलि बोटी, आगबोटी हीं वाहनें आहेत. श्रीनगरची स्थिति अशीच आहे.



चित्र ९—श्रीनगर शहराचें प्रवेशद्वार

हें शहर झेलम नदीच्या तीरावर सुमारें तीन मैल असें दुतर्फा वसलेलें आहे. शहराच्या उत्तरेला अर्धा एक मैलावर 'डाल' नांवाचा मोठा सुंदर तलाव आहे, तो एका काल्व्यानें झेलमला जोडला आहे. तसेंच बऱ्याच मैलांवर 'मानसबल' म्हणून एक सरोवर आहे, तेंही एका काल्व्यानें झेलमशीं जोडलेलें आहे. आणखी शहराच्या खालीं दूधगंगा नांवाची नदी झेलमला येऊन मिळाली आहे. शिवाय, झेलम नदीला पूर येऊन शहरांतील घरांत पाणी शिरतें त्याचा बंदोबस्त करण्या-करितां शहराच्या वरच्या बाजूला झेलम नदीचा एक मोठा पाट काढून तो अर्धवर्तुलाकार घेऊन शहराच्या मधोमध नदींत मिळवून पुन: दुसऱ्या बाजूला काढून शेवटीं शहराच्या खालीं नदींत मिळविला आहे. या नागमोडी काल्व्याच्या योगानें झेलम नदी आडव्या पडलेल्या 'क' सारखी दिसते, व शहरांतील घरें याच्या आसपास वसलेलीं आहेत. यामुळें शहरांतील कोणत्याही ठिकाणापासून नदी अगर कालवा आठदहा मिनिटांच्या चालीच्या आंत आहे. अर्थात् शहरांत निरनिराळ्या ठिकाणीं जावयाचें मुख्य वाहन होड्या होत. अशा हजारों होड्या श्रीनगर शहरांत आहेत. यांना इकडे 'शिकारा' म्हणतात.

श्रीनगरांत पोंचलों त्या दिवशीं दुपारीं आम्हीं रेशमाचा कारखाना व जुम्मा मशीद हीं पाहिलीं. संस्थानचा हा रेशमाचा कारखाना फार मोठा आहे व त्यापासून दहाबारा लक्षांचें उत्पन्न होतें असें आम्हांस समजलें. जुम्मा मशीद श्रीनगरच्या जुन्या वस्तीच्या अगदीं मध्यें आहे. नदीचा पूल ओलांडून पलीकडे जावें लागतें. येथें आम्हांला जुन्या काशीची आठवण झाली. रस्ते अगदीं बोळकंडी वजा; एक टांगादेखील जाण्याची मुष्कील. बोळ आडवे तिडवेही फार होते. घरेंही अगदीं

भिकार व गलिच्छ असून जिकडे तिकडे रस्त्यावर केरकचरा व घाण पडलेली होती.

वाटेनें दृष्टीला पडलेले लोकही बरेच गलिच्छ दिसले. येथें बहुतेक मुसलमानांचीच वसती आहे. मधून मधून मुसलमानांसारखाच पोशाख केलेले पण गंधावरून हिंदू ओळखतां येण्यासारखे पंडित ( ब्राह्मण ) दृग्गोचर होत होते. शहराचा हा गलिच्छ भाग पाहून नंदनवनांतही उकिरड्याच्या जागा असतात, असें वाटलें. सौंदर्यानें ओतप्रोत भरलेल्या या प्रांतांत मनुष्य आपल्या आळसानें व अज्ञानानें नंदन-वनालासुद्धां नरकतुल्य करूं शकतो हें पाहून मनास उद्वेग वाटला. एवढ्या सुंदर प्रदेशांत इतकें गलिच्छ शहर, हा विरोध मनांत सारखा घोळत होता. या गलिच्छ भागांतसुद्धां विजेचे दिवे दृष्टीस पडत होते, या गोष्टीचा आम्हांस चमत्कार वाटला. पण येथें विजेचे दिवे राकेलच्या दिव्यापेक्षां स्वस्त पडतात व म्हणूनच गरीबगुरीब सुद्धां वापरतात असें आम्हांस समजलें.

शेवटीं एकदांची जुम्मा मशीद आली. येथील सर्व काम लांकडी आहे हा एक या मशिदीचा विशेष आहे. इमारत फार उंच आहे. लांकडी खांबांची रांगच फार भव्य दिसते. वर छतही लांकडीच असून नक्षीकाम फार सुंदर आहे. खांबाची उंची पाहून मात्र मनुष्य अगदीं थक्क होतो. ह्यांची उंची पन्नास फुटांवर असावी. हे खांब झाडांच्या एकाच सबंध खोडाचे आहेत, यावरून हिमालयांतील झाडांच्या प्रचंडपणाची कल्पना येते.

हारबानूचा तलाव श्रीनगरच्या उत्तरेस ११ मैलांवर आहे. याच्या

तीनही बाजूंना प्रचंड पर्वत आहेत; ते इतके उंच आहेत कीं, डोंगरांच्या घळींत मे महिन्यांत सुद्धां बर्फ दृग्गोचर होत होतें. तीन बाजूंना स्वाभाविक भिंती असल्यामुळें फक्त दक्षिणेच्या बाजूला बंधारा बांधावा लागला आहे. या तलावांत डोंगरावरील बर्फाचें वितळलेलें पाणी सांठतें. येथूनच शहरांत नळाचें पाणी आणिलेलें आहे. बंधाऱ्यावर जिकडे तिकडे कलमी गुलबांची रांगची रांग लावून दिली आहे. सर्व गुलाब या वेळीं फुलांनीं फुललेले होते. फुलें हाताच्या बचके येवढीं मोठीं असून त्यांचा रंग, कोमलपणा व सतेजपणा हीं प्रेक्षणीय होतीं. काश्मीर देशाला "गुलाबाची भूमि" म्हणतात, त्याची यथार्थता माझ्या ध्यानांत आली. कारण येथें रानटी व कलमी गुलाब रानोमाळ आहेत. गुलाबांचींच कुंपणें, गुलाबांचेच ताटवे व कमामी रानोमाळ दृष्टीस पडतात.

श्रीनगरचा विशेष म्हणजे तेथल्या बागा होत. त्यांपैकीं 'शालीमार,' 'निशात,' व 'चश्मशाई' या विशेष प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं यावेळीं पहिल्या दोनच आम्हीं पाहिल्या. प्रथम शालीमार बागेकडे गेलों. बागेचें प्रवेशद्वार व भिंत हीं पाहून तिजबद्दल फारसा अनुकूल ग्रह होत नाहीं. पण बागेची एक एक मजगी चढून जसजसें आंत जावें तसतशी तिची रचना, सौंदर्य व तींतील सुखसोयी यांची साक्ष मनाला पटत जाते. हिच्या एकावर एक अशा चार मजगी आहेत. बागेच्या मधोमध प्रत्येक मजगींत एक एक तलाव असून सर्व तलाव पाटानें जोडलेले आहेत, व कारंजांची रांगची रांग लागलेली आहे. या तलावाला हारबान् तलावाचें पाणी आणलेलें असून तें सर्व बागभर खेळविलेलें आहे. या पाण्याचे एका तलावांतून दुसऱ्या तलावांत

पडणारे लहान लहान धबधबे केलेले असून शेवटीं सर्व पाणी डाल तलावांत सोडून दिलेलें आहे. चवथ्या मजगीवर ६५ फूट लांबरुंद असा एक सुंदर चबुतरा असून त्यावर दगडी मंडप उभारलेला आहे. सभोंवार पाण्याची पुष्करणी असून तींत एकंदर १४० कारंजीं आहेत. हीं सर्व कारंजीं चालू झालीं म्हणजे फारच अद्वितीय शोभा दिसते. अशा बगीच्यामुळेंच या शहराला नंदनवनाची उपमा प्राप्त झाली आहे. येथें 'चिनार' झाडें पुष्कळच आहेत. हें झाड मूळ पर्शियांतून मोंगल लोकांनीं आणलें असें म्हणतात. त्याचा प्रचंडपणा, गर्द सावली व पानांचा नाजूकपणा व सतेजता या गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज समजणें शक्य नाहीं. पर्शियन भाषेंत सुंदर स्त्रीच्या नाजूक हाताला चिनारच्या पानाची उपमा देतात ती यथार्थ आहे असें वाटलें.

ही बाग जहांगीर बादशहानें इ. स. १६१९ सालीं तयार करविली व पुढें शहाजहानाच्या कारकीर्दींत ती आणखी वाढविण्यांत आली. ही बाग डाल सरोवराच्या एका सुंदर कालव्यानें जोडलेली आहे. यामुळें श्रीनगरहून शिकाऱ्यांत बसून जलमार्गानेंही या बागेंत जातां येतें.

निशात बगीचा शालीमारच्या अलीकडे दोन मैलांवर आहे. ह्या बागेचें प्रवेशद्वार अधिक मनोहर आहे, व ही डाल सरोवराच्या अगदीं नजीक असल्यामुळें येथून त्या सरोवराचा देखावाही अधिक रमणीय दिसतो. शालीमारला चार मजगी आहेत तर निशातला सात मजगी आहेत. शेवटची मजगी फारच उंच असून तिच्या मागें हजारों फूट उंचीचे कडे आहेत. यामुळें येथून सभोंवारचा देखावा फार विस्तृत व विविध दिसतो. बागेंत दोन मंडप आहेत. दोन्ही मंडप दुमजली असून त्यांचें सर्व काम लांकडी नक्षीचें आहे.

जहांगीरची राणी नूरजहान इचा भाऊ आसफखान यानें ही बाग बांधविली व येथेंच तो राहात असे. असें सांगतात कीं, शहाजहान बादशहाला ही बाग पाहून शालीमारपेक्षां ही सरस आहे असें वाटलें. व ती आसफखानानें आपल्याला द्यावी असें त्यानें अप्रत्यक्षरीत्या सुचविलें. पण आसफखान मुग्धच राहिला. तेव्हां बादशहानें रागावून 'शालीमार बागेंतून दुसऱ्या कोणत्याही बगीचांत पाणी जाऊं नये' असा हुकूम सोडला. त्यामुळें निशात बाग सुकून गेला. ह्याचें आसफखानाला फारच दुःख झालें. हें पाहून एका नौकराला त्याची कींव आली व त्यानें शालीमार बागेंतून येणाऱ्या पाटाचा दट्टया काढून टाकून पाणी बागेंत सोडून दिलें. हें पाहून आसफखान फार घाबरून गेला. पण त्या नौकराची ही स्वामिभक्ति पाहून शहाजहान बादशहा मात्र खुष झाला, व त्यानें आसफखानावरील राग विसरून बगीच्यांतील पाणी पूर्ववत् सोडण्याचा हुकूम दिला.

डाल सरोवराच्या दरवाज्यावर जणूं काय जयविजयांप्रमाणें हरिपर्वत व शंकरपर्वत म्हणून दोन टेंकड्या आहेत. त्यांपैकीं अधिक उंच असलेल्या शंकरपर्वताची सफर करण्याचें आम्हीं ठरविलें. शंकरपर्वतास दुसरें मुसलमानी नांव 'तक्त–इ–सुलेमान' असें आहे. ही टेंकडी श्रीनगरच्या ईशान्येला आहे. ती श्रीनगरच्या वर एक हजार फूटच आहे खरी, पण तिची समुद्रसपाटीपासून ६२०० फूट उंची आहे, म्हणजे नैनीताल या शीतलनिवासस्थाना इतकीच आहे.

या टेंकडीचा चढाव उभा व बिकट आहे. माथ्यावर श्रीशंकराचें देवालय आहे. तें हिरवट काळसर दगडाचें बांधलेलें आहे. तें फार मोठें नाहीं, पण काम सुबक आहे. शंकराची पिंडी जवळ जवळ

कमरेइतकी उंच असून ती काळ्या दगडाची आहे. देवळाच्या तटावरून दिसणारा देखावा अवर्णनीय आहे यांत संशय नाहीं. उत्तरेस व दक्षिणेस बर्फानें आच्छादिलेल्या डोंगरांचीं पांढरीं शुभ्र शिखरें दिसत होतीं. व मध्यें काश्मीरच्या सपाट खोऱ्याची लांबच लांब पट्टी हिरवीगार दिसत होती. झेलम नदीचीं नागमोडीसारखीं वांकणें (आम्हांला येथून कमींतकमी सात नागमोडी स्पष्ट दिसत होत्या) फार प्रेक्षणीय होतीं.

नंतर आम्हीं एक शिकारा करून डालसरोवरांतून चश्मशाही या बागेची सफर केली. कांहीं वेळ कालव्यांतून गेल्यावर आम्ही डाल-सरोवराच्या दरवाज्यापाशीं आलों. येथें पाण्याला फार ओढ असते. येथें होड्या उलट्यापालट्या होऊं नयेत व प्रवाहाच्या उलट वल्हवतांना मदत व्हावी म्हणून दरवाज्याच्या दोन्ही बाजूंला साखळदंड लावले आहेत. यांना धरून होडी सरोवरांत आली. सरोवराचें पाणी फार स्वच्छ असून निळसर रंगाचें आहे. झेलम व तिच्या कालव्याचें पाणी धूसर रंगाचें आहे, यामुळें येथल्या दोन पाण्यांचा भेद प्रयाग येथील गंगायमुना यांच्या पाण्याच्या भेदाप्रमाणें भासतो.

सरोवरांत दोन लहान बेटें आहेत. एका बेटावर काश्मीरच्या महाराजांच्या गुरूचा स्वतंत्र बंगला आहे. तलावाच्या बाजूबाजूला तरत्या बागा आहेत. अशा बागा आम्हीं आजन्मांत पाहिल्या नव्हत्या. तलावाच्या उथळ भागावर लव्हाळे, लांब पसरणाऱ्या वेली वगैरेंच्या जुड्या आंथरतात, त्यावर गवत पसरतात, व मग त्यावर माती पसरून त्यांत कलिंगडें, काकड्या, अगर फुलझाडें लावतात. पाणी अत्यंत संथ असल्यामुळेंच अशा बागा येथें होऊं शकतात.

तलावांत कांहीं वेळ फिरून मग आम्हीं चश्मशाही बागेंत प्रवेश केला. ही बाग शालीमार किंवा निशात बाग यांच्या इतकी मोठी नाहीं, व तितक्या चांगल्या स्थितींत ठेवलेली नाहीं. पण इची प्रसिद्धि तेथील स्वाभाविक झऱ्याकरितां आहे. 'चश्मशाही' याचा शब्दार्थच मुळीं **बादशाही झरा** असा आहे !

या झऱ्याच्या तीनही बाजूंला दुमजली लांकडी इमारत असून खालच्या मजल्यांत तीन बाजूंना बसण्यास ओटे केलेले आहेत. झऱ्याचें पाणी चांगलें मांडीभर उंच उडत होतें. पाणी स्फटिकासारखें शुभ्र व निर्मळ असून बर्फासारखें गार होतें, व तें पितांना हें खरोखरच अमृत आहे कीं काय असा भास झाला. हें अतिशय पाचक असून कित्येक दिवसांचा अपचनविकार याच्या सेवनानें नाहींसा होतो असें एका गृहस्थांनीं आम्हांस सांगितलें.

## भाग ३ रा

आमच्या प्रवासांतील एका उद्दिष्ट स्थलाचें दर्शन आतां घ्यावयाचें राहिलें होतें. तें म्हणजे झेलमनदीचें ( वेदांतील वितस्तेचें ) उगम-स्थान होय.

श्रीनगरपासून आम्ही टांग्यानें पहांटेसच निघालों. रस्ता चांगला व सपाट आहे. सुमारें पांच तासांनीं आम्ही अनंतनाग ( इस्लामाबाद ) येथें पोंचलों. हें शहर काश्मीरांत श्रीनगरच्या खालोखाल आहे. येथें एक प्रसिद्ध झरा असून त्याला ४० फूट औरस चौरस असें कुंड बांधलेलें आहे. याला हिंदुलोक तीर्थस्थानच मानतात. पाणी डाल

सरोवराप्रमाणेंच निळसर व स्वच्छ असून त्यांत पुष्कळ मोठमोठे निळे मासे आहेत. येथून जवळच एक गार गंधकाचा झरा आहे, तोही आम्हीं पाहिला.

अनंतनाग सोडल्यापासून सपाटीचा रस्ता संपत चालला. आतां काश्मीरचें सपाट खोरें संपून आम्ही दक्षिण हिमालयाच्या हिमाच्छादित पर्वताकडे चाललों होतों. हळूहळू आम्ही व्हरनाग गांवाकडे येऊं लागलों असें स्पष्ट दिसूं लागलें. कारण आम्ही डोंगराच्या पायथ्याशीं येऊं लागलों होतों. श्रीनगरपासून अनंतनागपर्यंत झेलममधून नावा चालतात. आतां मात्र ती एखाद्या ओढ्याप्रमाणें दिसूं लागली. व्हरनागच्या अलीकडे नदी ओलांडावी लागते. येथें ती गोट्यांनीं भरलेली असून पात्र फार रुंद पण उथळ आहे.

रात्रभर व्हरनाग येथील पोस्ट आफिसांत मुक्काम केला, व सकाळीं ज्या मोठ्या झऱ्यापासून झेलम नदीचा उगम झाला आहे तो झरा व त्या शेजारची बाग पाहण्यास आम्ही गेलों. येथला देखावा खरोखरच अद्वितीय आहे. आधींच व्हरनाग हें गांव 'पीरपंजाल' नांवाच्या पर्वतराजीच्या दुबेळक्यांत वसलेलें आहे. हे सर्व पर्वत झाडींनें आच्छादिलेले आहेत. व्हरनागचा झरा अशा एका उंच व छायायुक्त टेंकडीच्या पायथ्याशीं आहे. डोंगरांतून झरा धो धो करीत वाहात आहे. या सुंदर ठिकाणीं जहांगीर बादशहानें एक अष्टकोनी पुष्करणी बांधविली (इ. स. १६१२), व त्याच्याच हुकमानें पुढें येथें एक सुंदर बगीचा बनविण्यांत आला. हा बाग निशात किंवा शालीमार इतका मोठा नाहीं; पण जिवंत झऱ्याची शोभा, व एकंदर सृष्टिसौंदर्य यांत पूर्वोक्त बागेपेक्षां किती तरी पटीनें अधिक आहेत. या पुष्करणी



चित्र १२—मार्तंड मंदिराचे अवशेष

भोंवतीं ओऱ्यासारखी अष्टकोनाकृति कमानदार इमारत असून तिच्या भिंतीवर दोन पर्शियन भाषेंतील शिलालेख आहेत. यांपैकीं एका लेखाचें भाषांतर पुढें दिलें आहे:—

"धर्मयोद्धा महाराज अकबर याचा पुत्र, सप्तद्वीपाधिपति, न्याय-प्रसारक, राजाधिराज, वीरपिता, धर्मप्रकाश महाराज जहांगीर यांनीं (आपल्या) राज्यारोहणाच्या पंधराव्या वर्षीं या विपुलतायुक्त झऱ्यावर उतरून त्याला मान दिला! हजरतांच्या हुकमानें या मंदिरास पूर्ण स्वरूप आलें. अकबरशहाच्या जहांगीरशहामुळें या मंदिराचें शिर गगन (भेदून) वर चढलें....व्हरनागच्या कालव्यावरील राजमहालाची समृद्धि असो!" (सन १६१९)

हें ठिकाण मुसलमान बादशहांचें विलासस्थान असावें असें उघड दिसतें. पण येथें सुद्धां एका ओरींत हिंदू देवाची मूर्ति असून येथले लोक या ठिकाणाला मोठें तीर्थ मानतात, व भाविक हिंदूंकडून येथें पैसे उकळण्यांत येतात.

ही बाग पाहून झाल्यावर काश्मीरांतील मार्तंडाचें (सूर्याचें) प्रसिद्ध देवालय पाहण्यास गेलों. हें ठिकाण अनंतनागपासून पांचसहा मैलावर आहे. जातांना आम्हांला एक पठार चढून जावें लागलें. हे पठार (काश्मीरी भाषेंत यांना केरवा म्हणतात) फार सुपीक असतात. जिकडे तिकडे पाणीच पाणी व सुंदर शेतें दिसत होतीं. या सर्व पठारांवर लीडर या नांवाच्या नदीचें पाणी खेळविलें आहे.

*दुपारीं अडीच वाजण्याच्या सुमारास आम्ही मार्तंडाच्या देवळाजवळ* पोंचलों. देऊळ एका टेंकडीच्या पायथ्याशीं असून आसपास झाडें-

झुडपें किंवा वसती मुळींच नाहीं. अशा या निर्जन व निर्वन स्थळीं हें देऊळ कां बांधण्यांत आलें याचें आम्हांला आश्चर्य वाटलें. पण असेंही मनांत आलें कीं जुन्या काळीं कदाचित् येथें मोठें शहरही असेल. मात्र काळाच्या सपाट्यानें किंवा भूकंपासारख्या अनर्थानें शहर गडप होऊन गेलें असेल; किंवा धर्मवेडानें या शहराचा व देवळाचा नाश केला असेल. पंजाबांतील विद्यापीठाचा असाच नायनाट होऊन अर्वाचीन काळीं तेथील सर्व डोंगरांत गडद झालेल्या इमारती उकरून काढाव्या लागल्या. त्याच प्रकारचें स्थित्यंतर येथेंही झालें असावें.

हे विचार मनांत येत आहेत तोंच आम्ही देवळाच्या प्रवेशद्वाराजवळ पोंचलों. त्या द्वाराचें तें प्रचंड काम आणि त्यावरील नक्षीचें व मूर्तींचें काम पाहून आम्ही थक्कच झालों. प्रवेशद्वाराचे आंत एक खुलें असें प्रशस्त पटांगण लागलें. त्याच्या मधोमध सूर्याचें देऊळ व गाभारा होता. पटांगणाभोंवतीं सर्व दगडी बांधकामाच्या व खिडक्यांच्या ओऱ्यावजा इमारती होत्या. देवळाचा गाभारा कांहीं फार मोठा नाहीं; पण त्याला जोडून दोन्ही बाजूंनीं इमारती बांधल्यामुळें त्याला भव्यता आलेली आहे. देवळाच्या बाहेरच्या चौकाला दर्शनी खांब व कमानी यांची रांगच्या रांगच आहे, व त्यांची संख्या चवऱ्यांशी आहे.

या देवळाच्या शिल्प कामाची तारीफ सर्व ललितकलाभिज्ञांनीं केली आहे. हें निदान हजार वर्षांचें जुनें असून रामादित्य नांवाच्या काश्मीरच्या हिंदु राजानें बांधलें असावें असें म्हणतात.

याप्रमाणें आम्हीं काश्मीरांत पाहिलेल्या स्थळांचें अल्प वर्णन आहे.

यापुढें जास्त अवकाश नसल्यानें मोठ्या कष्टानें या नंदनवनाचा निरोप घेऊन आम्हांला स्वदेशीं परत जावें लागलें.

---

**प्रश्नः**—( १ ) काश्मीरच्या भूभागाचें स्वरूप स्थूलमानानें वर्णन करा. नंदनवनाशीं काश्मीरची तुलना कां करण्यांत येते ?

( २ ) झेलम नदीचें, उगमापासून ती पंजाबच्या सपाट प्रदेशांत उतरेपर्यंत थोडक्यांत वर्णन द्या.

( ३ ) काश्मीरांतील कोणकोणत्या दर्शनीय स्थळांचें वर्णन प्रस्तुत लेखांत आलें आहे ? त्यांपैकीं सर्वांत उत्तम असें तुम्हांस कोणतें स्थल वाटतें ? व कां वाटतें ?

( ४ ) मोगल बादशहांनीं काश्मीरांत आपलीं कोणतीं स्मारकें ठेविलीं आहेत ? प्राचीन इमारतींच्या अवशेषांपैकीं कोणतें स्थळ महत्वाचें आहे ?

# पद्यविभाग

## १

## ईशवंदना

हे प्रभो विभो । अगाध किति तव करणी ।
मन चिंतुनि हो रत चरणीं ॥ ध्रु० ॥

चांदवा नभाचा केला । रविचंद्र लटकती त्याला ।
जणुं झुंबर सुबक छताला । मग अंथरली ही धरणी ॥ १ ॥

बाहुलीं मनुष्यें केलीं । त्यां अनेक रूपें दिधलीं ।
परि सूत्रें त्यांचीं सगळीं । हालविसी अपुल्या हातीं ॥ २ ॥

**श्री. कृ. कोल्हटकर**

नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्री-पति हरी, ॥
हरी जो तापातें उचलुनि कृपा-सिंधु-लहरी; ॥
हरी वाटे काळा करिस, विपती मृत्यु-भुजगा ॥
जगाचा तूं ऐसा धनि कवण तो पाव मज गा ! ॥

**वामन पंडित**

२

# स्फुट अभंग

(१) संतांचीये गांवीं प्रेमाचा सुकाळ ।
नाहीं तळमळ दुःखलेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होऊनी याचक ।
घालीतील भीक तेची मज ॥ २ ॥
संतांचीये गांवीं वरो भांडवल ।
अवघा विठ्ठल धनवित्त ॥ ३ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान ।
करीती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संतांचा उदीम अमृताची पेठ ।
प्रेमसुखसाठ देती घेती ॥ ५ ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी ।
म्हणोनी भिकारी झालों त्यांचा ॥ ६ ॥

(२) आशा हे समूळ खाणोनी काढावी ।
तेव्हांची गोसावी व्हावें तेणें ॥ १ ॥
नाहीं तरी सुखें असावें संसारीं ।
फजिती दुसरी करूं नये ॥ २ ॥
आशा मारूनीयां जयवंत व्हावें ।
तेव्हांची निघावें सर्वांतोनी ॥ ३ ॥

तुका म्हणे जरी योगाची तातडी ।
आशेची बींबुडी करीं आधीं ॥ ४ ॥

( ३ ) काय वानूं आतां न पुरे हे वाणी ।
मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥

थोरीव सांडीली आपली परीसें ।
नेणे शिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥

जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति ।
देह कष्टवीती उपकारें ॥ ३ ॥

भूतांची दया हें भांडवल संतां ।
आपल्या ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥

तुका म्हणे सुख पराचीया सुखें ।
अमृत हें मुखें स्त्रवतसे ॥ ५ ॥

( ४ ) साखरेच्या गोण्या बैलाचीये पाठीं ।
तयासी शेवटीं करबाडें ॥ १ ॥

मालाचे पैं पेटे वाहताती उंटें ।
तयालागी कांटे भक्षावया ॥ २ ॥

वाऊगा हा धंदा आशा वाढवीती ।
बांधोनीयां घेती यमाहातीं ॥ ३ ॥

ज्यासी असे लाभ तोची जाणे गोडी ।
येर तीं बापडीं शिणलीं वायां ॥ ४ ॥

तुका म्हणे शाहाणा होईं रे गव्हारा ।
चौऱ्यांयशीचा फेरा फिरूं नको ॥ ५ ॥

( ५ ) मोलें घातलें रडाया । नाहीं आसूं आणि माया ॥ १ ॥
तैसा भक्तिवाद काय । रंग बेगडीचा न्याय ॥ २ ॥
वेठीं धरल्या दावी भाव । मागें पळावया पाव ॥ ३ ॥
काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे नलगे वाती ॥ ४ ॥

( ६ ) कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनी पाहे ॥ १ ॥
तैसें झालें माझ्या जीवा । कधीं भेटशी केशवा ॥ २ ॥
चुकलीया माये । बाळ हुरुहुरु पाहे ॥ ३ ॥
जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥

( ७ ) जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी ।
मृत्यूचीये भेटी जवळी आली ॥ १ ॥
आतां माझ्या मना होईं सावधान ।
हे पुण्याची जाण कार्यसिद्धि ॥ २ ॥
शेवटील घडी बुडतां नलगे वेळ ।
साधावा तो काळ जवळीं आला ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंती कुळींची देवता ।
वाराया भोंवता शब्द मिथ्या ॥ ४ ॥

( ८ ) जाऊनीयां तीर्थां काय तुवां केलें ।
चर्म प्रक्षाळिलें वरीवरी ॥ १ ॥
अंतरींचें शुद्ध कासयानें झालें ।
भूषण त्वां केलें आपणया ॥ २ ॥
वृंदावन फळ घोळीलें साखरा ।
भीतरील थारा मोडेचीना ॥ ३ ॥

तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया ।
तोंवरी कासया फुंदां तुम्ही ॥ ४ ॥

( ९ ) हीन माझी याती । वरी स्तुति केली संतीं ॥ १ ॥
अंगीं वसूं पाहे गर्व । माझें हरावया सर्व ॥ २ ॥
मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥ ३ ॥
राख राख गेलों वायां । तुका म्हणे पंढरीराया ॥ ४ ॥

(१०) भला देवा कुणबी झालों । नाहीं तरी दंभें असतों मेलों ॥१॥
भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥ २ ॥
विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥ ३ ॥
सेवा चुकतों संतांची । नागवण हे फुकाची ॥ ४ ॥
गर्वें होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥ ५ ॥
तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥ ६ ॥

(११) रासभ धुतला महातीर्थामाजी ।
नव्हे जैसा तेजी श्यामकर्ण ॥ १ ॥
तेवीं खळा काय केला उपदेश ।
नव्हेची मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥
सर्पासी पाजीलें शर्करापीयूष ।
अंतरींचें वीष जाऊं नेणे ॥ ३ ॥
तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन ।
सर्वेंची वमन जेवीं तया ॥ ४ ॥

(१२) नरस्तुति आणि कथेचा विकरा ।
हें नको दातारा घडों देऊं ॥ १ ॥

ऐसीये कृपेची भाकीतों करुणा ।
आहेसी तूं राणा उदारांचा ॥ २ ॥
भूतांचा मत्सर आणि संतनिंदा ।
हें नको गोविंदा घडों देऊं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझ्या पायांचा विसर ।
नको वारंवार पडों देऊं ॥ ४ ॥

(१३) हेंची दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी । हेची माझी सर्व जोडी ॥ २ ॥
नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देईं सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥

तुकाराम

---

## ३

# यक्षमंदिर

[ महाकवि कालिदास याचें "मेघदूत" हें छोटेखानी काव्य संस्कृत वाङ्मयांत अत्यंत प्रसिद्ध आहे. त्याचें सुंदर मराठी भाषांतर कै. वा. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं केलें आहे. त्यांतून पुढील उतारा घेतला आहे. एका यक्षाच्या हातून कांहीं अपराध घडला, म्हणून यक्षांचा राजा कुबेर यानें "एक वर्षपर्यंत तुला पत्नीवियोग घडेल" असा त्याला शाप दिला. तेव्हां पृथ्वीवर **रामगिरी** ( कदाचित् हें आपल्या मध्यप्रांतांतील रामटेकच असावें, असें म्हणतात ) येथे एक आश्रम करून तो राहिला. पण त्याला पत्नीविरहानें फार दुःख होत होतें व आपल्या विरहानें ती साध्वीही झुरणीस लागली असेल असें वाटून, त्यानें

वर्षाकालच्या एका मेघाबरोबरच तिला आपल्या खुशालीचा संदेश पाठविला, असें या काव्यांत वर्णन आहे. अलकानगरीचा रस्ता प्रथम सांगून, व नंतर त्या नगरीचें वर्णन करून, मग यक्षानें स्वतःच्या घराचें वर्णन केलें. कालिदासाच्या कल्पनेची भरारी या अल्पशा वर्णनांत देखील वाचकांस पहावयास सांपडेल. ]

## साक्या

१ त्या नगरींत धनेशगृहाच्या उत्तरेस दिसतें जें
दुरूनि सुंदर मंदिर मोठें, तेंचि जाण घर माझें;
२ नानारत्नीं खचित जयाचें द्वार उंच बहु साजे,
अपूर्व शोभा पाहुनि ज्याची इंद्रचापही लाजे.
३ असे जवळ त्या एक नवीनचि कल्पवृक्ष सुकुमार,
थोर फुलांचे गुच्छ येउनी जो लवलासे फार;
४ प्रिया करांनीं नित्य घालुनी पाणी सायंकाळीं
अति कनवाळूपणें जयाला मुलासारखा पाळी.
५ आहे सुंदर तळेंहि तेथें लहानसें, ज्या माजीं
नित्य शोभती बहुत फुलोनी सुवर्णकमळें ताजीं.
६ पाचेच्या पायऱ्या सभोंतीं असति ज्यांत उतराया
जयांत नेमस्तचि जळ असतें क्रीडा स्त्रीस कराया.
७ वर्षाकालहि येतां तेथें हंस सुखें वसताती,
जवळहि असतां मानस तिकडे कधींहि ते नच जाती!
८ त्याच तळ्याच्या कांठीं आहे क्रीडापर्वत, ज्याचें
नीळमण्यांचें चमके सुंदर उंच शिखर तें साचें;

९ ज्याच्या भोंतीं सुवर्ण कदली झळकति चित्रविचित्रा,
विजेसहित तुज देखुनि मजला आठवतो तो मित्रा !

१० मध्यें मंडप मधुमालतिचा, गुलाब शोभति भोंतीं,
काय वर्णुं तीं सुखें, त्या स्थलीं जीं अनुभविलीं होतीं !

११ त्या कुंजाच्या जवळ बकुळिचा एक सुबक तरु आहे,
तसा तांबडा अशोक तेथें चंचलपल्लव पाहे.

१२ असे मांडला पाच-मण्यांचा पिंजरा तेथें थोर
बसे त्यामध्यें कनकयष्टिवर रात्रीं अमुचा मोर;

१३ प्राणांची मम धनीन शिकवी नाचायास जयातें
रक्तकंकणीं युक्त करांनीं धरूनियां तालातें.

१४ ऐशीं जेथें सकल लक्षणें मित्रा तुज दिसतील
ज्याच्या द्वारीं शंखपद्मही लिहिलेले असतील;

१५ तेंच आमुचें गृह, नसल्यानें मी जें उदास भासे;
सहस्त्ररश्मी गगनीं नसतां कैसें कमळ विकासे ?

---

## ४

# अन्योक्तिकलाप

[ अन्योक्ति–दुसऱ्यास अगर दुसऱ्याविषयीं बोललेले शब्द–असा याचा शब्दशः अर्थ आहे. 'लेकी बोले सुने लागे' या म्हणीप्रमाणें एकाला उद्देशून बोलावयाचें पण त्याचा अर्थ मात्र दुसऱ्यासच लागू पडावयाचा, ही एक बोलण्याची खुबीदार पद्धति आहे. खालील श्लोकांत कधीं पोपटास, कधीं

हत्तीस, कधीं सिंहास उद्देशून कवि बोलत आहे असें भासतें. पण खरा अर्थ कोणास उद्देशून आहे हें चाणाक्ष वाचक तेव्हांच शोधून काढतील. ]

१ तुझी वाणी कोणी म्हणति गुण हा अद्भुत असे,
मला वाटे मोठा तुजजवळि हा दोषचि वसे ।
शुका ! तीच्या योगें सतत पिंजऱ्यामाजि पडशी,
गड्या ! स्वातंत्र्याचीं अनुपम सुखें सर्व मुकशी ॥

२ कंठीं मोठा बळकट असे पाश, पायांत बेडी,
बैसोनीयां शिरिं नर तुझ्या अंकुशें गंड फोडी; ।
जीपेक्षां कीं मरण बरवें भासतें त्या दशेतें
पावोनीयां अजुनिहि गजा ! दाविशी कां मदातें ? ॥

३ दावाग्नी खवळोनियां तरुवरा जाळीतसे जैं बळें,
जाती सर्व पळोनि कोकिळ शिखी रावे तसे कावळे, ।
भक्षायास फळें चहोंकडुनियां एकत्र जे जाहले;
येतां संकटकाळ होय जवळी ऐसा न कोणी मिळे. ॥

४ वनीं विलसती बहू विविध वृक्ष चोहींकडे
तयांत मज चंदनासम न एकही सांपडे ।
जयास न दिलीं फळें न कुसुमेंहि देवें जरी,
शरीर झिजवूनि तो परि परोपकारा करी ॥

५ मेघांच्या गर्जनेनें खवळुनि वरती सिंह पाही स्वभावें
काका ! त्वां भीति सारी त्यजुनि तरुवरी मांसखंडासि खावें; ।
जो उन्मत्तां गजांच्या खरतर नखरीं फोडुनी मस्तकातें
घाला रक्ता पिऊनी, नच मृत पशुच्या इच्छितो तो कणातें ॥

६ देखोनी उदया तुझ्या द्विजकुलें गाती अती हर्षुनी,
शार्दूलादिक सर्व दुष्ट दडती गिर्यन्तरीं जाउनी; ।
देशी ताप परी जसा वरिवरी येशी नभीं, भास्करा !
अत्युच्चीं पदिं थोरही बिघडती, हा बोल आहे खरा ॥

७ ज्या कांहीं तेज नाहीं, परम कृशहि जो त्या बिजेच्या शशीला,
मोठ्या यत्नें पहाया झटति, बघुनियां वंदिती लोक त्याला; ।
वाढे तेजें कलांहीं पुढति बहु जरी, मान तो त्या न राहे,
वस्तू वाटे नवी जों अवड बहु तिची, लोकरीती अशी हे. ॥

८ गर्वें पर्वतमस्तकीं जलधरा ! धारा वृथा वर्षसी,
पीडा कष्ट करूनि नाविकजनां दुष्टापरी हर्षसी; ।
पाण्यावीण लता तरू सुकति हे, वृष्टी जरी यांवरी,
रे मेघा ! करितास, कीर्ति भुवनीं होती तुझी बा तरी ! ॥

९ आहे एक सुगंध मात्र जवळी तों त्यास राखावया,
ऐसे घोर भुजंग पाळिशि, जना जे धांवती खावया; ।
येतीं गोड फळें, फुलेंहि बरवीं दैवें तुला चंदना !
त्यांच्या बा, करितास काय न कळे संरक्षणा योजना ! ॥

१० दलां सर्वां कांटे असति, मधुचा लेशहि नसे,
उडोनी नेत्रांतें रज बहुत पीडा करितसे; ।
तुझ्या पुष्पीं ऐसे अवगुण असोनी भ्रमर हा
कसा एक्या गंधें भुलुनि पडला केतकि ! पहा. ॥

११ होता जोंवरि अंबरीं तपत तो चंडांशु तेजें निजें,
झाला निष्प्रभ तारकाधिपतिही बोला कशाला दुजें ?

राहूच्या वदनीं अजी गवसतां तो भानु दैवें अहा !
कैसे क्षुद्रहि काजवे चमकती त्याच्यापुढें, हे पहा ! ॥

१२ ज्याचे पल्लव मंगलप्रद, शिणा छाया जयाची हरी,
गंधें युक्त फुलें फळेंहि असती ज्याचीं सुधेच्या परी; ।
वाटे जो रमणीय भूषण वनश्रीचे मुखींचें, भला
आम्रा त्या पिक सेवितां समसमां संयोग कीं जाहला. ॥

१३ उडत उडत जातां हंस तो मानसींचा,
मरु-जनपद मार्गीं लागला त्यास साचा; ।
सरस कमलतंतू राहिले दूर भारी,
श्रम करुनि मिळेना बापुड्या कूपवारी ॥

१४ गर्वें गर्जसि बहु परि जिणें तुझें व्यर्थ भासतें मजला,
त्वत्तीरीं तान्हेला जन शोधी कूप टाकुनी तुजला ! ॥

१५ माझी शक्ति अपूर्व, बाग अवघा तोडोनि म्यां टाकिला,
ऐसें मानुनि हर्ष फार तुजला चित्तीं खरा वाटला; ।
ग्रीष्मीं तीव्र रवी तपोनि करितां अंगीं तुझ्या काहिली,
ती पीडा टळण्यास कोणति तुवां युक्ती गजा ! योजिली ! ॥

**कृष्णशास्त्री चिपळूणकर**

---

१ समुद्रास.

५

# ना कळे !

( पद )

ह्या जलांत लपल्या कमळा । मधु गंध कुणीं गे दिधला ? । ना कळे ॥ १ ॥
नाभींत मृगाच्या राही । कस्तुरी कशी ती बाई ? । ना कळे ॥ २ ॥
वेडावी कोकिलगान । मधुर कंठ देई कोण ? । ना कळे ॥ ३ ॥
दावुनी कृष्णमेघांना । नाचवी कोण मयुरांना ? । ना कळे ॥ ४ ॥
रवि चंद्र अखिल हे तारे । निर्मिले कुणीं जग सारें ? । ना कळे ॥५॥
हा देह—मी कशी झालें ? । कोठुनी भूवरी आलें ? । ना कळे ॥ ६ ॥
कोणाची होतें बाला । घातली कुणा कशि माला ? । ना कळे ॥ ७ ॥
'चालक तो देव जगाचा' । परि अर्थ मला 'देवाचा' । ना कळे ॥८॥
अज्ञान पुरी मी वेडी । सुटतील कशीं हीं कोडीं ? । ना कळे ॥ ९ ॥

सौ० लक्ष्मीबाई वेहेरे



चित्र १४—सौ० लक्ष्मीबाई बेहेरे

## ६

# महाराष्ट्रलक्ष्मी

(पद)

महाराष्ट्र लक्ष्मी मातें जगीं धन्य वाटे,
यशोगीत तीचें गातां मनीं हर्ष दाटे ॥ ध्रु० ॥
पुनः पुन्हा परचक्रानें ताडिली बिचारी,
दीर्घकाल खचली होती पारतंत्र्यभारीं,
द्वादशाब्द दुष्काळानें जाहली भिकारी,
संकटांत तीच म्हणोनी करी उंच माथें. ॥ १ ॥
मावळांत वास, न ठावें जयां बाह्य वारें,
नेमधर्म ज्यांचे लोकीं कृषीकर्म सारें,
विळा कोयतीच जयांचीं काय तीं हत्यारें,
तेच वीर बनले समयीं मावळे मराठे. ॥ २ ॥
नये नीट धरितां ज्याला लेखणी करांनीं,
कृपादृष्टि संपत्तीची न ज्याचे ठिकाणीं,
परी यवनसत्तेची जो करी धूळधाणी
कोण तया शिवरायाच्या पावला यशातें ? ॥ ३ ॥
साधुसंत झाले, असती, तयांची न वाण,
मात्र रामदासा लाधे समर्थाभिधान,
जो मनीं स्वदेशहिताचें धरोनी निशाण,
ध्वजा कौपिनाची मिरवी भारतांत थाटें. ॥ ४ ॥

कढी भात खाऊ म्हणती ब्राह्मणा जगांत,
ढिली कांस ज्यांची म्हणुनी हांसती, हंसोत;
तयांनींच करणी केली प्रसंगीं अचाट,
खोल गढे परसत्ता ती ढांसळली लाथें. ॥ ५ ॥
पूर्व दिव्य ज्यांचें, त्यांना रम्य भाविकाळ,
बोध हाच इतिहासाचा सदा सर्वकाळ,
कासया वहावी चिंता मनीं मग जहाल,
रात्र सरे तेव्हां उगवे दिनही पूर्व वाटें. ॥ ६ ॥

विनायक

---

७

## स्फुट श्लोक

[ प्राचीन काळीं भर्तृहरि म्हणून जो एक विद्वान् व वैराग्यशील राजा होऊन गेला त्याच्या "वैराग्यशतक" नामक ग्रंथाचें महाराष्ट्रीय कवि वामन पंडित यांनीं जें भाषांतर केलें आहे, त्यांतून पुढील श्लोक घेतले आहेत. मराठी पांचव्या व सहाव्या पुस्तकांत भर्तृहरीच्या "नीतिशतकांतील" श्लोकांचा नमुना आलाच आहे. ]

### पश्चात्ताप

१ म्यां साहिली खलजनोक्ति कठोर पाहीं
पोटांत दुःख वरचेवर हांसलोंही.
कीं प्रार्थिलें स्वजठरार्थ मदांध लोकां,
आशे ! अशीच मज नाचविशी किती कां ? ॥

२ कांहीं द्रव्य असेल कीं उकरिली म्यां या भ्रमें ही मही,
राजेही बहु सेविलेचि; गिरिचे म्यां जाळिले धातुही;
रात्रीं मंत्रजपें स्मशान धरिलें; पाथोधि उल्लंघिला;
झाली प्राप्त कपर्दिका न मज तों सोडीं दुराशे ! मला. ॥

३ दिसे ज्या प्राणांची स्थिति जलजपत्रोदक जसें
तयासाठीं केलें विविध बहु म्यां पातक असें;
पुढें द्रव्याढ्यांच्या प्रचुरधनलोभास्तव वृथा
विलज्जें म्यां केली बहुतर मृषात्मस्तुतिकथा. ॥

४ वदना रदनावलिनें त्यजिलें,
शिर सर्वहि शुभ्रपणें पिकलें;
उठतां बसतां अणु शक्ति नसे,
परि आस निरंतर गाजतसे. ॥

५ ते कंद काय अवघेचि गळोनि गेले ?
किंवा प्रवाह नदिचे अतिशुष्क झाले ?
कीं वाण आज विपिनीं तरुवल्कलांची ?
कां पाहताति वदनें न कळे खलांचीं ! ॥

## वैराग्याचें सुख

१ होती वासर दीर्घ जे धनपतिद्वारीं तयां प्रार्थितां,
नाना सौख्यभरें क्षणोपम मला जे लोटले नेणतां;
निःसंगत्वपणें धरोनि बसलों हे पर्वताची गुहा,
आतां त्या दिवसांसि हांसत असें ध्यानावसानीं पहा ! ॥

२ तूं राजा जरि मी श्रुतिस्मृतिमहाविद्याभिमानी असें,
भाग्यें विश्रुत तूं मदीय कवितासत्कीर्ति लोकीं वसे;
आहे अंतर फार तूज मज रे ! तूं गर्व जो दाविशी;
मीही निस्पृह, भाग्यवंतगणना नाहीं मला फारशी ! ॥

३ लक्ष्मीनें जरि तुष्ट तूं, बहुसुखी मी वल्कलानें असें,
दोघांचा परितोष तुल्य असतां आधिक्य कांहीं नसे;
आशा ज्यास दरिद्रि तोच समजें, नैराश्य पैं बाणतां
भाग्याचा नर कोणता मग बरें ? निर्भाग्य तो कोणता ? ॥

४ ज्यांचें पात्र पवित्र पाणियुग हें, भिक्षान्न जे भक्षिती,
ज्यांचें वस्त्र दिशा, जयां मल नसे, शय्या जयांची क्षिती;
ज्यांला दैन्य नसे, विरक्ति वनिता जे तीसवें नांदती;
ज्यांला कर्मकलाप बाधत नसे, ते धन्य येणें रितीं. ॥

५ हिमाचलशिलेवरी सुरनदीतटीं बैसुनी,
त्यजूनि जनसंगती सदृढबंध पद्मासनीं;
सुखें करुन डोलतां प्रचुर योगनिद्राभरें
कधीं डवचिती मला हरिणपोत शृंगांकुरें ? ॥

६ माते मेदिनि ! मारुता स्वजनका ! तेजा सख्या सोदरा !
तोया आणि नभा ! तुम्हां नमितसें जोडूनि भावें करा;
झालें ज्ञान भवत्कृपेस्तव मला; आतां पहा सत्वरीं,
ब्रह्मीं मी मिळतों, जलीं समरसें वर्षोत्पलांचे परी. ॥

भर्तृहरि—वामन पंडित

८

# दोन बाजी

( फटका )

( यांत पहिला व दुसरा बाजीराव पेशवे या दोघांची तुलना केली आहे. )

त्या शूरानें भगवा झेंडा हिंदुस्थानीं नाचविला,
निज राष्ट्राचें वैभव नेलें एकसारखें बढतीला;
जिकडे तिकडे समशेरीची कीर्ति अपुल्या गाजविली,
खूप शर्तिनें कदर आपली गनीमांस त्या लावियली,
आणि तुवां रे ? त्वां नीचानें पाठ आपली दावुनियां;
रणांतुनी पोबारा केला, शेपुट भ्याडा वळवुनियां !
गुणी जनांची पारख करुनि त्या धीरानें गौरविलें,
उत्साहाच्या वातें अपुल्या तेज तयांचें चेतविलें.
प्रतापदीपज्योति पोषिली सुजनस्नेहा वाढवुनी
गनीम मशकें कितीक गेलीं तिच्यामध्यें खाक् होवोनी.
आणिक तूं रे ? नाचलासि तूं नग्नच संगें अधमांचे !
धूळ खात गेलास लाविले सर्वत्र दिवे शेणाचे !
भटांस जे रणधुरंधर तयां पाचारुनि या सिंहानें
माराया कीं मरावया अरिवरि नेलें आवेशानें;
' हरहर ! ' शब्दा परिसुनि वळली कितिकांची घाबरगुंडी
' आला मराठा ! ' म्हणत पळाल्या सैरावैरा किति लंडी

तूंहि भटांला पाचारियलें–
काय त्यांसवें परि केलें ?
यथेच्छ लाडू मात्र झोडिले–नांव हायरे बुडवीलें.
घोड्यावरिचा हुरडा चोळित शत्रुशासना धांवोनी
तो गेला. तूं बिछान्यावरी राहिलास रे लोळोनी.
वीर भले खंबीर आणखी मुत्सद्दी ते सद्बुद्धी,
त्यांच्या साह्यें निज सत्तेची त्यानें केली रे वृद्धि.
या भटवंशीं महाप्रतापी ख्यात जाहले असूनियां
तुळशीमध्यें भांग निघाली अभद्र ऐशी कोठुनियां !
निजनामाचा 'गाजी' ऐसा अर्थ उरवुनी तो गेला
तर हळहळली आर्य माउली ऐकुनि त्याच्यां निधनाला !
मरणा आधिंच मरण आणुनि काळोखी निज राष्ट्राला,
तूं मेलासी करून 'पाजी' अहह पितामहनामाला !

**केशवसुत**

---

## ९

# कळ्यांचीं फुलें कशीं झालीं ?

[ मुलें नेहमीं हें कसें ? तें कसें ? असे प्रश्न विचारतात; कित्येक वेळां त्यांचें समाधान होण्यासारखें उत्तर त्या वेळीं देणें शक्य नसतें. मग कांहीं तरी मौजेचें उत्तर देऊन वडील माणसें त्यांची समजूत घालतात. अशा एका मौजेच्या प्रसंगानें सुंदर चित्र या छोटेखानी काव्यांत दिलेलें आहे.]

[ ला बाई ला० ही चाल—थोडा फेरफार करून ]

बाळ कुणी । संध्याकाळीं रमे गुणी ॥
खेळतसे । बाळ आंगणीं हवें तसें ॥
बागेंत । मौजेनें झोंके घेत ॥
तों दिसली । सुंदरशी त्याला वेली ॥
देंठ कोंवळे । हिरवे पिंवळे । नाजुक सगळे ॥
ती वेली । हिरवा शालू पांघरली ॥ १ ॥
परी तया । हवा सोबती खेळाया ॥
खेळगडी । मूल फूल सुंदर जोडी ॥
पाहतसे । परि वेलीला फूल नसे ॥
तिच्या कळ्या । होत्या मिटलेल्या सगळ्या ॥
जणु दमल्या । फार खेळुनी; मग निजल्या ॥
हवेंत झुलणें । हेंच खेळणें । खेळुनि निजणें ॥
ही त्यांची । गादी हिरव्या पानांची ॥ २ ॥
बाळ गुणी । वाइट वाटे फार मनीं ॥
दिवसभरी । खेळुनि आला परत घरीं ॥
झोंपेंत । कितिदां गेला बागेंत ॥
धीर कुठें । पहांट होतां बाळ उठे ॥
बागेंत । धांव तसाची तो घेत ॥
मौज तों किती । कळ्या न दिसती । फुलेंच हंसतीं ॥
बाळ डुले । चहूंकडे पाहून फुलें ॥ ३ ॥
आईला । शोधाया धांवत गेला ॥
मग बोले । आई, बघ हीं गोड फुलें ॥

काल कळ्या । आज फुलें झाल्या सगळ्या ॥
कशा उमलल्या । कुणीं हंसविल्या । हांसत बसल्या ॥
कशा कळ्या । आई, सांग मला सगळ्या ॥ ४ ॥
मग आई । बाळाला उत्तर देई ॥
" खेळासी । जमति चांदण्या आकाशीं ॥
त्या हंसती । चहूंकडे पाहत बसती ॥
तों दिसल्या । कळ्या बिचाऱ्या हिरमुसल्या ॥
कळवळल्या । फार चांदण्या मग रडल्या ॥
आंसूं पडले । ते दंव झाले । धांवत आले ॥
भुईवरी । पडले साऱ्या कळ्यांवरी ॥ ५ ॥
तो साचा । रंग पांढरा तारांचा ॥
कळ्यांवरी । चहूंकडे जाउनि पसरी ॥
मग हंसल्या । कळ्या फुलें हंसतां झाल्या " ॥
सर्व असें । आई बाळा सांगतसे ॥
ऐकुनि हें । बाळ तिच्या वदना पाहे ॥
कां न कळे । मिठी मारिली तिला बळें ॥
त्या काळीं । आई आनंदें हंसली ॥
हंसतां रडली । असवें पडलीं । त्याच्या गालीं ॥
तों साची । कळी उमलली बाळाची ॥ ६ ॥

**गोविंदाग्रज**

---

**प्रश्नः**—या कवितेंतील गोष्ट स्वतःच्या शब्दांत लिहा.

## १०

# स्मृति चित्र

[महाकवि भवभूति याच्या 'उत्तररामचरित' या नाटकांतील एका सुंदर श्लोकाचा आशय खालील पद्यांत कवीनें आणला आहे. श्रीरामचंद्र आपल्या पूर्वचरित्राचा चित्रपट सीतादेवीस दाखवून गतकालच्या सुखांची आठवण देत आहेत.]

(पद)

आठवतो का सांग सखे! तो काळ विवाहाचा? ।
बाळपणाचा, मुग्धपणाचा, निर्मल भावाचा ॥
संसाराचें चित्र चिमुकलें, चिमुकलेच जीव ।
फुललें नव्हतें हृदयांचेंही राजस राजीव! ॥
पाहात होते तात तदा त्या लीला बालांच्या ।
जणुं आठवती त्यांसहि लीला त्याच सुकालाच्या ॥
जपति परोपरि प्रसन्नहृदया पुण्यमया माता ।
गेले ते दिन सीते! या परि हा! बघतां बघतां ॥
बाळपणींचे प्रसंग जणुं ते घडति आज फिरुनी ।
चित्रपटा या अश्रुजलानें चल टाकूं धुवुनी ॥
तूं सीता ती; राम तोच मी; त्याच आज माता ।
परि जे गेले दिन ते आतां येतिल का हातां? ॥
कशासि आशा नसती आतां–झालें तें गेलें ।
सुकलें फूल न देत वास जरि अश्रूंनीं भिजलें! ॥

गोविंदाग्रज

# ११

# रुक्मिणी-विवाहकथा

[ पुढें दिलेलें आख्यान कविवर्य मोरोपंत यांच्या "कृष्णविजय" नामक ग्रंथांतून घेतलें आहे. एके प्रसंगीं यादव व कौरव कुळांतील स्त्रिया एका ठिकाणीं जमल्या होत्या. त्या वेळीं द्रौपदीनें अशी कल्पना काढली कीं, प्रत्येकीनें आपापल्या विवाहाची हकीकत स्वतः सांगावी. पहिली पाळी अर्थात् रुक्मिणीवर आली. ]

## गीतिच्छंद ( आर्या )

प्रथम म्हणे वैदर्भी, "बाई, होतें लहान मी कन्या ।
धन्या कृष्णकथा मज तेव्हांच रुचे; न आवडे अन्या ॥ १ ॥
भगवद्भक्त ब्राह्मण जे येती मत्पित्याचिया गेहा, ।
जें हारि हरियशोऽमृत पाजिति तें मात्र चालवी देहा. ॥ २ ॥
हरिगुणगायक सज्जन ते धनलोभी नव्हेत, परि हार, ।
मुद्रा, कंकण द्यावें; न करिति मातापिताहि परिहार. ॥ ३ ॥
ज्या दिवशीं हरिचरितश्रवण नसे त्यांत मज दहा दुखणीं, ।
दुखणी काय नवखणी माडी नलगे, धरा नखेंदु खणी. ॥ ४ ॥
श्रीकृष्णाला द्यावी श्रीरामा जानकी तशी दुहिता, ।
ऐशी गुरुबुद्धींनीं केली बाई! विचारणा सुहिता. ॥ ५ ॥
कृष्णीं माझें अर्पण चित्ता आलेंचि साधुभावांच्या, ।
कृष्णगुणीं श्रुत्यर्पण ये जेविं मनास सत्स्वभावांच्या. ॥ ६ ॥

रुक्मी माझा दादा जो आम्हां साजणांमधें मोठा, ।
खोटा नव्हेचि, परि हरिचरितरसीं तो भिजे न मणि गोटा. ॥ ७ ॥
त्या स्वगुरुविचारातें, निंदुनियां मोहरोगवैद्यातें, ।
मजला देऊं केलें दादानें हठ धरूनि चैद्यातें. ॥ ८ ॥
केला लग्नाचाही निश्चय, चैद्यासि धाडिलें मूळ, ।
गूळ क्ष्वेडचि वाटे मज, तातविचार होय पांगूळ. ॥ ९ ॥
न चले कांहीं तेथें जननीचें, बंधुचें, स्वतातार्चे! ।
होय लवांत दहादां फळ इष्ट अनिष्ट आत्मघाताचें. ॥ १० ॥
एक ब्राह्मण केवळ साधु दयामूर्ति तत्पदीं नमनें ।
केली पाय धरुनि म्यां, एकांतीं विनविला सुदीनमनें. ॥ ११ ॥
कां तो द्रवता माझा असता जरि भाव पाहिला खोटा? ।
जेणें अभयवर दिला, त्या गुरुहस्तांत म्यांहि लाखोटा. ॥ १२ ॥
स्वकरें वसंततिलकावृत्तें पत्रांत सात मोजूनी, ।
लिहिलीं होतीं तींही लिहितां लिहितां क्षणांत योजूनी. ॥ १३ ॥
गेला धांवत घेउनि मत्पत्र द्वारकेस सद्विप्र, ।
त्या प्रणतवत्सलाला आणाया आण घालुनि क्षिप्र. ॥ १४ ॥
तों आला शाल्व, मगधपतिसख तो चैद्य, मांडलें लग्न, ।
झालें पुर तद्बळजळनिधींत, आधींत मन्मनहि मग्न. ॥ १५ ॥
गरळविलेपन वाटे लाविति अंगास जी हरिद्रा तें, ।
सखि, सुकृपणकृत शुष्कोपचरण निवविल कसें दरिद्रातें. ॥ १६ ॥
शतदा ध्वजाचि झाल्यें प्रासादशिरीं पुरेक्षणछद्में, ।
द्वारवतीपथ पाहति नयनें, हरिदिङ्मुखा जशीं पद्में. ॥ १७ ॥

आली रात्रि सुगात्रि द्रौपदि ! अवकाश तीच लग्नासी ।
झाली यष्टी कष्टी जें मन त्या आधिभारभग्नासी. ॥ १८ ॥
चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहींच लागला डोळा, ।
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा ॥ १९ ॥
लावियला म्यां दुःखीं बाई ! त्या ईश्वरासही बोल, ।
यत्पदपद्मरजाचें चिंतामणिकोटिही नव्हे मोल. ॥ २० ॥
तों, 'प्रियकंठीं आपण पडोन हेही सुखांत पाडावी,' ।
या भावेंचि स्फुरली; करि माझी भुजलता कृपा डावी. ॥ २१ ॥
तोंचि समूळाधिज्वरहरमात्रा आणुनी उषःकाळीं, ।
आला द्विज धन्वंतरि, सदय पिताही तसा नसे बाळीं. ॥ २२ ॥
आधीं विप्रमुखश्री कळवी येतांचि माधवागमन ।
मग मुनि सांगत मज तो, ऊठ म्हणे, 'गुरुपदास लाग' मन ॥२३॥
विप्रें कथिलें मज कीं, 'वत्से ! लिहिलेसि उत्तम श्लोक ।
ज्यांच्या अर्थश्रवणें आला धांवोनि उत्तमश्लोक ! ' ॥ २४ ॥
अंबेच्या नमनाला न्यावी जीचा विवाह नवरी ती, ।
धरि हरि-शंका दादा, देवीयात्रा कुलीं, न नव रीति. ॥ २५ ॥
मग बाई ! दादाचे मागधशल्यादिकाहि मेल्यांचे ।
सैनिक मज रक्षाया आले, धाकें विरोनि गेल्यांचे. ॥ २६ ॥
स्वसखी धात्री जननी विप्रस्त्री मंडळी न, ती पेटी ! ।
तींत मणी मी, नेलें शुभविधिनें श्रीशिवेचिये भेटी ॥ २७ ॥
पूजुनि पाय विनविली; 'कन्यांतें प्रसवितात ज्या माता, ।
त्या लटक्या तूंचि खरी, तुज कृष्णचि योग्य होय जामाता.'' ॥ २८ ॥

पत्रीं लिहिलें होतें, 'देवीयात्रेंत मज पदें दावा, ।
दावा बहुतांसीं हा भाव कळों दुर्जनासि नेदावा.' ॥ २९ ॥
तों आला हरि, सुंदरि! जोडा नाहींच त्या महा, भागा ।
आपलिया घ्याया, ते कोल्हे वारिति कसे महाभागा? ॥ ३० ॥
माझा मूर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन, ।
दर्शन नयनें घेती, जैसें शिशिरीं दरिद्र घे ऊन ॥ ३१ ॥
तों आलि म्हणे मज, 'सखि! सुमनोमाळा वरा वहा यास, ।
हा या समयिं विधि, मग नित्य असेचि प्रिया पहायास' ॥ ३२ ॥
माळा ऊचलितां प्रिय आपणहि रथावरूनियां लवला, ।
लव लागेना तों घे अंकीं, करुणासमुद्र कालवला. ॥ ३३ ॥
हंसें मुक्ता नेली, मग केला कलकलाट काकांनीं, ।
हाकांनीं नभ भरलें, जाय सुरांच्याहि नाद हा कानीं. ॥ ३४ ॥
श्वगणांतूनि जसा हरि निजभागा हरि, तसाचि अतिधीर ।
अबळखळांतूनि प्रभु मजला घेऊनि जाय यदुवीर" ॥ ३५ ॥

**मोरोपंत**

---

## १२

# लेंकराची जिज्ञासा

[ हें काय? तें असें कां? असे प्रश्न विचारून मुलें बेजार करतात; त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन त्यांची जिज्ञासा तृप्त करणें यांत एक विलक्षण आनंद आहे, व हें काम मनापासून करणारा धन्य होय, असा पुढील कवितेचा सारांश आहे.]

ईषत्प्रफुल्ल सुमना करिं बाळगावें,
किंवा मृदुस्मित मुलाप्रति खेळवावें;
कीं तन्मनः-कुसुम रम्य करीं धरावें
उत्फुल्ल शिक्षणसुधाकिरणीं करावें. १

रेणूहुनीहि अतिसूक्ष्म बियांत राही,
विस्तीर्ण पिप्पल जयासम वृक्ष नाहीं;
या अल्प मुग्ध शिशुच्या लघुचेतसांत
नांदे तसाच गुणवृक्ष जया न अंत. २

हा बाळ पाहुन अनेकविधां पदार्थां,
नाचे, हसे, पुसतसे, वडिलांस अर्थां;
जिज्ञासु हा सकल विश्व शिकावयाला,
तो धन्य ! तो सुकृति ! जो शिकवील यांला. ३

ही अल्पशी निरखुनी हंसतो शलाका,
छायेस पाहुनि धरी मनिं फार धाका;
हा पाखरांसह करी मधु भाषणाला
तो धन्य ! तो सुकृति ! जो शिकवील याला. ४

गर्जे नभांत घन ऐकुनि बाळ नाचे,
'हें काय हो ?' पुसुनियां वडिलां सुवाचे;
"सासू तुझी दळप हें दळिते मुला रे !"
अव्याज तें मन गणीत खरेंच सारें. ५

"हें काय ?" देव वडिलें म्हणतात बाऊ
तें चित्त निर्मळ धरीत तसाच भावू;

वाढो सुबुद्धिलतिका, अथवा बिचारी
हो जीर्ण अंगिंच ! तरी न कुणी विचारी ! ६

हें फूल पाहत असे उमलावयाला,
हें चंद्रबिंब चढतें उदयाचलाला;
बाहेर अंकुर निघों बघतो द्रुमाचा,
होतो विकास शिशुच्या मृदु मानसाचा. ७

जो होउनी अनिल हें फुलवील फूल,
सारील दूर शशिचें घन मेघजाल;
कीं अंकुरास जल जो पुरवील माळी,
तो धन्य यत्करगता शिशुबुद्धि झाली. ८

सारें नवीन शिशुला बहु दर्शनीय,
त्या कौतुकास दुसरी सरि लोकिं काय ?
" हें काय हो ? " सतत हीच करीत पृच्छा
तो धन्य जो करिल पूर्ण तदीय इच्छा. ९

जरि असेल रसज्ञपणा पुरा,
जरि परोपकृतीच मनोहरा;
जरि असे चतुरत्व तरी मुला
शिकविण्यासम छंद नसे भला ! १०

ना. वा. टिळक

१३

# एक अमेरिकन मुलगी

( श्लोक )

पाठीवरी रुळति धूसर मुक्त बाल,
जैसे गुलाब फुलले दिसतात गाल;
विस्तीर्ण हें निढळ पानच केवड्याचें,
जेथें सुभाग्य मतिमत्व खुशाल नाचे. १

ह्या केवड्यावर अली बसले मधूम,
तैसेचि हे कुरळ शोभति दोन तीन;
ह्या रम्य वक्र भिंवया म्हणतात 'येथें
थारा नसे कृपण दीन मनोरथातें!' २

साधें प्रसन्न मधु बाल्य करी विहार
नेत्रांत, जें कारि तयाप्रति लोल फार;
रत्ना तुझें हरपलें जणु सर्व पाणी,
हीं रम्य दीर्घ नयनें गमतें बघोनी! ३

हें नेत्र सुंदर दिसे मज, चारुतेचें
सारल्य अग्रनतिमान अपूर्व ज्याचें,
सोत्कंठ नासिक हिचें म्हणतें जगाला,
आर्यान्वयोद्भव खरोखर रम्य बाला. ४

किंचित् प्रभातसमयीं कळिनें फुलावें,
कीं अंतरंग लपवून पुढें करावें;
हें हांसरें मुख हिचें करि तीच लीला,
दावी पुन्हां लपविते रदनावलीला. ५

आरक्त ओष्ठ जणु वेलच पोंवळ्यांचे,
तेही गमे विरमतील पुढें तयांचे;
किंचित् विभक्त दिसती, जणु सांगताती,
निश्चिंत निर्मळ सुखी किति बालवृत्ति ! ६

वाटे उषाच हंसते फिरते जगांत,
कीं स्फूर्ति हीच कविची मधुरूप घेत;
अव्याजता, रसिकता जणु मूल झाली !
स्वर्गांतुनी सहज भूवर आज आली ! ७

ना. वा. टिळक

---

१४

## तें गृह

( दिंड्या )

सर्व माझेपण एकवटे जेथें
जिथें प्रेमाचें राज्य सदाचें तें,

स्वार्थ कपटाचा लेश नसे जेथें,
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! १

जिथें नाहीं अभिमान कुणा ठावा,
एकमेकांची जिथें सौख्य सेवा;
जिथें परहित तें स्वहित मानवातें
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! २

भिन्न मूर्तीमधिं चित्त एक जेथें,
भोगि दुःखातें अनुभवी सुखातें,
स्वर्ग वाटे हा मर्त्य लोक जेथें !
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ३

मनाच्या ज्या अत्युच्च, रम्य वृत्ति
अंकुरित त्या होऊन वाढताती;
फुलें, सुफळें येतात त्यांस जेथें,
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ४

वीर, पंडित, कवि, संत, सती यांला
सिद्ध करुनी जें देतसे जगाला;
सर्व संसृतिचें मूळ नांव ज्यातें
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ५

ज्ञान अपुलें द्यावया मानवाला
स्वयें देवें स्थापिली पाठशाला;
दिलें त्यानें गृह नाम मुदा तीतें,
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ६

त्रिवर्गाचा सोपान सिद्ध केला
जगन्नाथें, तो दिला मानवाला;
देव मंदिर आपुलें गणी ज्यातें
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ७

**ना. वा. टिळक**

---

## १५

# भगवद्गीतेचा प्रारंभ

[ भारतीय युद्धाचे प्रारंभीं अर्जुनाला आपल्या आप्तेष्टांना पाहून मोह उत्पन्न झाला, व केवळ राज्यप्राप्तीसाठीं आपण आपल्या जवळच्या नातलगांना व भीष्मद्रोणादिक पूज्य गुरूंना मारणें हें महत्पाप होय, असें त्याच्या मनानें घेतलें. त्या वेळीं श्रीकृष्णानें त्याला कर्तव्यतत्पर करण्यास्तव जो उपदेश केला, त्यास "भगवद्गीता" असें म्हणतात हें प्रसिद्धच आहे. हा भगवद्गीतेचा प्रारंभ पुढील उताऱ्यांत विख्यात महाराष्ट्रीय संत कवि श्रीज्ञानदेव यांच्या "भावार्थदीपिका" ऊर्फ "ज्ञानेश्वरी" या ग्रंथांतून संक्षेपानें घेतला आहे.]

### ओंव्या

ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरी रथ पेलावा ।
नेऊनि मध्यें घालावा । दोहीं दळां ॥ १ ॥
जंव मी नावेक । हे सकळ वीर सैनिक ।
न्याहाळीन अशेख । झुंजते जे ॥ २ ॥
आइका अर्जुन इतकें बोलिला । तंव श्रीकृष्णें रथ पेलिला ।
दोन्ही सैन्यामाजीं केला । उभा तेणें ॥ ३ ॥

तंव तेथ पार्थ सकळ । पितृ पितामह केवळ ।
गुरु बंधु मातुळ । देखता झाला ॥ ४ ॥
इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिले ।
हे सकळ असती आले । तयांमध्यें ॥ ५ ॥
तेथ मनीं गजबज जाहाली । आणि आपैसी कृपा आली ।
तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥ ६ ॥
तो म्हणे " अवधारीं देवा । म्यां पाहिला हा मेळावा ।
तंव गोत्रवर्ग आघवा । देखिला येथ ॥ ७ ॥
देखें देह कांपत । तोंड असे कोरडें होत ।
विकळता उपजत । गात्रांसी ॥ ८ ॥
सर्वांगा कांटाळा आला । अति संताप उपजला ।
तेथें बेंबळा हात गेला । गांडिवाचा ! " ॥ ९ ॥
जेणें संग्रामीं हर जिंकिला । निवातकवचांचा ठावो फोडिला ।
तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥ १० ॥
जैसे भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें ।
परी कळिकेमाजि सापडे । कोंवळिये ॥ ११ ॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परी तें कमळदळ चिरूं नेणे ।
तैसें कठिण कोंवळेपणें । स्नेह देखा ! ॥ १२ ॥
तयावरी तो पंडुकुमर । महामोहें अति जर्जर ।
देखोनि श्रीशार्ङ्गधर । काय बोले ॥ १३ ॥
म्हणे अर्जुना आदीं पाहीं । हें उचित काय इये ठायीं ? ।
तूं कवण हें कायी । करीत आहासी ॥ १४ ॥

तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजी रावो ।
तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ॥ १५ ॥
तो तूं कीं आजि येथें । सांडोनियां वीरवृत्तीतें ।
अधोमुख रुदनातें । करीत आहासी ॥ १६ ॥
तूं अझुनि कां न विचारिसी । काय हें चिंतित आहासी ।
स्वधर्म तो विसरलासी । तरावें जेणें ॥ १७ ॥
अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जाहालें द्रवीभूत ।
तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ॥ १८ ॥
अगा गोक्षीर जरी जाहालें । तरी पथ्यासि नाहीं घेतलें ।
ऐसेनीही विष होय सूदलें । नवज्वरीं देतां ॥ १९ ॥
जैसें मार्गेंचि चालतां । अपायो न पवे सर्वथा ।
कां दीपाधारें वर्ततां । नाडळिजे ॥ २० ॥
तयापरी पार्था । स्वधर्म राहाटतां ।
सकळ कामपूर्णता । सहजें होय ॥ २१ ॥
म्हणोनि यालागी पाहीं । तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं ॥
संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥ २२ ॥
अर्जुना झुंज देख आताचें । हें हो कां दैव तुमचें ।
कीं निधान सकळ धर्मार्चें । प्रकटलें असे ॥ २३ ॥
हा संग्राम काय म्हणिपे । कीं स्वर्गचि येणें रूपें ।
मूर्त कां प्रतापें । उदयो केला ॥ २४ ॥
ना तरि गुणांचेनि पतिकरें । आर्तीचेनि पडिभरें ।
हे कीर्तीचि स्वयंवरें । आली तुज ॥ २५ ॥

क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तैं झुंज ऐसें लाहिजे ।
जैसें मार्गें जातां आडळिजे । चिंतामणीसी ॥ २६ ॥
ना तरी जांभया पसरे मुख । तेथ अवचटें पडे पीयूख ।
तैसा संग्राम हा देख । पातला असे ॥ २७ ॥
पूर्वजांचें जोडिलें । आपणचि होय धाडिलें ।
जरी आज शस्त्र सांडिलें । रणीं इये ॥ २८ ॥
असती कीर्ति जाईल । जगचि अभिशाप देईल ।
आणि गिंवसित पावतील । महादोष ॥ २९ ॥
जाणतेनि तंवचि जियावें । जंव अपकीर्ति अंगा न पवे ।
आणि सांग पां केवीं निघावें । एथोनियां ? ॥ ३० ॥
तूं निर्मत्सर सदयता । येथूनि निघसील कीर माघौता ।
परि ते गति समस्तां । न मनेल ययां ॥ ३१ ॥
हे म्हणती गेला रे गेला । अर्जुन आम्हां बिहाला ।
हा सांगें बोल उरला । निका कायी ? ॥ ३२ ॥
जैसा सिंहाचिया हांका । युगांत होय मदमुखा ॥
तैसा कौरवां अशेखां । धाक तुझा ॥ ३३ ॥
जैसे पर्वत वज्रातें । ना तरी सर्प गरुडातें ।
तैसे अर्जुना हे तूतें । मानिती सदा ॥ ३४ ॥
तें अगाधपण जाईल । मग हीनत्व अंगा येईल ।
जरी मागुता निघसील । न झुंजतची ॥ ३५ ॥
देखें स्वधर्म हा आचरितां । दोष नाशे असतां ।
तुज भ्रांती हे कवण चित्ता । पातकाची ? ॥ ३६ ॥

अमृतें तरीचि मरिजे । जरी विखेंसी सेविजे ।
तैसा स्वधर्मी दोष पाविजे । हेतुकपणें ॥ ३७ ॥
म्हणोनियां पार्था । हेतु सांडोनि सर्वथा ।
तुज क्षात्रवृत्ती झुंजतां । पाप नाहीं ॥ ३८ ॥
आपणपयां उचिता । स्वधर्मे राहाटतां ।
जें पावे तें निवांता । साहोनि जावें ॥ ३९ ॥
ऐसेया मनें होआवें । तरी दोष न घडे स्वभावें ।
म्हणोनि आतां झुंजावें । निभ्रांत तुवां ॥ ४० ॥

ज्ञानदेव

---

## १६

# कुंजकूजन

( दिंड्या )

कृष्णपक्षींचा चंद्र कलाहीन ।
पश्चिमेच्या क्षितिजांत होय लीन; ॥
भागलेला जणुं जरठसा प्रवासी, ।
लागलाहे खालती बसायासी. ॥ १ ॥

दीर्घसूत्री ती रात्र चंद्रजाया, ।
पूर्व गोलातें त्यजुनि निघे जाया; ॥
उदयसंधी येतांच आळशातें, ।
स्वयें तंद्रा सोडोनि जशी जाते. ॥ २ ॥

बाल दिनकर तो उदयगिरिशिराला ।
प्रयासानें आरूढ जणों झाला; ॥
मृदुल दुलईसम धवल धुकें त्यानें ।
निजकरांहीं सारिलें आळसानें ॥ ३ ॥

अरुण किरणें मंदोष्ण तयाचीं तीं ।
पडुनि, आकाशीं लाल छटा देती; ॥
प्रेमरंगें जणुं बाळ—रवि—चितारी, ।
किरणकलमांनीं गगनपट चितारी ॥ ४ ॥

अझुनि ठेवुनि निज गाल गालुशीतें ।
बिछान्यांतचि असतील आळशी ते; ॥
अशा समयीं मधुमधुर ह्या रवानें ।
आळवितसे हा कोण गौरवानें ? ॥ ५ ॥

कुठुनि येते ही शब्दसुधाधारा ।
हिनें भरिला कीं निकट भाग सारा ! ॥
अहो ! बघताहे चकित लोचनांहीं ।
उगम हीचा तरि दिसत मला नाहीं ॥ ६ ॥

'कोण तूं गा ! कोठील कवणियाचा ?' ।
कुठें आहे तव वास वसायाचा ? ॥
कुठें केला अभ्यास गायनाचा ? ।
कोण झाला गुरुराय तुज, तयाचा ? ॥ ७ ॥

अससि कलरव कीं काय सतारीचा ? ।
दिव्य सुस्वर कीं अमर—सुंदरीचा ? ॥

मूर्तिमंतचि कीं सामवेद साचा ? ।
सांग मजला तें सांग सुधावाचा ! ॥ ८ ॥

वेणुनादें माधवें मधुवनांत ।
ब्रह्म बिंबवुनी प्रणयिजनमनांत ॥
परम हर्षाचा परम लाभ त्यांतें ।
करुनि दिधला ऐकोनि ठाउकें तें. ॥ ९ ॥

परी त्याची अनुभूति मला नाहीं! ।
न हो किंबहुना मना कल्पनाही ! ॥
आजि तूझ्या परिसोनि गायनातें, ।
किमपि त्याचें अनुमान मला होतें ! ॥ १० ॥

काळसर्पाहुनि जे महा विखारी, ।
असे दुर्जन, त्यांनाहि जिंकणारी, ॥
चंद्रमणिसम रसिकांस झरविणारी, ।
होय वाणी तव अमृतगर्वहारी. ॥ ११ ॥

पहा विस्मय चहुंकडे प्रसारीत, ।
गाढ जिज्ञासा रसिकमनिं भरीत, ॥
उष्णसंगें अनुराग संचरीत, ।
गिरा विचरे ही पवन-लकेरींत. ॥ १२ ॥

उदासांचें औदास्यतम हरोनी, ।
निराशांचें नैराश्य निवारोनी, ॥
व्यथित हृदयांची व्यथा शांतवोनी, ।
विलसते ते उल्हास उपजवोनी. ॥ १३ ॥

तरी अद्भुतरस असा निर्मिणारा, ।
सरस मानस उचमळुनि आणणारा, ॥
हेंच नंदनवन करुनि दाविणारा, ।
कोण असली तूं दिव्य गुणागारा ? ॥ १४ ॥

गुच्छ जैसा काश्मीर-गुलाबाचा ।
हरितपर्णांमधिं गुप्त असे साचा, ॥
तरी परिमल चहुंकडे तयाचा तो ।
दरवळोनी रसिकांस मोहवीतो; ॥ १५ ॥

लपुनि कोठें तरि विहंगमा ! तैसा ।
नादसंगम वितरोनि मधुर ऐसा, ॥
गड्या ! मजला तूं वेड लावियेलें ! ।
तरी सांगें त्वां गेह कुठें केलें ! ॥ १६ ॥

असाधारण गुण असुनि असा अंगीं ।
कासया तूं बैससी गूढ जागीं ? ॥
वसत असतां कीं नित्य विजन-वासीं ।
येत आहे थोरवी गुणिजनांसी ? ॥ १७ ॥

अगा गंधर्वा ! अगा विहगराया ! ।
चित्तचातक हा आत्मवश कराया, ॥
तुझ्या हृदयीं कोणते तरि विचार ।
असति हृदयंगम जेहि काव्यसार ! ॥ १८ ॥

ठाउका जो आनंद तव मनाला ।
लेश त्याचा देशील काय याला ? ॥

शिकवि शिकवीं तव शब्दमोहिनी ते ।
ह्याहि जिव्हेतें सहजकर्कशेतें ॥ १९ ॥

जसा त्याचा रव कर्णमनोहारी, ।
तसा होई प्रतिरवहि सभोंवारीं; ॥
जणों उपवनही कुंजकूजनाचे ।
असुनि नादब्रह्मांत लीन नाचे ! ॥ २० ॥

धन्य अससी तूं कुंजकूजना गा ।
गाइं गाईं निजगान महाभागा ! ॥
तुझ्या गानें होईल खलभुजंग ।
वशहि तरि तो मग कां न रमारंग ? ॥ २१ ॥

पंचमांतिल आलाप कोकिलांचे, ।
नादसंयोगहि तंतुवादनांचे, ॥
काव्यमकरंदहि महाकविजनांचे, ।
वृथा ! येथें जाहले वृथा साचे ! ॥ २२ ॥

परमसीमा ही दिव्य माधुरीची, ।
मनुजवाणीनें कधिं न कळायाची. ॥
स्वाद हीचा रसिकांस जरी व्हावा, ।
तरी त्यांनीं रव हाच आयकावा ! ॥ २३ ॥

## समर्पण

जें जें निसर्गरमणीय म्हणोनि कांहीं, ।
निर्माण होउनि जगीं विलसोनि राही; ॥

सौंदर्य तें नयनगोचर होय साचें, ।
अज्ञेयशा भुवनसुंदर ईश्वराचें ! ॥ २४ ॥

विश्वास ठेवुनि मनांत असा विवेकें, ।
विश्वास जे निरखिति प्रणयातिरेकें, ॥
तद्वैभवीं असति लीनहि कौतुकानें, ।
त्यांनाच ही कृति समर्पण आदरानें. ॥ २५ ॥

चंद्रशेखर

# कवितापाठांवरील टीपा

## १

## ईशवंदना

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकरः**—(पृ० ४९ वरील प्रास्ताविक मजकूर पहा.) यांची समग्र कविता "गीतोपायन" या नांवानें प्रसिद्ध आहे. हे १९२७ सालीं पुणें येथें भरलेल्या साहित्यपरिषदेचे अध्यक्ष होते.

विभु—व्यापक. अगाध—ज्याचा अंत लागत नाहीं अशी. सूत्रें—कळसूत्री बाहुल्यांना जसा मागें दोऱ्या (सूत्रें) हलविणारा नाचवितो, त्याप्रमाणें मनुष्यांना अनेक खेळ करूं लावणारा सूत्रधार परमेश्वर होय, अशी कल्पना.

ब्रह्मा—ब्रह्मदेव; श्रीपति हरि—लक्ष्मीचा पति—विष्णु. कृपासिंधुलहरी—कृपेच्या समुद्राच्या लाटा. हरि—सिंह. काळा करिस—काळरूपी हत्तीला. विपति—पक्ष्यांचा राजा—गरुड.

## २

## तुकाराम—स्फुट अभंग

**तुकारामः**—(ज. इ. स. १६०८–मृ. इ. स. १६५१) या कवीनें अभंग या साध्या व गोड वृत्तांतच आपली बहुतेक रचना केली. भक्तिरसाची उत्कटता, साधी पण जोरदार व अर्थपूर्ण भाषा, यांची हे अभंग केवळ खाणच होत. भक्तिरसाच्या जोरावर तत्कालीन समाजांतील कर्मठ ब्राह्मण्यावर तुकारामानें

यथास्थित कोरडे ओढले, व समाजसुधारणेस उत्कृष्ट मदत केली. संतकवींत "ग्यानबा तुकाराम" या जोडीचा दर्जा श्रेष्ठ आहे.

( १ ) वरो—श्रेष्ठ. उदीम—व्यापारधंदा. साठा—सौदा. परी–प्रकार.

( २ ) गोसावी–विरक्त साधु, संन्यासी. योगाची तातडी–योगी होण्याची घाई. बीं बुडी–बीं नाहींसें करणें, म्हणजे पूर्ण नाश करणें.

( ३ ) विभूति–ईश्वरी अंश ज्यांत आहे असे थोर पुरुष. अमृत...स्रवतसे–तोंडून अमृतासारखे मधुर शब्द बाहेर पडतात.

( ४ ) पैं–या शब्दाला अर्थ नाहीं; जुन्या कवितेंत हा पादपूरणार्थ येतो. बांधोनीयां घेती यमाहातीं–पापी लोकांना यम आपल्या पाशांनीं जखडून शिक्षा करतो अशी समजूत. गव्हार–खेडवळ. अडाणी माणूस. चौऱ्यांशीचा फेरा–चौऱ्यांशी लक्ष योनि फिरून झाल्यावर मग मनुष्यजन्म प्राप्त होतो व या जन्मांत जर पाप केलें तर फिरून नीच जन्माला जावें लागतें, अशी कल्पना.

( ५ ) मोलें घातलें रडाया–गुजराथ, मारवाड वगैरे देशांत कोणी मेलें म्हणजे रडण्यासाठीं भाड्यानें माणसें लावीत असत, ( हल्लीं सुद्धां क्वचित् ही चाल आढळते. ) त्यास अनुलक्षून ही ओळ आहे. भाडोत्री रडण्यांत खरे अश्रु कोठून असणार? भक्तिवाद–भक्तीच्या गप्पा. रंगबेगडीचा न्याय–वरवरचा देखावा, नक्कल. वेठीं धरणें–सक्तीनें कामाला ( येथें अर्थातच ईश्वर-भक्तीच्या कामाला ) लावणें. ज्योती–ज्योतीनें, प्रकाशानें; काजव्याच्या प्रकाशानें कांहीं दिवे लागत नाहींत.

( ६ ) हुरूहुरू–घाबऱ्या नजरेनें. जीवन–पाणी.

( ७ ) कर्णमूळीं–कानांत. हे...कार्यसिद्धि–ही कार्यसिद्धि–म्हणजे ईश्वर-प्राप्ति–पुण्यानेंच होते, हें जाण. वारावा...मिथ्या–वायफळ बडबड सोडून द्यावी.

( ८ ) भूषण...आपणया–स्वतःचें महत्त्व मात्र वाढविलें. वृंदावनफळ–हें अत्यंत कडू असतें. भीतरील धारा–आंतला स्वभाव. फुंदां–गर्वानें ताठ होतां.

( ९ ) वरी–तथापि. गर्वानें सर्वस्वाचा नाश होतो, हें यांतील सार आहे.

( १० ) हा अर्थात् आद्यतेखोर ब्राह्मणांना टोला आहे. अपायीं–संकटांत. नागवण–नुकसान. वाटा–वाटेनें.

( ११ ) तेजी श्यामकर्ण–ही घोड्याची उत्तम जात मानली जाते. शर्करा-पीयूष–गोड अमृत. सवेंची–सारखेंच. वमन–ओक.

( १२ ) कथेचा विकरा–पैशासाठीं कीर्तन करणें. भूतांचा–प्राणिमात्रांचा.

( १३ ) जोडी–प्राप्ति. मुक्ति–मोक्ष, जन्ममरणापासून सुटका. गर्भवासीं... आम्हांसी–वारंवार जन्माला येणें हेंच दुःखाचें मूळ अशी कल्पना; पण जर ईश्वराचा विसर पडला नाहीं तर त्यासही आपली हरकत नाहीं, असें तुकारामबुवा म्हणतात.

---

## ३

## यक्षमंदिर

**कृष्णशास्त्री चिपळूणकरः**—( ज. इ. स. १८२४–मृ. इ. स. १८७८ ) इंग्रजी अमलाच्या अव्वलींतील हे एक प्रमुख मराठी कवि व ग्रंथकार होत. साकिबद्ध मेघदूत, व इतर फुटकळ कविता लिहून मराठी कवितेला अर्वाचीन वळण यांनींच प्रथम लावलें. त्यांच्या "आरबी भाषेंतील सुरस गोष्टींनीं" तर मराठी वाचकांना चटकाच लावून सोडला. शिवाय रासेलसचें भाषांतर, साक्रेटिसाचें चरित्र वगैरे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. अत्यंत साधी असून फार चटकदार अशी त्यांची भाषा आहे. भाषांतर कसें करावें हें त्यांच्याच ग्रंथावरून शिकावें !

( १ ) धनेश–कुबेर, देवांचा खजिनदार.

( २ ) इंद्रचाप–इंद्रधनुष्य.

( ३ ) कल्पवृक्ष–इष्ट वस्तु देणारा स्वर्गीय वृक्ष.

( ४ ) प्रिया–यक्षाची स्त्री.

( ८ ) क्रीडापर्वत–मौजेनें विहार करण्यासाठीं केलेला कृत्रिम पर्वत. नीलमणि–हें एक रत्न आहे.

( ९ ) सोन्याच्या केळींनीं युक्त असा क्रीडापर्वत पाहून विजेनें युक्त अशा नील मेघाची आठवण होते.

( ११ ) तांबडा अशोक–कोंवळ्या लाल पानांचा अशोक वृक्ष.

( १३ ) रक्त...तालातें–मोर नाचत असतां ती ताल धरते.

( १४ ) शंख...असतील–रांगोळीमध्यें हीं चिन्हें काढलेलीं असतील.

( १५ ) सहस्ररश्मि–हजारों किरणांचा–सूर्य.

---

## ४

## अन्योक्तिकलाप

( ३ ) दावग्नि–वणवा. शिखी–मोर.

( ५ ) खरतर नखरीं–अत्यंत तीक्ष्ण नखांनीं. धाला–तृप्त झाला.

( ६ ) द्विजकुलें–पक्ष्यांचे समुदाय. शार्दूल–वाघ. गिर्यंतरीं–पर्वताच्या गुहेंत.

( ७ ) बीज–द्वितीया ( तिथि ).

( ८ ) जलधर–मेघ, ढग.

( १० ) दल–पाकळी. केतकी–केवडा.

( ११ ) अंबर–आकाश. चंड+अंशु–प्रखर किरणांचा सूर्य. राहूच्या... अहा–सूर्याला राहु नामक दैत्य गिळतो व त्यामुळें त्यास ग्रहण लागतें ही समजूत.

( १२ ) शीण–थकवा. समसमां संयोग–बरोबरीच्यांची भेट, समागम.

( १३ ) मरुजनपद–ओसाड, वाळवंटाचा प्रदेश. कमलतंतु–मानस सरोवरांतील हंस कमलांतील तंतु–केसर–खातात अशी प्रसिद्धि आहे. कूपवारि–विहिरींचें पाणी.

( १४ ) ग्रीष्म–कडक उन्हाळ्याचा ऋतु. काहिली–अंगाची आग.

---

## ६

## महाराष्ट्रलक्ष्मी

**विनायक** ( विनायक जनार्दन करंदीकर ):–( ज. इ. स. १८७२–मृ. इ. स. १९०९. ) हे स्फूर्तिसंपन्न महाराष्ट्रीय कवि अल्पवयांत मृत्यु पावले. राष्ट्रीय बाण्याचीं गाणीं रचण्यांत त्यांचा हातखंडा होता.

परचक्र–शत्रूची स्वारी, परकीय अंमल.

द्वादशाब्द दुष्काळानें–तेराव्या शतकांत बारा वर्षांचा मोठा दुष्काळ सर्व महाराष्ट्रभर पडला होता तो; हा दुर्गा देवीचा दुष्काळ म्हणून इतिहासांत प्रसिद्ध आहे.

बाह्य–बाहेरचें; शेतकी खेरीज इतर गोष्टींचें.

तेच...मराठे–अर्थात् शिवाजी महाराजांच्या वेळीं.

नये...करांनीं–शिवाजी महाराजांस लिहितां वाचतां येत नव्हतें ही कल्पना खरी नाहीं, असें कै. इतिहासाचार्य राजवाडे यांचें मत होतें.

समर्थाभिधान–अभिधान–नांव, पदवी.

ध्वजा कौपिनाची–भगवें निशाण; हें रामदासांच्या सांगण्यावरून शिवाजी महाराजांनीं राष्ट्रीय निशाण बनविलें, अशी आख्यायिका आहे.

तयांनींच–अर्थात् पेशव्यांच्या कारकीर्दींत.

पूर्व...भाविकाळ–ज्या लोकांचा पूर्व इतिहास उज्ज्वल व अभिमानास्पद असतो, त्यांनाच भविष्यत्कालीं उन्नत दशा येण्याचा संभव असतो.

जहाल–तीव्र, ( चिंता या शब्दाचें विशेषण ).

# ७

## वामन-स्फुट श्लोक

### पश्चात्ताप

**वामन पंडितः**—( ज. निश्चित माहीत नाहीं. मृ. इ. स. १६२५ ) ओंवी व अभंग ह्या जुन्या वृत्तांऐवजीं श्लोकबद्ध गण वृत्तांत कविता करून अंत्य शब्दांचे यमक साधण्याचा पहिला मोठा प्रयत्न यानेंच केला. हा मोठा जाडा विद्वान् संस्कृतज्ञ होता. प्रथम हा मराठींत कविता करणें कमीपणाचें मानी. पण पुढें रामदासांच्या उपदेशावरून त्यानें मराठी काव्य करण्यास सुरवात केली, व त्यांनींच "यमक्या वामन" असें नांव त्याला दिलें अशी दंतकथा आहे. त्याच्या कवितेची भाषा प्रौढ व रसाळ असून अनुप्रास, यमक यांचे चमत्कारही भरपूर आहेत. तथापि भाषेचा अव्यवस्थितपणा व पुनरुक्ति हे दोषही त्याच्या काव्यांत आढळतात. यानें अनेक पौराणिक आख्यानांवर मराठी श्लोकबद्ध काव्यें लिहिलीं; भगवद्गीतेवर एक प्रचंड ओंवीबद्ध टीका लिहिली, व भर्तृहरीच्या शतकत्रयाचें मराठी भाषांतर केलें.

( १ ) जठरार्थ-पोटासाठीं.

( २ ) मही-जमीन. गिरिचे...धातुही-सोनें, रुपें यांच्या शाधार्थ. रात्रीं... धरिलें-स्मशानांत रात्रीचे वेळीं जाऊन कांहीं मंत्र जपले म्हणजे भुतें, पिशाचें वगैरे प्रसन्न होऊन त्यांपासून द्रव्यलाभ होतो, अशी जुनी समजूत होती. पयोधि-समुद्र. कपर्दिका-कवडी. दुराशा-कधींही तृप्त न होणारी आशा.

( ३ ) जलजपत्रोदक-कमळाच्या पानावरील पाणी; हें जसें क्षणांत निघून जातें, त्याप्रमाणें जीवितही आहे. द्रव्याढ्य-श्रीमंतीनें फुगलेले. प्रचुर-पुष्कळ. मृषा-खोटी. आत्मस्तुति कथा-स्वतःची तारीफ.

( ४ ) रदन + आवली-दंतपंक्ति. आस-आशा.

( ५ ) कंद-झाडाचीं मुळें, गड्डे. शुष्क-कोरडे.

## वैराग्याचें सुख

( १ ) वासर–दिवस. क्षणोपम–क्षणासारखे. निःसंगत्वपणें–एकांतवासांत. ध्यान + अवसान–ध्यानाचा शेवट. ध्यान–मन परमेश्वरावर एकाग्र करणें; यालाच ' समाधि ' असें नांव आहे.

( २ ) श्रुति–वेद. स्मृति–प्राचीन कालचे कायद्यांचे ग्रंथ. श्रुतिस्मृति–हे हिंदु धर्माचे आधारभूत ग्रंथ होत. विश्रुत–प्रख्यात. निस्पृह...फारशी–मला कशाची इच्छा नसल्यानें तुझ्या सारख्याच्या ऐश्वर्याची मला काय परवा ?–असा अर्थ. " निस्पृहस्य तृणं जगत्."

( ४ ) पात्र...युग–दोन हात हेंच ज्यांचें भिक्षापात्र. वस्त्र दिशा–अर्थात् अंगावर कांहीं नाहीं. क्षिति–जमीन. दैन्य–दीन, भिकारी वृत्ति. विरक्ति–वैराग्य. वनिता.–स्त्री. कर्मकलाप–बऱ्या वाईट कर्मांचा समुदाय.

( ५ ) सुरनदी–गंगा. सुदृढबंध–बळकट, पक्कें. पद्मासन–योगाभ्यासाला उपयोगी अशी एक प्रकारची मांडी घालून बसणें. योगनिद्रा–समाधि; ही वरून निद्रेप्रमाणें भासते, पण आंतून मनुष्य सावध असून ईश्वरचिंतनांत मग्न असतो असें म्हणतात. कधीं...शृंगांकुरें–समाधिमग्न स्थितींत हरिणांचीं पिलें येऊन शिंगांनीं डवचूं लागलीं, तरी दाद न लागावी, अशी स्थिति मला कधीं बरें येईल ?–असा अर्थ.

( ६ ) पृथ्वी, जल, तेज, वायु, व आकाश हीं पंचमहाभूतें आहेत, व यांचाच देह बनलेला असतो. या सर्वमहाभूतांस आपले निकट नातेवाईक कल्पून कवि त्यांचा निरोप घेत आहे, अशी येथें कल्पना आहे. मेदिनी–पृथ्वी. मारुत–वायु. सोदर–भाऊ ( एकाच मातेच्या उदरांतून आलेला ). तोय–पाणी. भवत्कृपेस्तव–तुमच्या कृपेनें. ब्रह्मीं मी मिळतों–ईश्वराच्या निर्गुण स्वरूपांत मिसळून जातों; यालाच मोक्ष असें म्हणतात. वर्षोत्पल–गारा. जलीं...परी–गारा जशा पाण्याशीं एकजीव होऊन जातात तद्वत्.

## ८

# दोन बाजी

**केशवसुत** ऊर्फ कृष्णाजी केशव दामले:—( ज. इ. स. १८६६–मृ. इ. स. १९०५ ) हे आधुनिक कविता संप्रदायाचे जनक होत असें म्हणतात. इंग्रजी काव्यवाङ्मयांतून जे नवीन प्रकार मराठींत अलिकडे आले आहेत त्यांची सुरवात प्रथम टिळक व केशवसुत यांनीं केली. हे स्वतंत्र विचाराचे व बाणेदार कवि फार अकालीं मृत्यु पावले. नवीन सुधारणेचे व देशाभिमानाचे विचार यांच्या काव्यांत भरपूर सांपडतात.

कदर–धाक. गनीम–शत्रु.

पाठ आपुली दावुनियां–शेवटल्या रावबाजींनीं लढाई अशी कधीं केलीच नाहीं. लढाईला तोंड लागण्यापूर्वीच त्यांचें अवसान सुटे व ते पळ काढीत. म्हणून त्यांना 'पळपुटे बाजीराव' अशी पदवी लोकांनीं बहाल केली होती.

गुणी...गौरविलें–शिंदे, होळकर, पवार, पटवर्धन, गायकवाड या सर्व सरदारांच्या उदयास बाजीराव साहेबांची गुणग्राहकताच कारण झाली.

वातें–वाऱ्यानें. वाऱ्यानें अग्नि प्रज्वलित होतो, हें प्रसिद्धच आहे.

सुजनस्नेहा–यांत स्नेह शब्दावर कोटी आहे. स्नेह=(१) प्रेम, व (२) तेल.

नाचलासि...अधमांचे–वाटेल तसें स्वैर वर्तन केलें.

लाविले...शेणाचे–एखाद्या पेढीचें दिवाळें निघालें असें सुचविण्याकरितां एक शेणाचा दिवा लावून ठेवण्याची चाल पूर्वी होती.

भट––(१) योद्धा, वीर. (२) भिक्षुक ब्राह्मण. ( शेवटल्या बाजीरावानें ब्राह्मणभोजनें मात्र खूप घातलीं ).

लंडी–भित्रे लोक.

भटवंशीं—पेशव्यांचें उपनांव 'भट' असेंच होतें.

निजनामाचा...गेला–बाजीराव यांतील बाजी शब्दाचा अर्थ 'खेळ, शर्यत' असा आहे. जो शर्यत अथवा डाव नेहमीं जिंकतो असा बाजीराव

याचा अर्थ आहे. थोरल्या बाजीरावास हा शब्द सार्थपणें लागू होई. गाजी–धर्मरक्षक, पराक्रमी.

मरणा आधिंच मरण–अपमान हें मरणापेक्षां मोठें मरण होय, असा अर्थ.

---

## १०

## स्मृतिचित्र

**गोविंदाग्रज** ऊर्फ राम गणेश गडकरीः—( ज. इ. स. १८८५–मृ. इ. स. १९१९. ) हेही आधुनिक कवींपैकीं एक उत्कृष्ट कवि व चांगल्यापैकी नाटककार व विनोदी लेखक होऊन गेले. अंतःकरणाला चटका लावून सोडणारे प्रसंग कल्पण्यांत त्यांचा हातखंडा होता. केशवसुत—कृष्णाजी केशव दामले–यांच्या काव्यांनीं गडकऱ्यांना स्फूर्ति दिली, पण शिष्यानें कांहीं बाबतींत गुरूवर ताण केली आहे. हे अल्पवयांत वारले. नाहींतर त्यांच्या हातून पुष्कळ उच्च दर्जाची वाङ्मयसेवा घडली असती.

मुग्धपणाचा–गोड, सुंदर. निर्मल भावाचा–निष्कपट प्रेमाचा. राजीव–कमल.

फुललें...राजीव–आपल्या अंतःकरणांतील भावना त्या वेळीं स्पष्टपणें व्यक्त झाल्या नव्हत्या.

---

## ११

## रुक्मिणी-विवाहकथा

**मोरोपंतः**—( ज. इ. स. १७२९–मृ. इ. स. १७९४. ) याचें उपनांव पराडकर. बारामतीचे इनामदार बाबूजीनाईक यांचा आश्रित पुराणिक म्हणून तो पुष्कळ दिवस राहिला होता. याचें लाडकें वृत्त **गीति** ( इलाच तो **आर्या** असें नांव देतो ) हें होय. व याच वृत्तांत रामायण, महाभारत, भागवत व इतर पौराणिक आख्यानें यांवर त्यानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत. निरनिराळ्या

वृत्तांत १०८ रामायणें त्यानें लिहिलीं, व शिवाय **केकावलि** व इतर स्फुट काव्यें लिहिलीं. व्याकरणशुद्ध, प्रौढ व झोंकदार भाषा लिहिणारा दांडगा कवि मोरोपंतच होय. मराठी भाषेला तो वाटेल तशी वांकवितो, व तींत शब्दाचे व अर्थाचे वाटेल ते चमत्कार करून दाखवितो. पण त्याचा गुण म्हणजे रसाळ व चटकदार गोष्ट सांगणें हा होय. त्याच्या कथानकांतील संवाद तर फारच बहारीचे असतात. भक्तिरसपूर्ण काव्यांत 'केकावलि' फार सरस आहे.

( १ ) वैदर्भी–विदर्भ ( वऱ्हाड ) देशची राजकन्या–रुक्मिणी.

( २ ) हारि–मनोहर. तें ( कृष्णकथारूपी अमृत ) मात्र माझें जीवित चालवीत होतें.

( ३ ) मुद्रा–नाणीं. परिहार–अडथळा, मनाई.

( ४ ) नखेंदु–चंद्राप्रमाणें तेजस्वी नखें. धरा...खणी–नखानें जमीन उकरणें हें कांहीं सुचत नसल्याचें लक्षण होय.

( ६ ) श्रुत्यर्पण–कान देणें, ऐकणें. कृष्णगुणीं...सत्स्वभावांच्याः–अन्वय, कृष्णगुणीं श्रुत्यर्पण जेविं सत्स्वभावांच्या मनास ये, तेविं ( माझ्या ) मनासि ये.

( ७ ) खोटा नव्हेचि–तो स्वभावानें कपटी नव्हता.

( ८ ) मोहरोगवैद्यातें–मोहरूपी रोगाचा नाश करणारा वैद्य–श्रीकृष्ण. चैद्य–शिशुपाल, चेदि देशाचा राजा.

( ९ ) मूळ–निमंत्रण. क्ष्वेड–विष. तात...पांगूळ–वडिलांचें कांहीं चालेना.

( १० ) होय...आत्मघाताचें–क्षणांत जीव देणें इष्ट वाटे, तर क्षणांत तें अनिष्ट वाटे.

( १२ ) लाखोटा–पत्राचा लिफाफा. 'दिला' ह्या क्रियेचा अन्वय अभयवर व लाखोटा या दोहीं शब्दांशीं करावयाचा.

( १४ ) आण घालुनि–शपथ घालून, आग्रहपूर्वक. क्षिप्र–लौकर.

( १५ ) मगधपतिसख–मगध देशाचा राजा जरासंध याचा मित्र, शिशुपाल.

( १६ ) गरळ...तें–लग्नापूर्वी अंगास लावलेली हळद मला विषाच्या उटण्याप्रमाणें भासली. सुकृपण–अत्यंत कंजूष माणूस. शुष्कोपचरण–कोरडा सत्कार.

(१७) ध्वजा–पताका, झेंडा. पुर + ईक्षण + छद्म–नगर पाहण्याचें मिष पाहति या क्रियेचा संबंध पद्में व नयनें या दोन्ही शब्दांशीं आहे. हरिदिङ्मुखा–पूर्व दिशेला; पूर्व दिशेचा स्वामी इंद्र समजला जातो.

(१८) यष्टी–काठी, आधार. अन्वय–ती रात्रि ( माझ्या ) आधिभारभग्नासी मनासी यष्टी झाली. माझ्या चिंतातुर मनाला आतां त्या रात्रीचाच कायतो आधार होता.

(२०) बोल–दोष. चिंतामणि–कल्पवृक्षाप्रमाणेंच इष्ट वस्तु देणारा मणि.

(२१) प्रियकंठीं–कृष्णाच्या गळ्यांत. हेही–इला ( रुक्मिणीला ) ही. या भावेंचि–जणुं कांहीं याच उद्देशानें. डावी भुजलता–डावा बाहु स्फुरणें हा स्त्रियांना उत्कृष्ट शकुन असें मानतात.

(२२) समूळा...मात्रा–सर्व चिंतारूपी रोग दूर करणारी मात्रा–म्हणजे श्रीकृष्ण येत आहे ही बातमी घेऊन. धन्वंतरि–देवांचा वैद्य.

(२३) मुखश्री–तोंडावरची टवटवी. अन्वय–( माझें ) मन "ऊठ, गुरुपदास लाग" ( असें ) म्हणे.

(२४) उत्तमश्लोक–उत्तम आहे कीर्ति ज्याची असा. अशाच अर्थी "पुण्यश्लोक" हा शब्द आढळतो.

(२५) अंबेच्या...ती–याच्या शेवटीं अशी आमच्या कुळांत चाल होती येवढा मजकूर घेतला पाहिजे. धरि...दादा–कृष्ण कांहीं तरी घोंटाळा करील अशी माझ्या दादाला शंका आली.

(२६) धाकें...गेल्यांचे–भयानें गांगरून गेलेल्यांचे–हें दादा इत्यादिकांचें विशेषण होय.

(२७) धात्री–दाई. विप्रस्त्री–उपाध्यायाची पत्नी. पेटींत घालून नेल्याप्रमाणें मला बंदोबस्तानें नेली, असा अर्थ.

(२८) विनविली–या क्रियापदाचें कर्म देवी ( अंबा ).

(२९) दावा–वैर. दावा...नेदावा–पुष्कळांशीं वैर असल्यामुळें ही गोष्ट आपण गुप्तपणें करावी, हा भाव. भाग–वांटा. महाभाग–ऐश्वर्यवान्.

(३०) महा–तेजाला.

(३१) मूर्त–मूर्तिमंत.

(३२) आलि–सखी.

(३३) कालवला–उचंबळला, त्याला भरती आली.

(३४) मुक्ता–मोतीं. काकांनीं–कावळ्यांनीं.

(३५) श्वगण–कुत्रीं. हरि–सिंह.

---

# १२

## लेंकराची जिज्ञासा

**रे. वामन नारायण टिळकः**—(ज. इ. स. १८६५–मृ. इ. स. १९१०) आधुनिक मराठी कवितेला नवीन वळण लावणाऱ्या कवींत हे फार श्रेष्ठ प्रतीचे कवि होऊन गेले. यांनीं ख्रिती धर्म स्वीकारलेला होता, तरी यांचा हिंदुधर्म व चालीरीती यांवरील लोभ कायम होता व यांचा स्वदेशाभिमान तर फार जाज्वल्य होता. मराठी भाषेवर त्यांचें अलोट प्रेम होतें. त्यांचें "ख्रिस्तायन" व तुकारामाच्या धर्तीवर लिहिलेले अनेक अभंग हीं ख्रिस्ती धर्मविषयक काव्यें आहेत; शिवाय अनेक विषयांवर स्फुट कविता पुष्कळच आहेत. सोपी पण मनोहर भाषा, व उदात्त विचार ह्यांचा उत्कृष्ट मिलाफ यांचे काव्यांत अनुभवास येतो.

ईषत्–थोडा.

शिक्षण...करावें–सूर्यकिरणांनीं ज्याप्रमाणें फुलें उमलतात' त्याप्रमाणें शिक्षणानें मनरूपी फूल उमलतें असा भावार्थ.

शलाका–सळई–अर्थात् सूर्यकिरणाची.

अव्याज–निष्कपट, भोळा.

देव...बाऊ–कोणी हा 'देव' असें सांगतात, कोणी 'बाऊ' (भयानक पदार्थ) असें सांगतात.

वाढो...विचारी–आपल्या उत्तरांनीं मुलांच्या बुद्धीचा विकास होईल कीं नाहीं याची पुष्कळ लोक फिकीर करीत नाहींत, असा भाव.

अनिल–वायु.

तो...झाली–ज्याला मुलांच्या मनाची किल्ली सांपडली तो धन्य.

---

## १३

## एक अमेरिकन मुलगी

( १ ) धूसर–पिंगट. मुक्त–मोकळे. बाल–केश. जेथें.....नाचे–यावर भाग्यशालीपणा व बुद्धिमत्ता यांचीं स्पष्ट चिन्हें दिसतात.

( २ ) अलि–भुंगा. कुरळ–कुरळे केश. कृपण–भिकार.

( ३ ) लोल–चंचल. पाणी–रत्नावरील तेज.

( ४ ) अग्र–टोंक. नतिमान–किंचित् बांक असलेलें. सारल्य–सरळपणा. आर्य + अन्वय + उद्भव = आर्य कुलांत जन्म. अन्वयः—ज्याचें चारुतेचें सारल्य ( व ) नतिमान अग्र अपूर्व ( आहेत ) असें हिचें नासिक जगाला सोत्कंठ म्हणतें ( कीं ही ) बाला खरोखर आर्यान्वयोद्भव ( आहे. ) सरळ व अणकुचीदार नाक ही आर्यवंशाची एक खूण आहे असें मानतात.

( ५ ) अंतरंग–आंतील बाजू. लपवून–हळूच, लाजत.

( ६ ) विभक्त–वेगळे, एकमेकांपासून दूर. ( हासतांना ओंठाच्या कळ्या उमलतात, हा भाव. )

( ७ ) उषा–सूर्योदयापूर्वीचा प्रकाश. ( उषा ही सूर्याची पत्नी आहे अशी कविकल्पना आहे ) मधुरूप–सुंदर रूप. अव्याजता–निष्कपट वृत्ति. रसिकता–सौंदर्याचा अनुभव घेण्याची पात्रता.

## १४

## तें गृह

( १ ) माझेंपण–आपलेपणा, प्रेम.

( ४ ) अंकुरित–कोंब फुटलेली.

( ५ ) संसृति–संसार.

( ६ ) मुदा–आनंदानें.

( ७ ) त्रिवर्ग–तीन पुरुषार्थ–म्हणजे माणसानें मिळविण्यास योग्य वस्तु. त्या धर्म ( उत्कृष्ट आचरण ), अर्थ ( संपत्ति ), काम ( सुखांचा उपभोग ) ह्या होत. मोक्ष हा चवथा पुरुषार्थ मानतात सोपान–पायऱ्या, जिना. गृहस्थ वृत्तीनें चांगला संसार करणें हें सर्व पुरुषार्थांच्या सिद्धीचें मूळ होय.

---

## १५

## भगवद्गीतेचा प्रारंभ

**ज्ञानेश्वरः**—( ज. इ. स. १२७५–मृ. इ. स. १२९६.) महाराष्ट्रीय साधु व कवि यांत सर्वश्रेष्ठ. भगवद्गीतेवर त्यांनीं जी **भावार्थदीपिका** या नांवाची मराठी टीका लिहिली ती **ज्ञानेश्वरी** या नांवानेंच प्रसिद्ध आहे. त्यांची शब्दरचना इतकी कर्णमधुर आहे, व उपमा, दृष्टांत हीं इतकीं समर्पक आहेत कीं वाचणारा त्यांत अगदीं तल्लीन होऊन जातो. "माझा मराठाचि बोल कौतुकें । परी अमृतातेंहि पैजा जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥" अशी त्यांनीं गर्वोक्ति काढली आहे, व ती अक्षरशः खरी करून दाखविली आहे. त्यांच्या नंतरच्या मोठमोठ्या कवींनीं देखील ज्ञानेश्वरांचेच दृष्टांत उसने घेतले आहेत कीं काय असा भास होतो. ज्ञानेश्वरीची रचना वयाच्या पंधराव्या वर्षी करून २२ व्या वर्षी ज्ञानदेवांनीं समाधि घेतली. इतक्या अल्पवयांत एवढी दांडगी रचना, हा खरोखर एक अद्भुत चमत्कार होय.

( १ ) पेलावा–न्यावा.

( २ ) नावेक–क्षणभर. अशेख–सर्व.

( ६ ) गजबज–गडबड. आपैसी–आपोआप. तेणें...वीरवृत्ति–तो अपमान न सोसून वीरवृत्ति ( शौर्य ) अर्जुनाला सोडून निघाली.

( ७ ) अवधारीं–ऐक; लक्ष दे. गोत्रवर्ग–नातेवाईक. आघवा–अवघा, सर्व.

( ८ ) विकळता–ढिलेपणा. गात्र–अवयव.

( ९ ) कांटाळा–रोमांच, कांटा. बेंबळा–ढिला. गांडीव–अर्जुनाचें धनुष्य.

( १० ) हर–शंकर, किरातार्जुनीय युद्धाचे वेळीं. निवात कवच–हे दोन राक्षस अर्जुनानें मारले होते. ठाव–मागमूस. फोडिला–नाहींसा केला. कवळिला–ग्रासला.

( ११ ) कोडें–कौतुकानें, सहज. भलतैसें–कोणतेंही.

( १२ ) उत्तीर्ण...प्राणें–प्राणाला मुकेल. कठिण...देखा–प्रेम हें नाजुकपणामुळेंच भेदण्याला अधिक कठीण आहे.

( १३ ) जर्जर–व्याप्त, घेरलेला. शार्ङ्ग-कृष्णाचें धनुष्य.

( १४ ) इये–ह्या. आहासी–आहेस.

( १५ ) ठावो–ठिकाणा, आश्रयस्थान. रावो–राजा, श्रेष्ठ. लाठेपणा–शौर्य. आवो–प्रतिष्ठा, डौल.

( १६ ) अधोमुख–खालीं मान घालून.

( १८ ) द्रवीभूत–दयेनें विरघळलेलें.

( १९ ) सूदलें–घातलें. नवज्वरांत दूध हें विषासारखा अपाय करतें, अशी पूर्वापार समजूत आहे.

( २० ) दीपाधारें–दिव्याच्या मदतीनें. नाडळिजे–अडखळत नाहीं.

( २१ ) राहाटतां–वागतां. कामपूर्णता–मनोरथांची सिद्धि.

( २३ ) निधान–मूल्यवान् ठेवा.

( २४ ) म्हणिजे–म्हणावा.

( २५ ) पतिकरें–अनुभवानें, प्रतीतीनें. पडिभरें–अधिकपणामुळें. तुझ्या

अनेक गुणांवर लुब्ध होऊन कीर्ति आपण होऊन तुला माळ घालण्यासाठीं आली, हा भाव.

(२६) लाहिजे–लाभावें. आडळिजे–अडखळावें, अर्थात् सहज मिळावा.

(२७) जांभया–जांभई देतांना. अवचटें–अकस्मात्. पीयूख (ष)–अमृत.

(२८) जोडिलें–मिळविलेलें. धाडिलें–गमावलें.

(२९) असती–असलेली. अभिशाप देईल–निंदा करील. गिंवसीत–शोधीत.

(३०) जाणतेनी–शाहाण्या माणसानें. जियावें–जगावें. न पवे–पावत नाहीं.

(३१) सदयता–दयेनें. कीर–खरोखर. माघौता–माघारीं. ते गति–तुम्हें सद्देतूनें परत फिरणें. न मनेल ययां–यांना पटणार नाहीं.

(३२) बिहाला–भ्याला. निका–चांगला.

(३३) युगांत होय–प्रलयकाल आलासा वाटतो. मदमुख–मस्त हत्ती.

(३५) अगाधपण–मोठेपणा. हीनत्व–कमीपणा.

(३७) विखेंसी–विष मिसळून. हेतुकपणें–हेतु मनांत ठेवून कर्म केल्यानेंच तें बाधतें, एरव्हीं नाहीं.

(३८) क्षात्रवृत्ति–क्षत्रियाला साजेल अशा रीतीनें.

(३९) निवांता–स्वस्थपणें.

(४०) निभ्रांत–निःशंक मनानें.

---

## १६

## कुंजकूजन

**चंद्रशेखर** ( चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे ):—हे बडोयास असतात व विद्यमान महाराष्ट्रीय कवींत यांचा दर्जा फार श्रेष्ठ आहे.

( १ ) क्षितिजांत...लीन–मावळतो.

( २ ) तंद्रा–सुस्ती, आळस.

( ४ ) अरुण–लाल. मंदोष्ण–किंचित् उष्ण.

( ५ ) गालुशी–गाल टेंकण्याची उशी, गिर्दी.

( ७ ) तयाचा–गाण्याच्या विद्येचा ( गुरु ).

( ८ ) कलरव–अस्फुट, मधुर आवाज. अमरसुंदरी–अप्सरा. सामवेद–तिसरा वेद; ह्यांत गायनशास्त्राचा उगम सांपडतो. सुधावाचा–हें संबोधन आहे.

( ९ ) माधव–श्रीकृष्ण. मधुवन–गोकुळाशेजारचें वन. प्रणयी–प्रेमळ. ब्रह्म...मनांत–मुरलीच्या अद्भुत माधुर्यानें त्यानें सर्वांस ब्रह्मानंदांत तल्लीन केलें.

( १० ) अनुभूति–अनुभव. किमपि–थोडेंसें.

( ११ ) चंद्रमणि–चंद्रकांत मणि; ह्यावर चंद्राचे किरण पडले म्हणजे त्यांतून पाण्याचा पाझर फुटतो, अशी कल्पना होती. झरविणारी–द्रव आणणारी, मनास आल्हाद देणारी. रसिक–काव्य, सृष्टिसौंदर्य वगैरेंचा भोक्ता.

( १२ ) अनुराग–प्रेम. उष्ण...संचरीत–वाढत्या उन्हाबरोबरच प्रेमाचा जिकडे तिकडे फैलाव करीत. गिरा–वाणी. विचरे–पसरते. पवनलकेरींत–वाऱ्याच्या झुळकीबरोबर.

( १३ ) औदास्यतम–खिन्नतारूपी अंधकार.

( १४ ) नंदनवन–स्वर्गातील इंद्राचा बगीचा. गुणागार–गुणांचें वसतिस्थान.

( १५ ) हरित–हिरवे. परिमल–सुवास.

( १६ ) नादसंगम–गोड स्वरांचें मिश्रण, संमेलन. वितरोनि–पसरून. गेह–घर.

( १७ ) असाधारण–दुसरीकडे न सांपडणारा. विजनवास–एकांतवास.

( १८ ) आत्मवश–आपल्या ताब्यांत. हृदयंगम–मनाला चटका लावणारे. काव्यसार–कवितेचें सार ( मर्म ) ज्यांत आहे असे.

( १९ ) याला–मला, ( कवीला ). मोहिनी–वश करणारी विद्या. सहजकर्कश–स्वभावतः कर्कश असणारी ( जीभ, वाणी ).

( २० ) प्रतिरव–पडसाद. नादब्रह्मांत लीन–सुस्वररूपी ईश्वराच्या स्वरूपांत मिसळून गेलेलें.

( २१ ) महाभाग–भाग्यशाली. रमारंग–रमेचा पति, श्रीविष्णु. दुष्ट माणसांना जर तूं वश करतोस, तर ईश्वराला सहज करशील.

( २२ ) पंचमांतिल...इत्यादि–सात स्वरांपैकीं पंचमांत कोकिल गातो अशी प्रसिद्धि आहे. तंतुवादन–सतार, वीणा वगैरे तंतुवाद्यें. काव्यमकरंद–मधुर काव्यें. वृथा झाले–तुझ्या गाण्यापुढें फिके पडले.

( २४ ) निसर्गरमणीय–स्वभावतः सुंदर. नयनगोचर–दृष्टीस पडणारें. अज्ञेय–जाणण्यास अशक्य. भुवनसुंदर–जगांतील सर्व वस्तूंपेक्षां सुंदर.

( २५ ) विश्वास ( दुसरी ओळ )–जगाकडे. प्रणयातिरेकें–अत्यंत प्रेमळ मनानें. तद्वैभव–सृष्टीचें वैभव.